# तेजस्वी तारे

## हिंदी क्रांतिकारकांची परदेशीय चळवळ

(पूर्वार्ध)

एखाद्या होतकरू नटाचे नाव जितके लोकांच्या तोंडी असते, तितके देखील त्या देशदेशांतरी त्याच्याच स्वातंत्र्यासाठी प्राण संकटात घालून झगडत, झुंजत, सहत, भटकत असलेल्या हिंदी निर्वासिताचे नाव कोणाच्या तोंडी नसते, इतकेच नव्हे तर क्रांतिकारकाचा संपूर्ण कार्यक्रम पुढे नसता आणि जो तुटपुंजा कार्यक्रम त्याच्यापुढे असतो त्याचे मर्मही कळण्याइतके इतिहासाचे आणि राजकारणाचे प्रत्यक्ष ज्ञान नसता हिंदी राज्यक्रांतिकारक संस्थावर दोषारोपण करण्याचा लहान तोंडी मोठा घास घेणारे निरर्गल नवशिकेही कुठेकुठे आढळून येतात ही दुःखद स्थिती किंचित् तरी बदलावी म्हणून हिंदी क्रांतिकारकांचा ऐतिहासिक उल्लेख या नावाचा लाला लजपतराय यांच्या पीपल पत्रात प्रसिद्ध झालेला खालील लेख आम्ही इंग्रजीतून मराठीत भाषांतरीत करीत आहोत. हा मूळ लेख व्याख्यानरूपाने बर्लिन येथे ॲग्नेस मेडले नावाच्या एका अमेरिकन विदूषीने वाचला होता.

सन १९२७ मध्ये कित्येक वर्षापासून चीन आपल्या राज्यक्रांतीत हिंदी राज्यक्रांतीकडून शक्य तो पाठिंबा आणि सहानुभूती मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नातीलच एक प्रयत्न म्हणून जर्मनीत असणाऱ्या तरूण चिनी विद्यार्थ्यांस हिंदी राज्यक्रांतीच्या आणि स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ चालत आलेल्या लढ्याच्या इतिहासाचे सांगता येईल तितके तरी स्वरूप आणि वर्णन सांगावे यास्तव हिंदुस्थानच्या एका थोर देशभक्त निर्वासिताशी एकदा विवाहबद्ध झालेल्या आणि अद्याप हिंदुस्थानावर मातृभूमीप्रमाणे प्रेम करणाऱ्या वरील अमेरिकन विदूषीने हे व्याख्यान चिनी विद्यार्थ्यांसमोर जुलै १९२७ मध्ये दिले होते, यावरून त्याचे विशिष्ट महत्वही वाचकांच्या ध्यानी येईल.

ॲग्नेस मेडले या विदुषीच्या भाषणाचा लालाजींच्या People पत्रातील उतारा: “या इतिहासाला साधारणतः इसवी सन १८५७ मधील हिंदी स्वातंत्र्ययुद्धापासून सुरूवात करण्यास हरकत नाही. यावर्षी इंग्लंडच्या दास्यत्वाचे जू फेकून देण्याचा हिंदी राष्ट्राने प्रयत्न केला, परंतु त्याला यश आले नाही. त्यावेळी हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्यांचे प्रतिनिधी परदेशात गेले. त्यांनी फ्रान्स नि रशिया यांच्याशी संबंध जोडण्याचा प्रयत्न केला;

परंतु तो सिद्धीस गेला नाही. त्या कालापासून साधारणतः स्वातंत्र्याकरता करण्यात आलेल्या प्रत्येक राजकीय चळवळीतून अशी माणसे बाहेर पडली की, त्यांना हिंदुस्थानात अज्ञातवासात रहावे लागले, किंवा या परदेशाचा आश्रय करावा लागला. बहुधा ही माणसे म्हणजे ध्येयवादी नि करारी अशा व्यक्ति असून जर त्यांनी हिंदुस्थांनात उघड उघड राजकीय क्रांती केल्या तर त्यांना कारागृहात बद्ध व्हावे लागले असते किंवा ते फाशी तरी गेले असते. मी या परदेशी राहिलेल्या गृहस्थांविषयी विशेषतः माहिती सांगणार आहे. कारण त्या व्यक्ति महत्वाच्या होत्या. हिंदी क्रांतिकारकांच्या चळवळीचे मध्यवर्ती केंद्र परदेशस्थ क्रांतिकारक हे बरेच वर्षेपर्यंत राहिले याचे उत्तरदायित्व, ब्रिटिशांच्या अन्यायी नि हिडिस राज्यपद्धतीवर, की ज्यामुळे क्रांतीची चळवळ हिंदुस्थानात अशक्य झाली, मुख्यत्वेकरून आहे.

## क्रांतिकारक विचारांचे केंद्र परदेशात राहिले

स्वतः हिंदुस्थानात अशा काही व्यक्ती होत्या की, ज्यांनी आपले सर्व आयुष्य क्रांतीला वाहिलेले होते. त्यापैकी लोकमान्य टिळक हे होत. परंतु त्यांच्या आयुष्यातील महत्वाचा भाग कारावासात गेला आणि या कारणामुळे युद्धसामुग्रीपर्यंत क्रांतिकारकांच्या विचारांच्या वा चळवळींचे मुख्य केंद्र परदेशस्थ निर्वासित हिंदी लोक हा होता. मात्र त्यांच्याच विचारांनी त्यांच्याच चळवळींनी हिंदी तरूणांच्या मनात स्वातंत्र्यविषयक भावना उद्दिपीत राहिल्या होत्या. युरोपीय युद्ध-समाप्तीपर्यंत हिंदुस्थान राजकीयच नव्हे, आर्थिक नव्हे, परंतु मानसिक दास्यातही होता; आजमितीपर्यंत तो तसाच आहे. हिंदी पुढाऱ्यापैकी बहुतेकजण आजदेखील इंग्लंड वा अन्य एखादा ब्रिटिश राजकीय पक्ष यांच्या सहाय्याच्या अपेक्षेत असतात. परंतु गेली काही दशकेपर्यंत परदेशस्थ हिंदी निर्वासित लोक नि काही हिंदुस्थानातील लोक या धोरणाचा ब्रिटिश राज्यपद्धतीप्रमाणेच तीव्र निषेध करीत होते. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धानंतर परदेशीय सरकारशी संधान बांधण्याचा पहिला प्रयत्न महाराजा दिलीपसिंग यांनी इ.स. १८८४ साली केला. ते लहानपणापासून इंग्लंडात वाढले होते तरीदेखील हिंदुस्थानची दास्यप्रवण नि लज्जास्पद स्थिती विसरले नव्हते. त्यांनी ब्रिटिशांचे राज्य उलथून पाडण्यासाठी रशियाचे गुप्त सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो व्यर्थ गेला. यानंतर याच प्रकारचे हिंदुस्थानच्या सीमेवर काही प्रयत्न करण्यात आले परंतु त्यांची मला निश्चित माहिती नाही.

## अजितसिंग आणि अंबाप्रसाद

राजकीय निर्वासितांपैकी अगदी पहिला संघ दोन किंवा तीन व्यक्तींचा होता. सुमारे २० वर्षापूर्वी ह्या व्यक्ती इराणात पळून गेल्या नि त्या ठिकाणी आपल्या चळवळीचे केंद्रस्थान स्थापण्याचा त्यांनी प्रयत्न केला. इराणातील त्यांची चळवळ दोन प्रकारची होती. प्रथमतः त्यांनी क्रांतिकारक वृत्तपत्रे प्रसिद्ध केली आणि कॉलेजातील विद्यार्थी नि सैन्यातील शिपाई यांच्या हाती पडावी अशा पद्धतीने हिंदुस्थानात पाठवून दिली. दुसरे त्यांनी इराणी प्राजक्त चळवळीशी आपणाला आत्मसात करुन घेतले, शाळागृहे बांधली, वृत्तपत्रे काढली आणि तरुण इराणी पिढीला सुशिक्षित केले. इराणी प्राजक्त चळवळ इंग्लिशांविरुद्ध होती आणि तीत भाग घ्यावा हे सहजच होते. त्या विरहित त्या कल्पना त्यांना स्वतःलाच पसंत पडल्या होत्या.

यापैकी प्रमुख पंजाबातील सुफी अंबाप्रसाद आणि अजितसिंग हे होते. या दोघांनाही हिंदुस्थानात असतांना सरकारपासून बराच उपद्रव सहन करावा लागला होता. सुफी हा पर्शियन शिक्षक आणि संघटक म्हणून प्रसिद्धिस आला. काही वर्षांनंतर महमद अली हे मुसलमानी नाव धारण केलेला एक मराठा इ.स. १९०५ मध्ये इराणी बंड उद्भवले त्यावेळी ज्या सैन्याने तेहरान हस्तगत केले त्यातील एका तुकडीचा सेनापती होता. या संघांत महाराष्ट्रातील सुद्धा काही लोक होते. परंतु त्यांची नावे सांगण्याची आवश्यकता नाही. इ.स. १९०५ ते १९११ मधील राजकीय चळवळीच्या योगाने राज्यक्रांतीकारक निर्वासित हा एक नवीनच वर्ग उत्पन्न झाला नि त्यांनी क्रांतीचळवळीचे केंद्र युरोप, अमेरिका, चीन नि जपान या देशांत स्थापण्याचा प्रयत्न केला. इ.स. १९०४ मध्ये जपानने रशियासारख्या युरोपियन राष्ट्राचा पराभव केला. या गोष्टीचा परिणाम हिंदुस्थानावर विशेष करून तरुण वर्गावर फार मोठा झाला. या गोष्टीने त्यांना हे स्पष्ट कळून आले की, युरोपीय राष्ट्राचा आशियाटिक राष्ट्र पराभव करु शकते आणि पारतंत्र्य आशियातील राष्ट्रांच्या भालावर लिहिलेले नसून तो फक्त शस्त्रे, संघ इत्यादी गोष्टींवर अवलंबून असणारा एक प्रश्न होता. इ.स. १९०५ नंतर जे कट आणि जी भयंकर चळवळ चालू झाली, त्याचे इतरही अनेक राजकीय नि आर्थिक कारणाबरोबर हे महत्वाचे कारण होते. सर्व जगासंबंधाने इ.स. १९०५ हे वर्ष ऐतिहासिक महत्वाचे होते. याचवर्षी रशिया, इराण, मेक्सिको, आयर्लंड, युनायटेड स्टेट्स या देशांत दंगली चालू होत्या, याच वर्षी युनायटेड स्टेट्समध्ये हिंदी क्रांतिकारकांची एक संस्था स्थापली गेली आणि याच वर्षी हिंदुस्थानातील भीतीप्रद चळवळीला सुरुवात झाली.

या स्थळी ही गोष्ट लक्षात बाळगणे अवश्य आहे की, ज्यावेळी मी क्रांति आणि क्रांतिकारक हे शब्द वापरले त्यावेळी त्यांचा उद्दिष्ट अर्थ राष्ट्रीय क्रांती हाच मात्र आहे. निव्वळ शाब्दिक अर्थाने, हिंदुस्थानांतील भयप्रद वा राष्ट्रीय चळवळींना क्रांतिकारक चळवळी म्हणता येणे शक्य नाही. युरोपमध्ये क्रांती नि क्रांतिकारक या शब्दांना आर्थिक, सामाजिक महत्व आलेले आहे. परंतु युरोपिय युद्धान्तापर्यंत नि रशियातील क्रांती विजयी होईपर्यंत हिंदी निर्वासितांत फक्त पांच किंवा सहाच समाजसत्तावादी (socialists) होते.

## विद्यार्थ्यांची बहुसंख्या

१९०५ नंतरच्या काळात बरेच हिंदी लोक चीन, जपान, अमेरिका, फ्रान्स नि युरोपातील इतर देश यामध्ये निर्वासनांत रहात असलेले आढळून येतात. उदाहरणार्थ फ्रान्स नि इंग्लंड या देशात पुष्कळ व्यक्ती अशा होत्या की, ज्या हिंदी स्वातंत्र्यार्थ यत्न केल्यामुळे निर्वासित बनल्या. या दोन्ही देशांत गुप्त हिंदी क्रांतिकारकांचे फार मोठे संघ होते. यापैकी बहुतेक विद्यार्थी होते. हिंदुस्थानातील प्रौढ वर्ग अजूनही इंग्लंडजवळ दीनपणे भाकरीच्या तुकड्याकरिता याचना करीत होता. परंतु तरुण वर्ग याचना वृत्तीने संतुष्ट नव्हता. आपल्या गुप्त संघटनाद्वारा त्यांनी द्रव्य जमविले. गुप्त क्रांतिकारक वृत्तपत्रे प्रसिद्ध केली आणि हिंदुस्थानांतील विश्व विद्यालये असलेल्या नगरांतून गुप्तपणे प्रसृत केली. यापैकी एका वृत्तपत्राचे नाव तलवार असून (ते अभिनव भारताचे मुखपत्र होते.) ते निघाल्यास आज १५ ते २० वर्षे झाली; परंतु ते आजही वाचले असता त्यातील काही लेख आश्चर्य उत्पन्न केल्यावाचून रहात नाहीत. आंतरराष्ट्रीय राजकारण नि आर्थिक विकास यासंबंधीचे या पत्राचे ज्ञान इतके उत्कृष्ट होते की, कोणालाही असे म्हटल्यावाचून रहावत नाही की जर आंतर राष्ट्रीय कार्यासंबंधी हिंदुस्थान परदेशस्थ देशभक्तांवर अवलंबून राहिले असते, तर ते आज निश्चयाने पारतंत्र्यात रहाते ना. उदाहरणार्थ, १९०९ या वर्षी या पत्रात एक लेख होता. त्यात इंग्लंड नि जर्मनी यामधील वाढत्या कलहाच्या मिमांसेचे स्पष्टीकरण करण्यात आले होते की, भविष्यकाळात या दोन राष्ट्रात युद्ध निश्चयाने होणार नि ही संधी हिंदुस्थानला स्वातंत्र्यसिद्ध्यर्थ यत्न करण्यास उत्तम आहे. हा लेख म्हणजे युरोपमधील तत्कालीन राजकीय नि आर्थिक विकासाचे सुस्पष्ट नि जोरदार विवरण आहे. अशा प्रकारचे ज्यांचे ज्ञान नि सामर्थ्य मोठे आहे,

अशा क्रांतिकारक लोकांवर विश्वास न टाकल्यामुळे नि त्यांच्याबरोबर सहकार्य न केल्यामुळे हिंदुस्थानची कल्पनातीत हानी झाली आहे.

## स्वातंत्र्ययुद्धाचा पहिला इतिहास

इंग्लंडमधील हिंदी संघाने १८५७ मधील स्वातंत्र्ययुद्धाचा हिंदी दृष्टीने लिहिलेला पहिलाच इतिहास प्रकाशित केला. तो हॉलंडमध्ये गुप्तपणे प्रकाशित करण्यात आला. कारण सत्याचे ज्ञान ब्रिटिशांना नि ते सत्य प्रसिद्ध करणाऱ्यांना धोक्याचे असते. हिंदुस्थान नि इंग्लंड या दोन्ही देशांत अर्थातच गुप्तपणे त्याचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर झाला. या ग्रंथाचे कर्तृत्व इंग्लंडमधील हिंदी संघाचे प्रमुख श्री. विनायकराव सावरकर यांच्याकडे होते. आज त्या पुस्तकाला वाङ्मयीन नि ऐतिहासिक संशोधनात्मक मोठे मूल्य आहे. हिंदुस्थानचे जन्मसिद्ध शत्रू सर व्हेलेन्टाअन चिरोल यांनी या पुस्तकाविषयी आपला अभिप्राय दर्शित केला आहे. त्यांनी असे उद्गार काढले आहेत की, या पुस्तकात अतिशयोक्त संशोधन नि ऐतिहासिक गोष्टींची विपर्यस्तता, अतिशयित वाङ्मयीन सामर्थ्य नि अतिशयित रानटी द्वेष या गोष्टींचे एक मिलन आढळते आणि थॉमसनसाहेबांनी आपल्या अंडर साईड ऑफ दि मेडल नामक पुस्तकात श्री. सावरकरांच्या मेंदूवर त्यावेळी एका वेडेपणाचे प्राबल्य होते आणि असे पुस्तक जप्त होणे इष्ट असल्याकारणाने ते करण्यात आले असे म्हटले आहे. परंतु अशा इंग्लिश गृहस्थांनी केलेली निंदा आम्ही स्तुतीच समजतो. ज्याला ते विरोध करतात ते खरेच असले पाहिजे. ज्याच्या विरोधास आम्ही सत्याचे निदर्शक समजतो, हिंदी स्वातंत्र्ययुद्धाचा अत्यंत विपर्यस्त असा इंग्लिश गृहस्थांनी लिहिलेला नि हल्ली शाळा-कॉलेज यामधून शिकविण्यात येत असलेला इतिहास हिंदी वाचकांस १८५७ वर्षाचे हिंदी स्वातंत्र्यार्थ प्रयत्न करणारासंबंधी लाज वाटावयास लावतो. इतकेच नव्हे, तर या हुतात्म्यांना राजद्रोही समजण्याकडे त्यांचा कल वळवितो. हिंदुस्थानातील सर्व निर्वासितांचा नि क्रांतिकारकांचा हाच महान अपवाद आहे की त्यांनी आपल्या देशबांधवांना कोणत्याही स्वरुपातील गुलामगिरीचा द्वेष करण्यास नि हिंदी स्वातंत्र्यार्थ यत्न करण्यास शिकवले.

इंग्लंडमधील हिंदी क्रांतिकारक संघाचे सदस्य सर्व विश्वविद्यालयातून होते. ब्रिटिश सरकारचा असा त्यांजवर आरोप आहे की, त्यांनी पिस्तुले खरेदी केली नि हिंदुस्थानांतील भयप्रद चळवळीला साह्य करण्याच्या उद्देशाने ती हिंदुस्थानात घुसडून

दिली; कदाचित त्यांनी तसे केलेही असेल. त्याच्यापूर्वी अमेरिकन क्रांतिकारकांनी तेच केले होते. एवढेच अंतर की त्यांनी ती मोठ्या प्रमाणावर फ्रान्समधून हस्तगत केली नि अमेरिकेतील क्रांतिकारकांकडे पाठवून दिली. अंतर केवळ प्रमाणाचे होते.

## मदनलाल धिंग्रा

१ जुलै १९०९ या दिवशी लंडनमधील हिंदी (अभिनव भारत) क्रांतिकारक संघापैकी एक सभासद श्री. मदनलाल धिंग्रा याने हिंदी विद्यार्थ्यांविरुद्ध उपयोगिण्यात येत असलेल्या ब्रिटिश गुप्त हेरांचा मुख्य ना. कर्झन वायली यांना लंडन नगरात ठार केले. धिंग्राला १७ ऑगस्ट रोजी लंडनमध्ये फाशी देण्यात आले आणि त्याच्या देशबांधवांनी त्याच्या अंत्यविधीसंबंधी केलेली मागणी नाकारुन त्याला कारागृहाच्या आवारात पुरण्यात आले. तो उन्नत शिर असा वधस्तंभाकडे गेला आणि त्याला साह्य करण्यास पुढे आलेल्या लोकांशी हस्तांदोलन करुन आपणाला मृत्युचे मुळीच भय वाटत नसल्याचे त्यांने सांगितले. वधस्थानाजवळ उभा असतांना त्याला काही सांगावयाचे होते काय अशी पृच्छा करण्यात येताच तो वंदे मातरम् असे गर्जला! केवळ एकाच हिंदी गृहस्थाला उपस्थित असण्याची परवानगी दिलेली होती नि तो ब्रिटिश सरकारचा हेर होता. परंतु धिंग्राचे मनोधैर्य पाहून त्याच्यावरही विलक्षण परिणाम झाला.

यानंतर ब्रिटिश सरकारने लंडनमधील हिंदी लोकांविरुद्ध मोहिम सुरू केली. पुष्कळ लोकांना फ्रान्समध्ये पळून जावे लागले नि ते आजही युरोपातच आहेत. सावरकरांना इंग्लंडात पकडण्यात आले नि हिंदुस्थानामध्ये चौकशीसाठी पाठविण्यात आले. बोट मार्सेल्स बंदरात असता त्यांनी मोठ्या धाडसाने नि कौशल्याने आपली सुटका करून घेतली नि ते फ्रान्सच्या किनाऱ्यावर पोहून गेले. आंतरराष्ट्रीय कायद्याने (निर्बंधाने) त्यांना आश्रयाचा अधिकार होता. परंतु ब्रिटिशांनी त्यांचा पाठलाग करुन त्यांना पकडले आणि आंतरराष्ट्रीय निर्बंधाचा भंग करून हिंदुस्थानचा सैबिरियाच अशा अंदमान बेटात दोन जन्मठेपीची शिक्षा दिली. ट्यूबरक्यूलॉसिसचा अतिशय उपद्रव झाल्याकारणाने त्यांना दोन वर्षापूर्वी मुक्त करण्यात आले असून ते हल्ली मुंबई इलाख्यातील रत्नागिरी नावाच्या नगरात दृष्टीबंदीत आहेत. सावरकरांच्या सहकाऱ्यांपैकी ना. व्ही. व्ही. एस्. अय्यर नंतर पाँडेचरी (फ्रेंच हिंदुस्थान) येथे रहात असत. त्यांना सरकारने पुढे क्षमा केली नि ते आपल्या देशबांधवांची सेवा करीत असता सुमारे दीड वर्षापूर्वी त्यांचा मोठा दुःखद रितीने अंत झाला.

## फ्रान्समधील अभिनव भारताची शाखा

याचवेळी म्हणजे सावरकर शिक्षा भोगीत असतानाच हिंदुस्थानातील इतर माणसांनाही दहा-दहा, पंधरा-पंधरा वर्षांच्या शिक्षा देऊन अंदमानला पाठविण्यात आले. परंतु या ठिकाणी फक्त परदेशस्थ क्रांतिकारकांचाच इतिहास कथन करावयाचा असल्यामुळे मी त्यांच्याविषयी काही सांगत नाही.

ज्या काळात इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थी चळवळ करीत होते. त्याच काळात तसल्याच प्रकारची संस्था फ्रान्समध्ये अभिनव भारताच्या सभासदांकडून चालविली जात होती. या संघाचे प्रमुखत्व मॅडम कामा नावाच्या हिंदी स्त्रीकडे होते. ह्या बाई आजही (सन १९२७ मध्ये) पॅरिसमध्ये वृद्धावस्थेत आहेत. फ्रान्समधील संघाने वन्दे मातरम् नावाचे क्रांतिकारक वृत्तपत्र प्रसिद्ध करुन, हिंदी तरुणांना चळवळीला प्रवृत्त करण्याच्या हेतूने हिंदुस्थानातील नि परदेशातील हिंदी विद्यार्थ्यांत मॅडम कामा ह्या सुस्थितीतील स्त्री होत्या. आणि फ्रान्समधील कार्याला त्यांनी पुष्कळ आर्थिक साह्य केले. काही काळानंतर इंग्लंडमधून आश्रयार्थ आलेले हिंदी तरुण संघाबरोबर कार्य करू लागले. फ्रेंच संघाने सुद्धा इजिप्तमधील राष्ट्रीय चळवळींशी सहकार्याने कार्य चालविले होते. इजिप्त राष्ट्रीय पक्षाची ब्रुसेन्स येथे दुसरी काँग्रेस इ.स. १९१० मध्ये भरली असता; हिंदी लोकांनी उत्साहाने कार्य केले. आयरिश प्रतिनिधीही उपस्थित होते. आणि त्यांनी महत्वाचा भागही तीत घेतला होता.

या गोष्टीचाही मला निर्देश केला पाहिजे की, इंग्लंड नि फ्रान्स येथील हिंदी राष्ट्रीय क्रांतिकारक आयरिश क्रांतिकारकांबरोबरही कार्य करीत असत आणि पुष्कळ आयरिश स्त्री-पुरुष यांच्या विश्वासू मित्रापैकी होते.

## जपान आणि चीनमधील चळवळी

इ.स. १९१२ मध्ये लॉर्ड हार्डिंग्ज दिल्ली राजधानीत प्रवेश करीत असता, त्याजवर बॉब फेकण्यात आला. मोठमोठी बक्षिसे लावण्यात आली परंतु तो अपराधी पकडला गेला नाही. तो जपानमध्ये पळून गेला आणि तेथून त्याने स्वदेशाच्या स्वातंत्र्यार्थ कार्य सुरू ठेविले. याचवेळी चीन नि जपान या देशातील पुष्कळ माणसे स्वभाषेत वृत्तपत्रे प्रसिद्ध करून ती हिंदुस्थानात गुप्त रीतीने घुसडून देण्याची चळवळ करीत

होते. यापैकी एका वृत्तपत्राचे नाव न्यू इस्लाम असे होते. याचा संपादक एक हिंदी मुसलमान असून तो हिंदू मुसलमानांच्यात राष्ट्रीयत्वाची जाणीव निर्माण करून देऊन, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यार्थ प्रयत्न करण्यासाठी त्यांना प्रवृत्त करण्यास झटत होता.

ज्या ज्या चीनमधील शहरातून ब्रिटिशांकडून चिनी लोकांना दास्यात ठेवण्यात हिंदी सैनिकांचा उपयोग करून घेण्यात येत असे, त्या त्या ठिकाणी आपला अशा प्रकारे उपयोग करून देण्यात ते केवढे अक्षम्य पाप आचारीत होते, याची त्यांना जाणीव करून देण्याच्या कामी हिंदी चळवळ्ये पुष्कळ मेहनत घेत होते.

इ.स. १९११ मध्येसुद्धा हिंदी क्रांतिकारकांचा आणि निर्वासितांचा नवीनच वर्ग उदयास आला होता. आर्थिक अडचणीमुळे उत्तर हिंदुस्थानातील बराच मोठा शेतकरी वर्ग युनायटेड स्टेट्स आणि पश्चिम कॅनडा या प्रांतात गेला होता. याच वेळी शांघाय किंवा सिंगापूर या ठिकाणी बंड केलेल्या किंवा नोकरी सोडून गेलेल्या लष्करी शिपायांचा तांडा याच देशात गेला होता. त्यांनी या शेतकरीवर्गामध्ये क्रांतीचे बीज पेरून दिले. १९११ ते १९१३ पर्यंत सुमारे ५००० शिपाई नि शेतकरी मिळून अमेरिकेत गेले. सुशिक्षित निर्वासित हिंदी लोकांनी त्यांची हिंदुस्थान गदरपार्टी नावाची सुसंघटित संस्था स्थापून त्यांना राष्ट्रीय स्वातंत्र्यविचाराचे शिक्षण दिले. हा पक्ष हिंदुस्थाना-बाहेरील हिंदी क्रांतिकारकांचा एक महत्वाचे केंद्र होते. शरीराने मजबूत, निर्भय, साध्या राहणीच्या अशा ह्या नोकरांनी आपल्या चळवळीच्या योगाने हे स्पष्ट केले आहे की, हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळणे शक्य असेल तर शेतकरी, मजूर, शिपाई याजकडूनच मिळवले जाईल. इ.स. १९१४ मध्ये झालेल्या कोमागाटा मारू चळवळीशी याच लोकांचा संबंध होता. कॅनडामध्ये असा एक कायदा होता की, प्रत्यक्ष हिंदुस्थानहून थेट कॅनडापर्यंत प्रवास करणाऱ्या गलबतातून आलेल्या हिंदी लोकांनाच फक्त कॅनडात प्रवेश करता येईल. अशा प्रकारचा मार्गच अस्तित्वात नसल्यामुळे सरदार गुरूदत्तसिंगांच्या नेतृत्वाखाली या क्रांतिकारकांनी वर उल्लेखिलेले जपानी जहाज करारा ने मिळवून कॅनेडियन निर्बंधाला धाब्यावर बसविण्याकरिता त्यातून प्रवास केला. पोलिसांनी त्यापैकी बऱ्याच पुढाऱ्यांना पकडून त्यांना भूमी वर उतरविण्याची परवानगी नाकारण्यात आली. उकळते पाणी त्याच्या डोक्यावर ओतण्यात आले आणि त्यांना हिंदुस्थानात परत जाण्यास भाग पाडले गेले. हिंदुस्थानात त्यांना सैन्याने पकडून गुन्हेगार या दृष्टीने त्यांना वागविण्यात आले.

आणि याला प्रतिकार करीत असता त्यापैकी पुष्कळांना रस्त्यात गोळ्या घालून ठार करण्यात आले.

अमेरिकेत गेलेले हिंदी लोक प्रथम अगदीच अशिक्षित होते; इतरांच्या किंवा स्वतःच कराराने घेतलेल्या शेतावर ते मजुराची कामे करीत असत. ते अत्यंत साध्या तऱ्हेने राहत असत आणि पैसा संग्रही टाकीत असत. परंतु त्यांचा सर्व पैसा ते पाहिजे त्या वेळी राष्ट्रकार्याकरिता विनियोग करण्यासाठी देत असत आजसुद्धा सॅन्फ्रान्सिस्को नगरात, वुड स्ट्रीट क्रमांक ५ येथे त्यांच्या मालकीचे भवन असून त्यामध्ये एक वाचनालय नि उर्दू, हिंदी आणि गुरुमुखी भाषातील मुद्रणालये आहेत. ते पुष्कळ काळपर्यंत या भाषातून वृत्तपत्रे प्रसिद्ध करीत असत. महायुद्धाचे (सन १९१४) काळात ही संघटना एका महत्वाच्या कार्याचे केंद्र होती."

**लेखन १९२७**

**पुनः प्रसिद्ध**

**- दैनिक मराठा**

**५ मे १९६३**

# हिंदी क्रांतिकारकांची परदेशीय चळवळ

(उत्तरार्ध)

"महायुद्धाच्या प्रारंभी जर्मनीत राहणाऱ्या बऱ्याच हिंदी लोकांना, त्यापैकी काही लंडनमधील जुन्या क्रांतिकारकापैकी होते, असे वाटू लागले की, हिंदुस्थानचे स्वातंत्र्य मिळविण्याकरिता ह्या संधीचा लाभ घ्यावा. हिंदुस्थान जरी निःशस्त्र असले तरी १९१५ मध्ये निर्माण झालेली क्रांतीची वृत्ती इतकी तीव्र होती की, शस्त्रे नि दारूगोळा पुरविल्यास हिंदुस्थानात क्रांतिकारक चळवळ यशस्वी होईल असे त्यास वाटू लागले. म्हणून त्यांनी ती पुरविण्याचा प्रयत्न केला.

त्यांनी कार्याची दिशा ठरवून जर्मन सरकारशी सहकार्य करण्याचे ठरविले. जगाच्या सर्व भागातील क्रांतिकारकांची त्यांनी बर्लिन येथे सभा बोलाविली. सर्व स्थलाचे क्रांतिकारक बर्लिन येथे सम्मीलित झाले आणि जे येण्याला प्रतिबंधित होते त्यांनी आपली सहकार्य करण्याची इच्छा व्यक्त केली. यामध्ये सर्व प्रकारच्या राजकीय नि सामाजिक मतांचे हिंदी लोक होते. परंतु त्या सर्वांचा, ज्या ज्या उपायाने स्वातंत्र्यसंपादन शक्य असेल. त्या त्या साधनांचा नि उपायांचा अवलंब करण्यासंबंधाने विश्वास होता. जर्मन सरकार यावत्काल उपाययोजना, कार्यक्रम इत्यादी विषयात त्यांना पूर्ण स्वातंत्र्य देण्यास सिद्ध होते, यावत् कालापर्यंत त्या सरकारशी सहकार्य करण्यास ते सिद्ध होते त्यांनी इंडियन इंडिपेडन्स कमिटी ऑफ युरोप (युरोपीय हिंदी स्वातंत्र्य समिती) नावाची संस्था स्थापन केली आणि हिंदुस्थान स्वतंत्र होईल तेव्हा परत द्यावयाचे अशा अटीवर त्यांनी जर्मन सरकारकडून काही कर्जही घेतले असेही म्हणतात. आपल्या सर्व कार्यक्रमांमध्ये आणि चळवळीमध्ये त्यांना संपूर्ण स्वायत्तता होती. ते जर्मनीचे हस्तक म्हणून कार्य करीत नव्हते. ज्या ज्या वेळी त्यांना अपेक्षा असे त्या त्या वेळी जर्मन सरकारने त्यांना सैनिक आणि इतर सर्व प्रकारचे साह्य दिले. त्यांनी इंग्लंडविरूद्ध तीव्र आंतरराष्ट्रीय चळवळ सुरू केली. त्यांनी इराण, अफगाणिस्थान, चीन, तुर्कस्थान, स्वित्झलर्ंड, इंग्लंड, स्वीडन, मेक्सिको, आयर्लंड, अमेरिका प्रत्येक ठिकाणी जेथे जेथे शक्य झाले तेथे तेथे हिंदी राष्ट्रीय संस्था, संघ वा व्यक्ति यांच्याशी सहकार्य करून शक्य तितकी चळवळ केली. त्यांनी हिंदुस्थानात अस्तित्वात असलेल्या क्रांतिकारकांशी शस्त्रे नि दारूगोळा कशा तऱ्हेने पाठवावा याविषयी विचार विनिमय

करण्याकरिता संघटक पाठविले. हिंदुस्थानात जाऊन पोहोचण्याच्या उद्देशाने त्यांनी अफगाणिस्थान नि इराण या देशातून पुष्कळ टोळ्या पाठविल्या. परंतु त्या कधीच हिंदुस्थानला पोहोचल्या नाहीत. त्यापैकी अतिशय शूर आणि निधड्या छातीचे असे कित्येक वीर लढले; परंतु शेवट ते पकडले गेले आणि ब्रिटिश सरकारने त्यांना फाशी दिले, युरोपमधील हिंदी समितीने अमेरिकेतील गदर पक्षाचे द्वारा अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्याकडून शस्त्रांनी भरलेल्या दोन नौकाही पाठविल्या, परंतु त्यासुद्धा पकडण्यात आल्या. या ठिकाणी या गोष्टीचा उल्लेख करणे इष्ट आहे की, ज्या आज इतिहास म्हणून गणल्या जात नाहीत अशा कोणत्याही गोष्टी या स्थळी सांगत नाही. या गोष्टी क्रांतिकारकाविरूद्ध युद्धात इंग्रजांनी विपर्यस्त स्वरूपात सांगितल्या आहेत. मी केवळ मला माहित असलेले सत्यकथन करीत आहे. अमेरिकेतून इ.स. १९१५ साली बंदुका पाठविण्यात आल्या आणि पुढे जेव्हा अमेरिका युद्धात पडली, तेव्हा इंग्लडने त्यांना संशय असलेल्या सर्व हिंदी लोकांची अमेरिकेकडे मागणी केली. ब्रिटिशांची गुप्त हेर संस्था बरीच चांगल्या प्रकारची असून त्यांच्याजवळ बहुतेक सर्व लोकांची नावे नि पत्ते होते. त्यांनी अमेरिकेचे तटस्थ वृत्तीचे निर्बंध मोडल्याशिवाय या लोकांना बद्ध करावे अशी मागणी केली. आणि ती अमेरिकेकडून पुरविण्यात आली.

इंग्लंडने अमेरिकेच्या तटस्थ वृत्तीच्या या दिवसात स्वतःच तटस्थ वृत्तीचे निर्बंध सैनिक सज्ज करून त्यांना दारूगोळा पुरवून, त्यांना इंग्लंडला पाठवून उल्लंघिले होते. हिंदी लोकांनी याहून अधिक काहीच केले नव्हते. खरे पाहिले तर इतके सुद्धा केले नव्हते.

दोघांनीही अमेरिकेच्या तटस्थ वृत्ती निर्बंधाचे उल्लंघन केले होते. परंतु केवळ हिंदी लोकांना बंदिवान करून शिक्षा देण्यात आली. त्यांनी जे कार्य केले ते हिंदवी स्वातंत्र्याकरिता केले; ब्रिटिशांनी जे काही केले ते इतरांना दास्यबद्ध करण्यासाठी केले.

याच काळात दिल्ली, लाहोर, बनारस, मंडाले इत्यादी ठिकाणी कट केल्याच्या आरोपावरून कित्येक लोक पकडले गेले नि त्यांची चौकशी करून त्यापैकी पुष्कळांना फाशी देण्यात आले. नक्की संख्या मला माहीत नाही. परंतु ते पुष्कळ होते; पाच-दहा या ठिकाणी, दहा-वीस त्या ठिकाणी याप्रमाणे ते फाशी दिले गेले. आणखी कित्येकांना बऱ्याच वर्षांचे मुदतीने अंदमानला पाठविण्यात आले. या ठिकाणी मी हे

सांगणे आवश्यक आहे की मृत्यूच्या द्वारी उभे असतानासुद्धा हिंदी क्रांतिकारकांचे वर्तन पूर्वीच्या चळवळीत होते तितकेच धीरोदात्त होते. ज्यावेळी त्यांनी स्वातंत्र्य चळवळीला आपणाला वाहून घेतले, तेव्हा कदाचित यात आपल्याला मृत्यूलाही आलिंगावे लागेल हे त्यांना माहीत होते. प्राणापेक्षाही मूल्यवान अशा वस्तु जगात असतात!

युरोपातील हिंदी स्वातंत्र्य-समिती ने जर्मनी नि तुर्कस्थान येथे पकडण्यात आलेल्या हिंदी सैन्यातील बंदीवर्गामध्ये शिक्षणप्रसाराचे कार्य चालविले. त्याचे कार्याचे महत्वाचे केंद्र कॉन्स्टँटिनोपल नगर होते आणि ते तुर्की सरकारशी सहकार्य करून कार्य चालवीत होते.

इराणातील लोकांनी शस्त्राचा अंगीकार करून दक्षिणेतील इराणी टोळ्यांशी ते इंग्लंडविरूद्ध लढले. मी पूर्वीच उल्लेखिलेला सुफी अंबाप्रसाद त्याच्यामध्ये होता. त्याचे वय ६० वर्षांपेक्षाही अधिक होते नि त्याचा एक हात तुटलेला होता. परंतु तो डाव्या हाताने नेम धरण्यास शिकला होता. तो बंदूक बाळगीत असे आणि अत्यंत शूर लढवय्यापैकी तो एक होता. तो तेव्हाच कार्यनिवृत्त झाला की जेव्हा ब्रिटिश सरकारने त्याला पकडून दक्षिण इराणातील एका किल्ल्यात फाशी दिले. त्याने आपल्या मित्रांना शेवटचा निरोप एका जीर्ण इराणी वृत्तपत्राच्या समासात लिहून कळवला. तो हिंदीत असून खालीलप्रमाणे होता. मी माझे कर्तव्य केलेले आहे. माझा अंत समीप आला आहे. तुम्ही तरुणांनी हिंदुस्थान स्वतंत्र होईपर्यंत हे युद्ध चालविले पाहिजे.

युद्धकालात चीनमधील क्रांतिकारकांनासुद्धा क्षणोक्षणी जीवित संशयात राहून, शांघाय, हाँगकाँग, कँटन येथील सैनिकात चळवळ चालू ठेवून आपले कर्तव्य बजाविले त्यांना यश आले नाही याला कारण हिंदुस्थानाचे दारिद्र्य की ज्यामुळे त्यातील रहिवाशांना आपल्या कुटुंबाला अन्न मिळावे म्हणून १५ रूपयाकरिता सैनिक नोकरीत शिरावे लागले.

युरोपीय हिंदवी समितीने युरोप नि अमेरिका येथील जनतेत हिंदुस्थानाविषयी माहितीचा पुष्कळ प्रसार केला. त्यांनी निरनिराळ्या भाषातून हजार-हजारांनी पुस्तके, हस्तलिखित आणि लेख छापिले. युरोप नि अमेरिका येथील लोकांना हिंदी लोकांची

आज इतकी माहिती आहे याला कारणीभूत निर्वासितांबरोबर ज्या परकीयांनी कार्य केले त्यामध्ये पुष्कळ आयरिश स्वीड्स, जर्मन आणि अमेरिकन लोक होते

मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे अमेरिकेत हिंदुस्थान गदर पक्षातील पुष्कळ सदस्य नि इतरही हिंदी गृहस्थ कारागृहात बद्ध केले गेले होते ते कारावासात असतानाच त्यांचे कार्य चालू ठेवण्यासाठी आणि त्यांना भेडसावीत असलेल्या निर्वासनाला प्रतिबंध करण्यासाठी एक मंडळ अमेरिकनांनी स्थापन केले. इंग्लंडने या लोकांना हिंदुस्थानला पाठविण्याविषयी अमेरिकेला कळविले होते आणि याचा अर्थ त्यांना देहान्त शासन मिळावयाचे होते हा होता. आमच्यातील पुष्कळ लोकांनी राजकीय अपराध्यांना आश्रय देण्यासंबंधीचा हक्क अबाधित राखला जावा म्हणून प्रयत्न केला. या मंडळाचे नाव फ्रेंडस् ऑफ फ्रीडम फॉर इंडिया (हिंदवी स्वातंत्र्याचे मित्र) असे होते. या मंडळाने हिंदी लोकांच्या संरक्षणासाठी सोशॉलिस्ट, आयरिश चळवळी संघटित केल्या आणि व्याख्यान नि लेख द्वारा ज्या ज्या ठिकाणी शक्य झाले त्या सर्व ठिकाणी स्त्रियांचे संघ, विद्यार्थी संघ इत्यादी चळवळ केली. पुष्कळ स्वतंत्र हिंदी बुद्धिमान पुरूषांनी त्यात भाग घेतला होता. या मंडळाचा महत्वाचा उद्देश हिंदी लोकांना हिंदुस्थानला परत पाठविले जाण्याच्या विरूद्ध प्रयत्न करणे आणि दुसरा या व्यक्तींनी जे शिक्षणाचे कार्य चालू केले होते ते पुढे चालू ठेवणे हा होता. आणि शेवटी सर्व हिंदी लोक बंधमुक्त करण्यात आले.

शेवटी युद्ध संपले! हिंदुस्थानने बंड केले नाही! फारच थोड्या बंदुका हिंदुस्थानात येऊन पोहचल्या होत्या. ज्या विमानादी साधनांचा जर्मनीविरूद्धच लढण्याला उपयोग केला जात होता. तीच साधने आता हिंदुस्थानातील स्वातंत्र्य इच्छा नाहीशी करून टाकण्याकरिता उपयोगात आणली गेली अखिल हिंदवी क्रांतिकारकांच्या चळवळीचा हा विशेष आहे की युद्ध समाप्तीनंतर या चळवळीची नोंद परदेशी न रहाता आता खुद्द हिंदुस्थानात आहे ही गोष्ट अत्यंत महत्वाची नि चांगली आहे. हिंदी तरूण आपल्या विचारांसाठी वा कल्पनांसाठी परदेशी लोकांवर अवलंबून नाहीत. हिंदुस्थान हा बाह्य जगाहून असंबद्ध असा देश आहे नि हिंदुस्थानला बाह्य जगाविषयी माहिती पुरविण्याचे कार्यात निर्वासित लोक हे अजूनही महत्वाचा असा संघ आहेत. हिंदी निर्वासितांपैकी बहुतेक व्यक्तींना हिंदुस्थानातील अत्यंत मोठ्या अशा पुढाऱ्यांपेक्षा देखील हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळण्याला कोणत्या राजकीय आणि आर्थिक शक्ती कारणीभूत होऊ शकतील हे अधिक चांगले माहीत असते. बहुतेक हिंदी पुढारी

इंग्लिश शिक्षणामुळे किंवा जगात चालू असलेल्या चळवळीचे अज्ञानामुळे इंग्रजांवर अवलंबून राहिल्याने संभ्रमितबुद्धी झाले आहेत. हिंदी निर्वासित व्यक्ती अनेक देशात रहात असल्यामुळे नि त्यांना त्या देशातील भाषा येत असल्यामुळे त्यांना जगाच्या हालचालीकडे हिंदी उपनेत्रांतून बघता येते. परंतु पुष्कळ हिंदी पुढाऱ्यांना जगाच्या चळवळीकडे इंग्लिश उपनेत्रावाचून इतर दृष्टीने पहाणे धोक्याचे नि कमीपणाचे वाटत असते. आणि ठेवला गेलेला हिंदुस्थान हा बाह्य जगाशी वियुक्त असा देश आहे अशी त्यांची वेडगळ समजूत झालेली असते. उदाहरणार्थ नवीन चिनी सरकारासंबंधीची वार्ता हिंदुस्थानात येऊ दिल्या जातात. परिणामतः हिंदुस्थान अज्ञानी नि आध्यात्मिक दास्यबद्ध आहे. इतक्या अडचणी असूनसुद्धा आर्थिक शक्ती कार्य करीतच आहेत आणि सांघिक क्रांतीची चळवळ उत्पन्न करीत आहेत.

इ.स. १९१७ मधील रशियन क्रांतीपासून आणि युद्धसमाप्तीपासून हिंदी निर्वासित पूर्वीप्रमाणे संघटित नाहीत असे दिसून येते याचे कारण मुख्यतः हे की जगातील मुख्य चळवळ आज वर्गविषयक (भांडवल वाले नि कामकरी इत्यादी) आहे. रशियातील प्रांत आणि सर्व जगभर पसरलेली समाजसत्तावादी सोशालिस्ट चळवळ यामुळे ज्यांची मने अजून अनिश्चित आहेत, असे हिंदी लोक पुन्हा एकदा आपली आयुष्य विषयक विचारसरणी शोधून सुधारीत आहेत. या कारणामुळे ते एकत्रित नाहीत. त्याच्यांमध्ये अराजकापासून सामाजिक उदारमतवाद्यांपर्यंत सर्व प्रकार आहेत. उदाहरणार्थ जर्मनीतील राईट पार्टीज ज्या स्वतःच साम्राज्यवादी आहेत; अशा प्रकारच्या लोकांना सामान्य जनसमूहाबद्दल काहीच सहानुभूती नसते. सोशिॲलिझम ची कोणतीही चळवळ व्यापार संघस्थापना आदी गोष्टी म्हणजे कालाचा अपव्यय त्यांना वाटतो. त्यांच्या मताने सामान्य जनता म्हणजे हीन प्रतीचे प्राणी!

हिंदी निर्वासितांपैकी अराजक किंवा समाजसत्तावादी (Syndicalist) चळवळ करणारे उत्साही लोक बहुतेक लेखक आहेत. इंग्लंडमध्ये काही हिंदी लोक आहेत, ते सोशल डेमोक्रॅट असून ब्रिटिश लेबर पार्टीमध्ये काम करतात. ते निर्वासितांपैकी नाहीत. कारण असले लोक इंग्लंडला कधीच भयंकर नसतात. इंग्लंडमध्ये तीन-चार हिंदी कम्युनिस्टही आहेत नि ते ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षात समाविष्ट आहेत. यापैकी लेबर मंथली (Labour Monthly) नावाचे मासिकाचा संपादक हा खरोखरीच मोठा कर्तृत्वान आणि विद्वान गृहस्थ आहे. दुसरा एक ब्रिटिश पालर्मेंटचा सभासद आहे.
मेक्सिकोमध्ये बरेच हिंदी निर्वासित लोक आहेत. परंतु ते हिंदी चळवळीत फारसे लक्ष घालीत नाहीत. तथापि त्यापैकी बरेच जण अमेरिकन नि ब्रिटिश

साम्राज्याविरूद्ध झगड्यात मेक्सिकन लोकांबरोबर सहकार्य करतात. आणि ते या किंवा त्या वर्गातील (Socialist सोशॅलिस्ट) समाजसत्तावादी आहेत.

तुर्कस्थान, इराण नि अफगाणिस्थान या देशामध्ये बरेच हिंदी क्रांतिकारक लोक आहेत. त्यापैकी काही त्या देशातील रहिवासी बनले आहेत. तरीसुद्धा ते हिंदी व्यक्ती या नावाने ब्रिटिश साम्राज्याविरूद्ध चळवळी करीत असतात. अफगाणिस्थान हा गेली कित्येक वर्षे क्रांतिकारकाच्या आशेचे स्थान होऊन बसला आहे. तो हिंदुस्थानच्या वायव्य सीमेवर असल्यामुळे क्रांतिकारकांनी इंग्लंडविरूद्ध चळवळीना आधार स्थान म्हणून त्याचा उपयोग करावा हे साहजिकच आहे.

हिंदी क्रांतिकारक लोकांपैकी बरेच लोक मास्को नगरी राहतात. त्यापैकी काही इंडियन कम्युनिस्ट पक्षाचे सभासद असून, त्यांचे प्रतिनिधी आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट संस्थेमध्ये आहेत. हिंदुस्थान गदर पक्षातील काही सभासदही मास्को येथे रहातात. रशियन क्रांतीपासून हिंदुस्थान गदर पक्ष कम्युनिझकडे वळलेला दिसतो. मास्को येथील हिंदी कम्युनिस्ट पक्ष इंग्रजी भाषेमध्ये दि मासेस ऑफ इंडिया या नावाचे मासिक प्रसिद्ध करीत असतो. ते चांगल्यापैकी चर्चात्मक वृत्तपत्र आहे. ते लहान आहे आणि त्याचे धोरण बहुतेक बौद्धिक आणि चर्चात्मक आहे. त्याच्या काही प्रती कधी कधी हिंदुस्थानात जातात, परंतु ते जप्त करण्यात आलेले आहे. हिंदुस्थानात सुद्धा एक कम्युनिस्ट पक्ष आहे आणि तो लहान असला तरी कार्यकर आहे. असल्या संस्थाच्या चळवळी विषयी काही लिहीण्याचा मला अधिकार आहे असे वाटत नाही.

इ.स.१९१०-११ मध्ये हिंदी तरूणांची एक टोळी, आशियातील ब्रिटिश सत्तेविरूद्ध एकत्रित नि संघटित विरूद्ध प्रयत्न करण्याकरिता रशियात मास्कोला गेली होती. परंतु यातून काहीच निष्पन्न झाले नाही. हिंदी लोकातील मतभेदामुळे हे घडून आले नाही असेच नाही तर कार्यक्रम काय नि कसा आखावा याचीच मुख्य पंचाईत होती. निरनिराळे सामाजिक मतवादी या सभेला उपस्थित होते आणि आंतरराष्ट्रीय कम्युनिस्टांचा कार्यक्रम स्वीकारण्याचे बऱ्याच जणांनी अमान्य केले. त्यांना हिंदी परिस्थितीचे अनुरोधाने कार्य करावयाचे होते. त्यांना एकत्रित कार्यक्रमाला अवकाश सापडेना. यावेळी हिंदी क्रांतिकारकांना रशियाचा पाठिंबा आहे, असे इंग्लंडचे म्हणणे होते; परंतु ते खरे नव्हते लॉर्ड कर्झनच्या पत्रांना रशियन सरकारने जे आपण हिंदी क्रांतिकारकांना कोणत्याही प्रकारचा पाठिंबा देत नाही असे उत्तर दिले तेच बरोबर

होते. आजसुद्धा रशियात पुष्कळ कम्युनिस्ट आहेत, परंतु ते कोणत्याही कम्युनिस्ट पक्षात समाविष्ट नाहीत.

चीनमधील हिंदी क्रांतिकारक काय चळवळ करीत आहेत ते निश्चयात्मक सांगता येण्यासारखे नाही. क्रांतीच्या आरंभापासून कॅम्टन हॅंको आणि शांघाय येथे एका हिंदी मंडळाने चांगलीच कामगिरी बजाविली आहे. काही महिन्यापूर्वी कित्येक हिंदी सैनिक कामगारांवर खटले भरण्यात आले होते, ही गोष्ट अर्धातच हिंदुस्थानपासून लपवून ठेवण्यात आली होती. या एकाच गोष्टीवरून ते मंडळ आपले कर्तव्य उत्कृष्ट रीतीने करीत होते असे दिसून येते. शांघायमधून १८ जून रोजी आलेल्या एका तारेवरून असे कळते की, हरबतसिंग नावाच्या एका हिंदी क्रांतिकारकाने शांघायमधील हिंदी पोलिसांच्या मुख्याचा खून केला; आणि याबद्दल ब्रिटिश सरकारने त्याचेवर लष्करी खटला भरून त्याला देहान्त शासन दिले. अशीही वार्ता कळली आहे. की, काही महिन्यापूर्वी सुमारे ७० हिंदी पोलीस कॅंटन सरकारला जाऊन मिळाले. अगदी ताजी वार्ता अशी आहे की, एक संबंध पलटण त्यातील सैनिक विश्वासू नसल्याकारणाने हिंदुस्थानला परत पाठविण्यात आली. त्याचे जागी ब्रिटिश नि अमेरिकन सैनिक घेण्यात आले आहेत.

जपानमध्ये देखील हिंदी लोक जागे आहेत असे दिसते. तथापि ते सर्व जपानी मतांचे आहेत आणि स्वतः जपानीच साम्राज्यवादी आहेत. जपानमधील काही हिंदी लोक गेल्या ऑगस्ट महिन्यात भरविण्यात आलेल्या पॅन आशियाटिक परिषदेच्या कार्यात प्रमुख भाग घेत होते. हिंदी निर्वासित लोकांपैकीच एकजण या सभेच्या आद्य संस्थापकापैकी होता.

जर्मनीत, मी पूर्वीच सांगितल्याप्रमाणे अगदी उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंतची मतमतांतरे असणारे हिंदी लोक आहेत. यापैकी थोडेसे विद्यार्थी आहेत. गेल्या फेब्रूवारी महिन्यात ब्रुसेल्स येथे स्थापण्यात आलेल्या साम्राज्यसत्तावादाविरूद्ध संघात ते काम करतात या संघाच्या मूळ संस्थापकापैकी एकजण हिंदी निर्वासितापैकी होता. युरोप नि इंग्लंड येथील विद्यार्थी संघ, हिंदुस्थान गदर पक्ष याप्रमाणे हिंदी राष्ट्रीय सभेनेही आपला प्रतिनिधी या संघात पाठविला होता. जगातील बहुतेक सर्व प्रदेशात देशाच्या स्वातंत्र्यार्थ आपल्याकडून होईल तो प्रयत्न करणारे निर्वासित हिंदी आहेत. भविष्यकालात ते काय करतील हे मी सांगू शकत नाही. पुष्कळजण कदाचित्

आपला पूर्वीचाच कार्यक्रम चालवितील बरेचजण रशियाला इंग्लंडविरूद्ध युद्धात शक्य त्या साधनांनी साह्य देतील.

हिंदी क्रांतिकारकांचे चळवळीचे पाठीमागे इतिहास आहे आणि तो इतका वीरवृत्ती आहे की, त्याविषयी प्रत्येक हिंदवासीयाला अभिमानच वाटला पाहिजे. अद्याप त्याचा अभ्यास करण्याचे दृष्टीने काहीही करण्यात आलेले नाहीत. तथापि तो आज अस्तित्वात आहे आणि हिंदी लोक जगापुढे स्वतंत्र राष्ट्र म्हणून उभे राहीपर्यंत तो तसाच अस्तित्वात रहाणार”

- लेखन १९२७ पुनः प्रसिद्ध दैनिक मराठा १२ मे १९६३

# आगामी महायुद्धाची सुवर्णसंधी दवडू नका

## लेखांक १ ला

कोणतेही राष्ट्र जेव्हा एखाद्या परकीय बलाढ्य साम्राज्याच्या पारतंत्र्याच्या शृंखलेत जखडले गेले असते, तेव्हा त्यास त्या शृंखला तोडून स्वतंत्र होण्यासाठी सर्व संधीत जी अत्यंत अनुकूल संधि सांपडण्यासारखी असते ती तेव्हाच होय की, जेव्हा ते परकीय बलाढ्य राष्ट्र किंवा साम्राज्य त्याहूनही बलाढ्य अथवा समबल अशा कोण्या अन्य शक्तीशी निकराच्या युद्धात गुंतलेले असते. परकीय साम्राजाचे जे संकट तीच राष्ट्राची संधी होय. गेल्या महायुद्धात इंग्लंडच्या राजाने (Englands difficulty is Indias opportunity) असे जे प्रगटपणे जाहिर केले होते, याचा अर्थही हाच होतो. यासाठी प्रत्येक परतंत्र राष्ट्रास आपल्या अभ्युदयासाठी झगडत असताना जगातील इतर राष्ट्रांच्या उलाढालीकडे साधारणतःआणि ज्या साम्राज्याच्या जोखडाखाली ते वाकलेले असतात त्या साम्राज्याच्या शत्रुमित्रादिक शेजाऱ्यांच्या हालचालीकडे विशेषतः डोळ्यात तेल घालून बघावे लागते. त्या राष्ट्रांच्या न्याय्य मागण्या आपसातील तडजोडीने किंवा त्या एकट्याच्या बळावर जर त्या परकीय साम्राज्याकडून मान्य करण्यात आल्या नाहीत, तर जगातील राष्ट्राराष्ट्रामधील उलाढाली होता होता जेव्हा ते परकीय साम्राज्य कोण्या महायुद्धात फसेल, तेव्हा त्या परिस्थितीचा आपल्या शक्तीप्रमाणे लाभ घेऊन, त्या पेचात ते साम्राज्य आहे तोवर आपल्या मागण्या मान्य करून घ्याव्या लागतात. केव्हा केव्हा रोमन साम्राज्यातील पूर्वीच्या प्लेबियन आणि पॅट्रिशियन लोकांच्या उदाहरणाप्रमाणे किंवा पुढे नागरिक आणि दास यांच्या कलहाप्रमाणे हे अधिकार आणि ह्या मागण्या, परतंत्र राष्ट्र परकीय साम्राज्याकडून केवळ अडवून केवळ त्यांच्या शत्रूशी ते लढत असता साह्य देण्याचे नाकारून किंवा त्याचा शत्रू त्याच्याशी लढत असता आपणही त्याच्याशी अंतर्गत कलह उत्पन्न करून, त्या मागण्या मान्य करून घेऊ शकते. केव्हा केव्हा इटली, जर्मनी, अमेरिका इत्यादी राष्ट्रांप्रमाणे उघड उघड बंड करून आणि त्या साम्राज्याच्या शत्रूशी मैत्री जोडून त्या संमिलित शक्तीने आपले स्वातंत्र्य रणक्षेत्राच्या ताम्रपटाच्या आधारावर हे परतंत्र राष्ट्र स्थापू शकते.

राजकारणशास्त्राच्या या तत्वानुरूप प्रत्येक परतंत्र राष्ट्राने आपली अंतर्गत संघटना अशा बेताने आणि इतक्या आधीपासून केली पाहिजे की, त्या परकीय साम्राज्याचे दुसऱ्या कोणत्याही शक्तीशाली राष्ट्राशी युद्ध जुंपताच आपले साह्य ह्या किंवा त्या पक्षाला देता येण्याची समर्थता आंशिकतः तरी त्याचे अंगी उत्पन्न झाली पाहिजे. आणि ते साहाय्य या आणि त्या पक्षालाही हवेसे वाटावे, किंबहुना अपरिहार्य वाटावे, इतके प्रबळ असले पाहिजे. अशा प्रकारचे अंतःसंघटन करीत असताना त्या परतंत्र राष्ट्राने परराष्ट्रीय उलाढालीत आपल्या परिस्थितीत शक्य तो भाग घेऊन, प्रत्येक राष्ट्रात आपल्या पारतंत्र्यातील छळाची कहाणी सांगत राहिली पाहिजे. आपल्या स्वातंत्र्याच्या आकांक्षेची आणि प्रतिज्ञेची घोषणा निनादविली पाहिजे आणि त्या कार्यार्थ जी जी विद्या आणि जे जे सहाय्य त्या जगातील शत्रूमित्रादिक राष्ट्राकडून मिळविण्यासारखे असेल, ते ते मिळविण्यासाठी आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. जरी राष्ट्रीयरीत्या अधिकृत संधिविग्रह त्या परतंत्र राष्ट्रास करता आले नाहीत. तरीही बौद्धिक, शाब्दिक आणि मानसिक संधिविग्रह तरी त्याने इतर राष्ट्रांशी स्थापित करून, आपला असा एक मित्रसंघ उत्पन्न केला पाहिजे. ही सर्व सिद्धता परकीय साम्राज्याशी कोणत्या तरी महान् शक्तीचे युद्ध जुंपण्याचे पुष्कळ आधीपासून जर होत चालली, तरच काही फलद्रूपता होण्याचा संभव असतो. नाही तर त्या परकीय साम्राज्याशी इतर राष्ट्रांचे युद्धे जुंपून गेल्यानंतर, मग डोळे उघडल्याने त्याचा काहीच महत्वाचा लाभ होत नाही.

गेल्या जर्मन महायुद्धाचे वेळी हिंदुस्थानची हीच भयंकर चूक झाली. ते महायुद्ध सुरू होईतो त्याचा शक्य तितका उपयोग करून घेण्याची कोणातीही सर्वव्यापी आणि प्रबळ अशी खटपट करण्याची बुद्धी, हिंदुस्थानातील पुढाऱ्यांस झाली नाही. हिंदुस्थानातील काही क्रांतिकारक पक्षातील लोकांनी मात्र थोडी धडपड केली. हिंदुस्थानाबाहेरील क्रांतिकारक पक्षाने जगातील राष्ट्रात, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकांक्षेची घोषणा करून त्या महायुद्धात इंग्लिशांस अडविण्याची पराकाष्ठा केली. परंतु हिंदुस्थानातील कोट्यावधी लोकांना आणि त्यांच्या पुढाऱ्यांनादेखील अशा आंतरराष्ट्रीय राजकारणाचे महत्व ग्रहण करण्याचीही पात्रता नसल्याने, ती दिशाच त्यास अवगत नसल्याने, त्या मूठभर क्रांतिकारकांनी केलेल्या चळवळीस येऊ शकले असते तितके यश आले नाही.

तरीही त्या क्रांतिकारकांनी जिवापाड धडपड केली आणि त्या मूठभर लोकांच्या धडपडीनेही इंग्लंडला राष्ट्राराष्ट्राच्या झगड्यात अनेक वेळा पेचात सापडावे लागले;

अनेक वेळा लहान राष्ट्राच्या स्वातंत्र्यार्थ आम्ही लढलो म्हणून त्याने मारलेल्या बातांचे कपट उघड झाले, आणि शेवटी प्रेसिडेंट विल्सनला धाडलेल्या आंतरराष्ट्रीय महत्वाच्या सर्व जगाविषयक मागणीत जर्मन-मित्र संघाचे वतीने, स्वतः जर्मन कैसरने मागणी केली की युद्ध संपावयाचे असेल तर ज्या अटी इंग्रजानी पाळल्या पाहिजेत, त्यात हिंदुस्थानचे स्वातंत्र्य मान्य केले जावे ही ही अट असली पाहिजे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नास त्यादिवशी आंतराष्ट्रीय महत्व प्राप्त झाले हे फळही थोडे थोडके नव्हते. त्या घटनेचाच हाही एक महत्वाचा परिणाम झाला की, हिंदुस्थानच्या सहनशक्तीस तुटेल तो ताणणे धोक्याचे आहे, हे चाणाक्ष इंग्लिशांच्या लक्षात येऊन, त्यांनी सुधारणांचे एक दोन हप्ते तरी दिले आणि राष्ट्रसंघातील आंतराष्ट्रीय राष्ट्रमंडळात (League of nations) दिखावू का होईना, परंतु काही तरी महत्वाची मान्यता हिंदी राष्ट्रास देण्यात आली.

परंतु जर्मन महायुद्धासारख्या अत्यंत बिकट पेचात इंग्लंड सापडले असता, ज्या सामदामादिक उपायांनी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या आकांक्षा पूर्ण करण्याची संधी आपल्या हातून निसटून गेली, तशी यापुढील येणारी दुसरी एखादी संधी तरी निसटून जाऊ नये, म्हणून एव्हापासून सज्जता ठेवण्यास जरी आपण शिकलो, तरी देखील जर्मन महायुद्धाचे वेळी आपल्या राजकारणशून्यतेने झालेल्या हानीचा काही तरी वचपा आपण काढला असे होणारे आहे.

असे महायुद्ध म्हणजे स्वातंत्र्यसंपादनाची सुवर्णसंधी असते. अशी संधी शतकातून एखाद दुसरे प्रसंगीच जित राष्ट्रास लाभत असते. एकदा भाग्योदयाची अशी संधी गमाविली की, पुन्हा दास्याचे आयुष्यात रे रे करीत पन्नास पाऊणशे वर्षे दलित राष्ट्रास काढावी लागतात.

अशी एक सुवर्णसंधी जर्मन महायुद्धात गेली; पण राजकीय वातावरणात वाहू लागलेल्या अनुकूल, प्रतिकूल वाऱ्यांच्या गतीवरून ह्या महायुद्धाइतकेच भयंकर महायुद्ध पुन्हा क्वचित जगभर सुरू होईल, अशी चिन्हे दिसू लागली आहेत. तेव्हा निदान त्या आगामी महायुद्धात तरी ह्या विगत महायुद्धाचे काळी झालेली चूक पुन्हा घडू नये म्हणून जर्मन महायुद्धाचे वेळी हिंदुस्थानच्या परिस्थितीशी त्याचा संघर्ष किती होण्यासारखा आहे आणि त्या आगामी महायुद्धात आपल्या स्वातंत्र्याच्या आकांक्षा परिपूर्ण करण्यासाठी होणाऱ्या आपल्या प्रयत्नांस गेल्या युद्धाची परिस्थिती किती अनुकूल वा प्रतिकूल आहे, हे आपण सर्वांनी एव्हांपासून विवंचून पाहिले

पाहिजे. आणि आपल्या बळाबलाचा विचार करून त्या महायुद्धांत आपल्या प्रिय मातृभूमीच्या उद्धारार्थ आपणास कोणते राष्ट्रीय धोरण स्वीकारता येईल हे निश्चित केले पाहिजे.

- (श्रद्धानंद, १६ फेब्रुवारी १९२८)

## लेखांक २ रा

गेल्या लेखाकांत परकीय साम्राज्यावर जेव्हा एखाद्या महायुद्धाचे संकट गुदरते, तेव्हा साम्राज्यातील परतंत्र देशास आपले स्वराज्य परत मिळविण्याची सर्व संधीतील अत्यंत परिणामकारी आणि सुलभतम अशी सुवर्णसंधी प्राप्त होत असते, या विधानाचे विषदीकरण केले होते. आता सर्व महायुद्धे ही परतंत्र देशास सारखीच सहाय्यक होतात असे नाही, हे उघड आहे. या दृष्टीने पाहिले असता मागे झालेल्या जर्मन युद्धात हिंदुस्थानास जी स्वराज्यसंपादनाची संधी प्राप्त झालेली होती. आणि हिंदुस्थानच्या दुर्दैवाने त्याने आपल्या हातातून मूर्खपणाने घालविली. त्या संधीपेक्षा आगामी रशियन युद्धात- जर ते झालेच तर- त्यास पुनः प्राप्त होणारी महान संधी कोणत्या अंशांनी अधिक अनुकूल नि प्रतिकूल होणारी आहे आणि तो पूरक ध्यानांत ठेवून मागच्या प्रसंगी झालेल्या चुका आपणास कशा प्रकाराने सुधारता येणाऱ्या आहेत, मागे धरलेली धोरणे कशा रीतीने आणि कितपत बदलली पाहिजेत, हे प्रथमतःच स्पष्टपणे विवंचून पाहणे अवश्य आहे.

आगामी महायुद्ध जे आता आ वासून उभ्या युरोपास नि विशेषतः उभ्या आशियास भेडसावित आहे, ते ९९ अंशांनी इंग्लंड आणि रशिया याच दोन राष्ट्रांत प्रमुखपणे झुंजले जाईल असे गृहीत धरण्यास आता काही कोण्या भविष्यवाद्याचाच आधार घेतला पाहिजे असे नाही. राजकारणाच्या आकाशांतील वादळे ही भौतिक वादळांसारखीच केव्हां केव्हां अनिश्चित आणि अनपेक्षितपणे घडतात वा बिघडतात, ही गोष्ट खरी असली तरी त्या भौतिक वादळांप्रमाणेच सूक्ष्मपणाने अवलोकन करण्याची बुद्धिमत्ता असणाऱ्या कारस्थानी लोकांस ती बहुधा बिनचुकपणे ताडता येतात, अपेक्षिता येतात. हेही तितकेच खरे आहे. रशियन महायुद्ध घडणारच असे कोणासही शपथेवर जरी सांगता आले नाही, तरी आजच्या राजकारणीय वातावरणात वहात असलेल्या वाऱ्यांवरुन हे युद्ध शेकडा ९९ अंशी निकट भविष्यात घडण्याचा उत्कट संभव आहे, हे मात्र कोणाही राजकार्यातील अनुभवी आणि इतिहासज्ञ मनुष्यास निश्चयाने सांगता येईल. इंग्लंड, रशिया, चीन, अमेरिका इत्यादी राष्ट्रे हे युद्ध घडणार असे गृहीत धरूनच नव्हे, ते युद्ध घडवून आणण्यासाठीच आपआपल्या राष्ट्रकारणाची धोरणे आणि सैन्याची सज्जीकरणे करीत आहेत. अशावेळी हिंदुस्थाननेही हे बहुधा निश्चित ठरलेले महायुद्ध जुंपणार असे समजून आपलेही राष्ट्रकारण चालविणे हेच शहाणपणाचे आहे. बरे जर ते महायुद्ध न घडले तर दुसरे

कोणचे घडेल? विशेषतः जोवर जगात बलात्कारी आणि बलिष्ठ साम्राज्ये अस्तित्वात आहेत तोवर तरी महायुद्धे ही होणारच. अलिकडेच इंग्लंडच्या प्रत्यक्ष सरसेनापतीनीं गुरख्यांच्या स्मारकाची संधी साधून महायुद्धे घडणार असे स्पष्टपणे घोषित केले, हे श्रद्धानंदात त्या भाषणाचा जो उतारा दिला होता त्यावरुन वाचकांस स्मरत असेलच. तेव्हा जरी रशियन महायुद्ध ९९ अंशी घडणारच; उघड दिसत असलेली वस्तुस्थिती काही अनपेक्षित कारणे उद्भवून पालटली, तरी महायुद्धांच्या आंतरराष्ट्रीय जगतकलहांत हिंदुस्थाननेही भाग घेणे किती अवश्य आहे, का अवश्य आहे आणि त्या तापल्या तव्यावर आपली पोळीही भाजून घेण्याचे मार्ग कोणते असतात, याची सामान्य चर्चा तरी या निमित्ताने लोकांत चालू लागल्यास या लेखाचा उपयोग झाल्यावाचून राहाणार नाही. एतदर्थ ती सामान्य चर्चा करण्यास निमित्तभूत म्हणून आज बहुतांशी होऊ घातलेल्या या आगामी अँग्लो-रशियन युद्धाचीच बहुशः अवश्यंभावी घटना गृहित धरण्यास आपणास काही एक हरकत नाही. अँग्लो-रशियन युद्ध उभ्या जगतात अवश्यंभावीच असतात आणि तदनुरोधाने जिकडे तिकडे प्रचंड सैनिक आणि सामरिक हालचाली चालू असता हिंदुस्थानांतील कित्येक झोपाळू पुढारी हे घडणारच कशावरून म्हणून जांभया देत विचारीत आहेत. या एकाच कारणासाठीही ही चर्चा आतापासूनच निःसंदिग्धपणे आणि इतर सर्व किरकोळ प्रश्नांस बाजूस सारून त्याहून शतपट गंभीरपणाने कारणे अवश्य आहे. जर रशियन युद्ध न झाले तर? असे विचारणाऱ्या आळशास जर ते झाले तर? इतकेच उत्तर पुरे आहे. ते महायुद्ध होणार असा संभव उभ्या जगतास वाटत असल्याने आणि ते घडवून आणण्यासाठी इंग्लंड आदी राष्ट्रांचे अव्याहत यत्न चालले असतांना ते होणार हेच गृहित धरून आपण इतकी सिद्धता करुन त्या सवर्णसंधीचा लाभ घेण्यास सज्ज असले पाहिजे की, जरी ते उद्याच चालू झाले तरीही आपणास त्या सुवर्णसंधीचा तत्काळ लाभ घेता यावा.

जर्मन महायुद्धाच्या आणि आगामी रशियन युद्धाच्या तुलनेत हीच गोष्ट आपणास प्रथम लक्षात ठेविली पाहिजे.कारण जर्मन महायुद्धाचा पुरा पुरा लाभ जो हिंदुस्थानांस घेता आला नाही, त्याचे एक अत्यंत प्रबळ कारण हेच झाले की, त्या महायुद्धास आरंभ होईतो आपल्या हिंदुस्थानास त्याच्या संभवनीयतेची काहीच कल्पना नव्हती. तीन महिन्यांपूर्वी जर ते युद्ध होणार म्हणून कोणी म्हटले असते, तर आम्हास खरे वाटते ना, असे हिंदुस्थानांतील अनेक प्रमुख पत्रसंपादकांनी आणि पुढाऱ्यांनी प्रांजळपणे सांगितलेले आहे. त्या वेळच्या पुढाऱ्यांत कै. गोखले प्रभृतिंच्या मवाळ पक्षाच्या कार्यक्रमात आणि बहुशः मनातही महायुद्धादिक हालचालींचा अंतर्भावच होत

नव्हता. ती दिशा इतकी भयंकर आणि प्रसंगी निंद्य अशी त्यांना वाटे की, कोणाही हिंदी सभ्य नागरिकाने तिचा मनात देखील उच्चार करु नये असे त्यांस बाळकडूच मिळालेले होते. नुकत्याच उदयास येऊ पाहणाऱ्या गांधी-पक्षास ब्रिटिश साम्राज्य हे तोपर्यंत तरी जगाचे कल्याणार्थ अवतीर्ण झालेली एक अत्यंत हितकारकच नव्हे, तर जिचा विनाश इच्छिणे हे पापप्रद आहे; अशी एक संस्था वाटत असल्यामुळे ते लोक बोअर युद्धात, आणि झुलू युद्धात जसे इंग्रजी साम्राज्यास विनाअट साह्य देणे हे आपले हिंदी नागरिक म्हणून स्वकर्तव्य समजत आले, तसेच तेव्हांही समजत होते. असंतुष्ट बायको घरातल्या घरात नवऱ्याशी धुसपुस करते तशी हिंदुस्तानातल्या हिंदुस्थानात ते येथील इंग्रजी अधिकाऱ्यांशी धुसपूस करीत; पण एकंदरीत ते ब्रिटिश साम्राज्याच्या कुंकवाला काही कंटाळले नव्हते आणि परराष्ट्रीय राजकारण घरच्या धन्यावर सोपविणे सोडून आपण त्यात तोंड घालावे हे कुलीन स्त्रीप्रमाणे त्यास आवडत नसे. ब्रिटिश साम्राज्याचे ते राजनिष्ठ नागरिक होते; इतके एकनिष्ठ की, ब्रिटिश साम्राज्याचे जर्मनीशी युद्ध चालू झाल्यावरही त्यात हिंदुस्थानचे अधिकार वाढवाल तरच आम्ही साह्य देऊ असे हिदी देशभक्तांनी म्हणताच, त्या राजनिष्ठांस स्वदेशापेक्षाही ब्रिटिश साम्राज्याची निष्ठाच अधिक पुण्य आणि प्रिय वाटली! इंग्रजांस या युद्धात विनाअट साह्य द्या, विनाअट शिपाई द्या, त्यांच्या लढाया बिनअट लढा, हाच स्वराज्याचा सरळ मार्ग होय, a straight way to swarajya ! अशी गांधीजींची त्या वेळेला व्याख्यानांतील वाक्ये कित्येकांस अजूनही स्मरत असतील! तिसरा महत्वाचा पक्ष म्हणजे लो. टिळकांचा. पण ते युद्धापूर्वीची पाच सहा वर्षे दूर कारागारात पडलेले. त्यांच्यामागे त्या पक्षाचा सरकारी वरवंट्याखाली बहुतेक चुराडा उडालेला आणि जे काही तग धरून राहिले. त्यांनाही पूर्वीपासून परराष्ट्रीय राजकारणाचा हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या दृष्टीने अभ्यास करण्याचे बाळकडूच मिळालेले नसल्याने जर्मन महायुद्ध होण्याचे आधी त्याचा फारसा सुगावा नव्हता. मग त्या प्रचंड उलाढालीशी हिंदुस्थानचा संबंध जोडण्याच्या पूर्वसिद्धतेची गोष्टच दूर. काहीस हे कळे, पण साहस होत नव्हते. बहुतेकांस हे मुळी कळतच नव्हते.

## सत्तावनचे राष्ट्रीय क्रांतियुद्ध

हिंदुस्थानच्या भाग्याच्या निर्णयासाठी राष्ट्रीय शक्तींचा जसा उपयोग करुन घ्यावयाचा, तसाच परराष्ट्रीय शक्तिंचाही उपयोग करुन घेतला पाहिजे अशा धोरणाची परंपराच हिंदुस्थानांत मृत झालेली होती. सत्तावनच्या राष्ट्रीय क्रांतीचे प्रसंगी युरोपमध्ये रशियाशी आणि तुर्कस्थानशी संधान बांधण्याचा जो मोडका तोडका

यत्न श्रीमंत नानासाहेब यांचे वतीने त्यांचे दूत अजीममुल्ला आणि रंगो बापूजी यांनी केला तोच या परंपरेचा शेवटचा यत्न ठरला. त्यावेळेस इंग्रजांची रशियाशी लढाई जुंपली असतांच आपण उठावे असा त्या क्रांतियुद्धांतील पुढाऱ्यांचा स्पष्ट बेत होता. तो बेत युद्धातील सैनिकांतच नव्हे, तर साधारण खेडवळापर्यंत तोंडातोंडी कसा पोचला होता हे थॉमसनसारख्या इंग्रजी इतिहासकारांनी ग्रंथित करुन ठेविले आहे. रशिया आमच्या नाना साहेबांचे साह्यास भूमार्गाने येणार आहे, अशी आशा खेडोपाडी देखील लोक त्या क्रांतियुद्धाच्या भरात व्यक्त करीत. युरोपमध्येही या युद्धाची इतकी ख्याती झाली होती की, विशेषतः सेनापती तात्या टोपे याची ताजी बातमी ऐकण्यासाठी पॅरीस नगरातील लोक उत्सुकतेने दैनिके चाळीत. गॅरीबॉल्डीसंबंधी अशी ठोक अनुश्रुति आहे की, ज्या वेळेस हिंदुस्थानातील या राष्ट्रीय क्रांतियुद्धाच्या दिवसेंदिवस अधिक निकराच्या बातम्या मिळू लागल्या तेव्हा हिदुस्थानांतील हे बंड शिपायाचे कुणी यःकिश्चित भांडण (A Mutiny) नसून एक राष्ट्रीय क्रांतियुद्ध (A national revolt) आहे अशी त्याची निश्चिती झाली. तो ही त्या वेळी इटालीच्या स्वतंत्र्यार्थ अशाच उभारलेल्या आणि फसलेल्या एका क्रांतियुद्धांत गुंतलेला होता. आमच्या पिढ्यान् पिढ्या दास्यप्रवणतेत खिचपत पडलेल्या परप्रत्ययनेय बुद्धीला इंग्रजी पुस्तकांतील Sepoy mutiny जरी अजूनही अशीच काही तरी गुंडगिरी वाटते तरी गुणिनं वेत्ति गुणज्ञो या म्हणीप्रमाणे गॅरीबॉल्डीने ते सत्तावनचे क्रांतियुद्ध हे राष्ट्रीय क्रांतियुद्धच होय, असे तत्काळ ओळखिले आणि इटालियन युद्धातून मोकळे होताच आपण त्या हिंदी क्रांतिकारकांस जाऊन मिळण्याचे त्याने निश्चित केले. पुढे इटालीचा तो प्रयत्न फसला. गॅरीबॉल्डी त्यातून मोकळा झाला; पण त्याच वेळेस हिंदुस्थानचाही तो क्रांतियत्न त्याचवेळी फसल्याने सेनापती गॅरिबॉल्डीचा इकडे येण्याचा प्रश्नच संपला. गॅरिबॉल्डीने त्यानंतर दक्षिण अमेरिकेतील युद्धात भाग घेतलाच होता हे सर्वश्रुत आहे.

परराष्ट्रीय राजकारण्याशी संबंध जोडण्याच्या राजनीतीची परंपरा सत्तावननंतर अगदी मृत झाली. रामसिंग कुका, वासुदेव बळवंत, चाफेकर बंधु इत्यादी तीव्र आणि साहसी देशभक्तांनी पुढे जी जी क्रांतिकारक चळवळ केली, ती ती सत्तावनचे क्रांतियुद्धाचे व्यापक स्वरुप पावण्याचे आतच मारली गेली. परराष्ट्रीय राजकारणाशी संबंध जडविण्याची व्यापक रूपरेखा प्राप्त होण्याच्या पायरीस त्या चळवळी पोचू शकल्या नाहीत. त्यांच्या शक्ती-बुद्धीप्रमाणे ते वीर आपली कर्तव्ये त्यास कळली तशी करून गेले आणि इकडे राष्ट्रीय सभेचे राजकारण त्यांच्या नांवाचा उच्चार करण्यासही थरकापणाऱ्या निराळ्याच धोरणावर उभारले गेले. त्यामुळे जर्मन महायुद्धापर्यंत

परराष्ट्रीय राजकारणात सामदामादिक उपायांनी प्रत्यक्ष भाग घेण्याचा यत्न करण्याची खटपट कोणीही केली नाही. इतकेच नव्हे तर अत्यंत लज्जास्पद गोष्ट म्हणजे ही की त्या खटपटींची आवश्यकताच बहुतेकांस वाटेनाशी झाली. कित्येकास तर तो विचारही असभ्य आणि निंद्य वाटे- या अनुभवाच्या गोष्टी आम्ही लिहीत आहोत. त्या वेळच्या अनेक पुढाऱ्यांचे हे उद्‌गार आम्ही ऐकलेले आहेत. या चर्चा आम्ही त्यांच्याशी केलेल्या आहेत.

## अभिनव भारत

राहता राहिला क्रांतिकारक पक्ष. सत्तावनच्या क्रांतियुद्धानंतर हिंदुस्थानच्या राजकारणाचे ध्वनि युरोपीय राष्ट्रांच्या प्रबळ गलबल्यातही स्पष्टपणे प्रतिध्वनीत व्हावेत अशी खळबळ प्रथमतः अभिनव भारताच्या परदेशीय क्रांतिकारक उलाढालींनी उडविली. हिदुस्थानच्या राजकारणाकडे युरोपांतील आणि अन्य खंडातील परराष्ट्राचे चित्त वेधून घेण्याचा उपक्रम प्रथम अभिनव भारताने केला. त्यांची इंग्लंडमध्ये सरकारासही अस्वस्थ करुन सोडणारी अनेक भयंकर साहसे, त्यांच्या अनेक कर्तबगार पुढाऱ्यांनी फ्रान्स, जर्मनी, स्वित्झर्लंड, अमेरिका इत्यादी ठिकाणी हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याच्या आकांक्षेची प्रबळ स्वराने केलेली घोषणा, आयर्लंड, इजिप्त, चीन इत्यादी तत्कालीन परतंत्र राष्ट्रांतील क्रांतिकारकांशी त्यांनी स्थापित केलेले संबंध आणि त्या संस्थेतील अनेक देशवीरांच्या तेजस्वी पराक्रमामुळे युरोपची हिंदुस्थानच्या राजकारणांतील जिवंतपणाविषयी पटलेली निश्चिती या सर्व घटनांचे योगाने हिदुस्थानचे हे जागतिक राजकारणांत एक महत्वाचे घटक होऊन बसले. यांचे प्रत्यंतर प्रत्यक्ष रौलट रिपोर्टावरुन देखील पटेल. आय्यर, आचार्य, शामजी कृष्णवर्मा, मॅडम कामा, हरदयाळ, चट्टोपाध्याय इत्यादी नामनिर्देश करता येणारे आणि ज्यांचा नामनिर्देश अजून करता येत नाही असे तदितर अभिनवभारतातील देशभक्त आणि देशवीर युरोपच्या आणि अमेरिकेच्या राजधान्या राजधान्यातून शिरले आणि आपल्या असामान्य बुद्धीची शक्तीची आणि स्वार्थत्यागाची पराकाष्ठा करून परराष्ट्रीय राजकारणाचा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे कार्यी शक्य तो तो उपयोग करून घेण्याचा खटाटोप अव्याहत चालवू लागले. पुढे हिंदुस्थानातील इतर प्रांतातील आणि विशेषतः बंगाल पंजाबकडील क्रांतिकारकही परदेशांत भरू लागल्यानंतर या सर्वांनी सयाम, चीनपासून तो न्यूयॉर्कपर्यंत आणि पॅरिसपासून पर्शियापर्यंत जर्मन महायुद्धाचे काळी हिंदी इतिहासात चिरंतन रहावी अशी चळवळ उडवून दिली.

या क्रांतिकारक पक्षास मात्र हिंदुस्थानच्या राजकारणात परराष्ट्रीय उलाढालीचे पाठबळ घेणे किती अवश्य आहे याची पूर्ण जाणीव होती. त्यांचे मार्ग किती श्रेयस्कर होते किंवा नव्हते. हा प्रश्न स्वतंत्र आहे. येथे केवळ जर्मन महायुद्धाचे वेळी काय झाले आणि काय झाले नाही एवढेच काय ते संक्षेपाने पहावयाचे आहे. तेच मार्ग आज स्वीकारणे योग्य की अयोग्य हे अनुमान केवळ या माहितीवरूनच काढता येणारे नाही. त्याला परिस्थितीच्या भेदाभेदाची चर्चा केली पाहिजे. पण मार्ग कोणतेही स्वीकारले गेले, तरी जर्मन महायुद्धासारख्या कोण्या प्रचंड महायुद्धाचा दुंदुभी जगभर जेव्हा निनादू लागतो, तेव्हा त्या जागतिक लढ्यात हिंदुस्थानने आपल्या परिस्थिती आणि शक्तीप्रमाणे कोणचा ना कोणचा तरी भाग अनुकूल पडेल तसा घेतला पाहिजे. इतकेच काय ते येथे प्रतिपादन करावयाचे आहे. आणि त्या विधानास विषद करण्यापुरताच जर्मन युद्धाच्या पूर्वीचा हिंदुस्थानी राजकारणाच्या परराष्ट्रीय संबंधाचा उल्लेख येथे करावा लागत आहे.

## श्रीमती कामाबाई

जर्मन राष्ट्रामध्ये हिदुस्थानच्या स्वातंत्र्य-संपादनाच्या दृढ निश्चयाची प्रथम घोषणा श्रीमती कामा या तेजस्वी पारशी महिलेने केली ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. इसवी सन १९०८-०९ च्या संधीस श्रीमती कामा बाईंनी अभिनव भारताचा तिरंगी स्वातंत्र्यध्वज आपल्या हातात घेऊन जर्मनीत पाऊल टाकले आणि तेथील एका सोशियालिस्टांच्या संमेलनात त्यांना व्याख्यान देण्याचे सन्मानपूर्वक आलेले पाचारण स्वीकारून व्यासपीठावर येताच तो चिमुकला ध्वज त्यांनी फडकवित अत्यंत आवेशपूर्ण भाषणात जर्मन लोकांस सांगितले की, “जर्मनहो! आम्ही हिंदी लोकांनी आमचे स्वातंत्र्य संपादण्याचा कृतनिश्चय केला आहे. हा पहा हिंदी स्वातंत्र्याचा ध्वज! या ध्वजाच्या शक्तीवर विश्वास ठेवा. कारण हा चिमुकला ध्वज आम्ही आधीच अनेक हुतात्म्यांचे रक्त शिंपडून रंगविला आहे! आमचे प्रतिस्पर्धी तेच तुमचे! आम्हांस तुमच्या राष्ट्राची सहानुभूती आणि साहृय देत चला!” श्रीमती कामाबाईंच्या या वाक्यासरशी जर्मन सोशियालिस्टांच्या त्या संमेलनाचा मंडप टाळ्यांच्या गजरानी निनादून गेला! वर्तमानपत्रांतून त्या एका इंडियन प्रिन्सेसचा- हिंदी राजपुत्रीचा- कुतुहलपूर्ण उल्लेख होऊ लागला!

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा ध्वज प्रगटपणे फडकविण्याचा पहिला मान या पारशी महिलेस आहे! ती महिला होती आणि पारशी होती. हिंदी राष्ट्रीयत्वाच्या शक्यतेचे ह्याहून अधिक परिणामकारक गमक दुसरे काय असू शकणार!

या प्रसंगाचे आधीपासून किंचित प्रमाणाने आणि नंतर विस्तृत प्रमाणावर जर्मनीमध्ये हिंदुस्थानाबाबत जागृति अभिनव भारताच्या पुढाऱ्यांच्या प्रयत्नाने सारखी वाढत गेली. तेथील पत्रांस हिंदुस्थानविषयक लेख देण्यात येत. अभिनव भारताचे प्रमुख पत्र जे तलवार त्याच्या १९०८ च्या पहिल्याच अंकी भावी महायुद्ध जर्मनीशीच घडण्याचा कसा संभव आहे याची चर्चा एका स्वतंत्र निबंधात केली जाऊन त्याच वेळेस विकोपास जाऊ लागलेले (कील कॅनल) कीलच्या कालव्याचे प्रकरण विषद करुन दाखविलेले होते. जर्मन महायुद्ध चालू होण्याच्या चार पाच वर्षे पूर्वी अभिनव भारताच्या पुढाऱ्यांनी आपल्या परराष्ट्रीय लेखांतून त्या महायुद्धाचे वेळीच हिंदुस्थानाने आपल्या भाग्यनिर्णयाची संधी साधून घ्यावी म्हणून यत्न करण्यात त्यांच्या शक्तीची आणि बुद्धिची पराकाष्ठा केली होती. पुढे श्री. हरदयाळ आणि आणखी एक दोन पुढारी पॅरिसहून अमेरिकेत जाऊन जेव्हा गदर पक्षाची स्थापना करते झाले, तेव्हा त्या पक्षाच्या गदर नावाच्या चार भाषेत प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांत तर १९१३ व्या वर्षापासून आगामी जर्मन महायुद्ध आणि त्यावेळी हिंदुस्थानास काय करता येईल या विषयावर इतका उहापोह केला की ब्रिटिश सरकारने प्रसिद्ध केलेल्या रौलट रिपोर्टात त्याविषयी प्रमुखपणे उल्लेख करुन असे म्हटले आहे की, ज्या अर्थी लढाईचे पूर्वीच वर्ष सहा महिने हिंदी क्रांतिकारकांस त्याचा पत्ता होता. ज्याअर्थी युद्ध करण्याचा जर्मनीचा कृतनिश्चय पूर्वीपासूनच झालेला असला पाहिजे, आणि जर्मनीनेच हे गदर पत्र काढले असले पाहिजे! अर्थात ब्रिटिशांची ही अनुमाने चोराच्या उलट्या कागाळ्या होत हे सांगावयास नकोच. कारण हिंदी क्रांतिकारकांस जर्मन महायद्ध होण्याचा संभव दिसला, तो जर्मन लोकांच्या राजकारणाच्या अभ्यासापेक्षाही ब्रिटिश राजकारणाच्या त्या काळी-चाललेल्या गुप्त आणि प्रकट उलाढालींवरूनच अधिक उत्कटतेने व्यक्त झाला होता. जर्मनीस हाणून पाडण्याचा ब्रिटिशांचा क्रुद्ध आणि मत्सरी निश्चय त्यांच्याच पत्रांतून, राजकारणी पांचपेचावरून आणि सामरिक सज्जतेवरुन स्पष्ट होत होता. महायुद्ध चालू झाल्यानंतर जर्मनीचे आणि गदर पक्षाचे प्रत्यक्ष सरकारी संबंध जुळले. त्या आधी ते पत्र आणि हिंदी क्रांतिकारकांच्या इतर चळवळी त्यांच्या स्वतःच्याच बळावर चालविलेल्या होत्या.
१९१४ तील बंगाली, पंजाबी इत्यादी

## हिंदी क्रांतिकारक

याच संधीस बंगालमधून आणि पंजाबमधून आलेल्या हिंदी क्रातिकारकांच्या खटपटीने हिंदुस्थानातील क्रातिसंस्थांतूनही जर्मन महायुद्धाचे वेळीच हिंदुस्थानांत सशस्त्र क्रांति घडवून आणण्याचे धोरण स्वीकारण्याचे निश्चित झाले. त्याचे परिणाम किती दूरवर पोचले, ते प्रयत्न किती अंशी सफल वा निष्फळ झाले, सशस्त्र क्रांतीचा मार्ग त्यांना रुचला म्हणून तोच योग्य की अयोग्य हा प्रश्न अत्यंत महत्वाचा असताही अप्रस्तुत म्हणून सध्या बाजूस ठेवून येथे इतकेच सांगणे पुरे आहे की, जर्मन महायुद्धाचे वेळी हिंदुस्थानास आपले स्वराज्य मिळविण्याची आलेली महान संधी जर कोणाच्या लक्षातून गेली नसेल तर ती एका क्रांतिकारक पक्षाचेच होय.

## शेणकिडी वळवळ

परंतु ते हिंदुस्थानच्या तीस कोटी जनतेच्या मानाने केवळ दर्यामे खसखसीसारखे होते. ते केवळ मुठभर होते. त्यांच्यांतील बहुतेक लोक विशी-पंचविशीच्या आतील सामान्य अवस्थेतील तरुण होते. ते बहुतेक देशपार आलेले संत्रस्त आणि पीडित देशभक्त होते. बलाबलांचा विचार करणे त्यांस अशक्य झालेले होते कारण सर्व हिंदुस्थान मेल्यासारखे पडलेले होते; कोणत्याही महान साहसाची कल्पनाच त्या हिंदुस्थानास सुचत नव्हती. सुचविली तरी साहस म्हणताच त्यास हींव भरे! शेणातल्या किड्यांसारखे हिंदुस्थानातील ते कोटी कोटी लोक शेणखायीतल्या शेणखायीत काही चळवळ, काही वळवळ करीत. पण सिंहासारखी झेप घालण्याचे गूढ सामर्थ्य त्यांच्यात सूप्तपणे असूनही त्यांचे त्यासच ते कळेनासे झाले होते. हिंदुस्थानचे ते सूप्त सामर्थ्य इंग्रजांस ठाऊक होते. त्याच मुर्दाड लोकांस सैन्यात भरती करून त्यांचेच हातांनी इंग्रज, इंग्रजांच्या लढाया त्याच महायुद्धात लढवू शकले. इंग्रजांसाठी ते जर्मनांविरुद्ध वाघासारखे लढले. तुर्कांच्या सेनेवर काळासारखे जाऊन आढळले; इंग्रजांसाठी लाखांनी मेले; पण हिंदुस्तानासाठी मरण्याचे नाव काढताच थरथर कापले! हिंदुस्थानच्या लढ्यासाठी शेणखाईतल्या शेणखाईत वळवळ करण्यापलिकडे त्यांच्या हातून काही एक झालेले नाही. त्या शेणकिडी वळवळी पलिकडे काही केले पाहिजे ही कल्पनासुद्धा त्यास ग्रहण करवली नाही! त्यायोगे क्रांतिकारकांच्या मूठभर वीरदलाने जी सशस्त्र क्रांतीची त्यांना युक्त वाटली, ती खटपट केली तीही, प्रत्यक्ष स्वराज्यप्राप्तीचे प्रश्नापुरती तरी तिकडे निष्फळ ठरली;

आणि इकडे या कोटिकोटींची शेणकिडी वळवळ जीत ते स्वराज्याचा सरळ मार्ग म्हणून गौरवीत होते, तीस डायरांची आणि ओडवायरांची फळे आली.

सारांश की जर्मन महायुद्धाच्या वेळी हिंदुस्थानला कोणताच महत्वाचा लाभ करुन घेता आला नाही. लिथूनिया, पोलंड, आर्मेनिया, सर्व्हिया इत्यादी टीचटीचभर देशांनी त्या परराष्ट्रीय उलाढालीत भाग घेऊन आणि अनेक पाचपेच लढवून आपापले स्वातंत्र्य आणि सत्ता ज्या महायुद्धाच्या महान संधीत संपादन आणि वृद्धिंगत केली, त्या महान संधीतून हा विस्तीर्ण हिंदुस्थान कोरडा, दासचा दास, मुर्दाडचा मुर्दाड बाहेर आला! या अत्यंत उद्वेगजनक घटनेचे पहिले मुख्य कारण हे होय की, परराष्ट्राच्या जागतिक उलाढालीचा आपल्या भाग्योदयाचे कार्यी उपयोग करून घेता येतो हे समजतच नव्हते. परकीय साम्राज्यांचे संकट तीच परतंत्र देशाची संधी होय. ह्या राजनीतीचा हिंदुस्थानास पूर्णपणे विसर पडला होता. हिंदुस्थानास परराष्ट्रीय राजकारण असे उरलेच नव्हते. परकीय साम्राज्यांचे इतकेच नव्हे, तर परतंत्र देशास परराष्ट्रीय राजकारण नसतेच, परराष्ट्रांशी आम्हास काय करावयाचे आहे? अशा प्रकारच्या कूपमंडूकी ट्राव ट्रॉंवासच राजनीतीचे सर्वस्व म्हणून मानण्यात येत होते! जर्मन महायुद्ध चालू होण्यापूर्वी त्याच्या संभवाची इकडे गंधवार्ता नव्हती. ती मिळाल्यावरही तिचा अर्थ कळण्याची पात्रता नव्हती. त्यामुळेच तिचा उपयोग करुन घेण्याइतके साहस, संघटन आणि सज्जता, ते महायुद्ध चार वर्षे चालत राहिले तरीही उत्पन्न होऊ शकली नाही.

## स्वतः जर्मनीचा हात
## हिंदुस्थानास योजणे दुःसाध्य होते

जर्मन महायुद्ध घडले त्या वेळची हिंदुस्थानच्या अंतर्गत राजकारणाची ही अंध दुर्दशा आणि भ्याड असज्जता हे एक प्रमुख कारण जसे होते, तसेच त्या महायुद्धाचा आपल्याला महत्वाचा काही उपयोग न होण्याचे दुसरे कारण म्हटले म्हणजे जर्मनीचे आणि इंग्लंडचे बळांतील अंतर होय. जर्मनी मुख्यतः एक भौमिक शक्ती होती. तिचे सामुद्रिक सामर्थ्य इंग्लंडइतके प्रबळ झालेले नव्हते. हिंदुस्थान हे जर्मनीपासून भूमार्गाने निकटवर्ती नसल्याने जर्मनीचा हात हिंदुस्थानास भूमार्गाने पोचणे अशक्य झालेले होते. यासाठी जर्मनीने ऑस्ट्रिया, बल्गेरिया आणि तुर्कस्थान या तिन्ही देशांस एका साखळीत गुंतविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. तो बराच यशस्वीही झाला. परंतु ती साखळी जुळवून त्या सुरुंगांच्या पंक्तीची वात हिंदुस्थानच्या

तटापर्यंत आणून पोचविण्यास इराण किवा अफगाणिस्थान त्या साखळीस जोड लागला पाहिजे होता. त्यासाठीच राजा महेंद्रप्रताप आदिक हिंदी क्रांतिकारकांचे हाती स्वतःच्या राजमुद्रेची पत्रे देऊन स्वतः कैसरने अमीराकडे धाडले आणि इराणमध्येही जर्मन सेनापती तुर्कांच्या सैन्यासह घुसू लागले. पण इकडे अमीर इंग्रजांविरुद्ध लढण्यास धजेना आणि तिकडे ज्या तुर्कांच्या आधारावर हिंदुस्थानच्या तटास हात पोचविण्याची जर्मनांनी धमक बाळगली होती, त्या तुर्कांचेच पाय रणांगणातून उखडून जाऊ लागले. तुर्कांनी इंग्रजांस हिंदुस्थानच्या तटापाशी शह देण्याचे ठायी उलट जर्मनांसच त्या पंगु तुर्कांस सांभाळण्यासाठी अस्त्रे, शस्त्रे आणि सैन्ये धाडता धाडताच नाकी नव आले. यामुळे बर्लिनचा बलिष्ठ हात बगदाद मार्गे किंवा काबूल मार्गाने हिंदुस्थानच्या तटास पोचणे अशक्य झाले. पुढे रशियांत महान राज्यक्रांती होऊन जर्मनीने तो पादाक्रांत केला. तेव्हा रशियाच्या क्रांतीचे चालकांशी जर मनोभावाने जर्मनीचा लढाऊ संधी घडता, तर सायबेरियाकडून रुसो जर्मन सैन्य हिंदुस्थानवर येऊ शकते. पण ते झाले नाही. होणे शक्य नव्हते. कारण जेव्हा लढाईच्या शेवटी ती घटना घडली, तेव्हा जर्मनी आणि रशिया दोघेही थकून गेलेले होते. फ्रान्समध्येच झुंज घेणे कठिण झाले होते.

अशा रीतीने जर्मनीचा हिंदुस्थानच्या तटास भूमार्गाने हात पोचणे अशक्य झाले. जर्मनी मुख्यतः भौमिक शक्ती- A land Power होती. पण त्या तिच्या शक्तीचा हिंदुस्थानास भूमार्गाचे दुलर्घत्वाने उपयोग होणे दुर्घट झाले. राहता राहिला सामुद्रिक मार्ग. परंतु जर्मनीची सामुद्रिक शक्ती इंग्लंडच्या मानाने कमी होती. आंग्लभू समुद्राची स्वामिनी, तरी देखील जर्मनीने हिंदी क्रांतिकारकांशी संगनमत करून युद्धनौका इकडे धाडण्याचा प्रयत्न केला. शस्त्रे भर-भरुन व्यापारी नौकांचे मिषाने त्यांची जहाजे हिंदुस्थानचे तटास पोचण्याचा प्रयत्न करीत असता काही धरली गेली, काही बुडविली गेली. सिंगापूरला, सयामला, बालासोरला, हाँगकाँगला हिंदी सैनिकांनी आणि क्रांतिकारकांनी एकत्र होऊन लहान मोठ्या उठावण्या आणि चकमकी ज्या लढविल्या, त्या देखील या जर्मनीच्या युद्धनौकांच्या अपेक्षित सहाय्यावरच होत. एमडेनने तर अंदमानावर छापा घालून तेथील क्रांतिकारकांस आणि बंदिवानांस घेऊन रंगूनवर स्वारी करावी आणि तेथे क्रांतीचा झेंडा उभारून हिंदुस्थानात शिरावे म्हणून हिंदी क्रांतिकारकांच्या सहकार्याने मोठा घाट घातला होता. आटोकाट परिश्रम पण केले. पण इंग्रजी नौसाधनाच्या (आरमाराच्या) प्रबळ आणि सर्वगामी शक्तीपुढे त्या चार-पाच जर्मन युद्धनौकांचे फारसे काही चालले नाही. ह्यात काहीच आश्चर्य नाही. तरी तेवढ्यानेदेखील इंग्लंड पेचात आलेः

तरी देखील जे थोडेसे त्या जर्मन युद्धनौका आणि भूसैन्ये करू शकली त्याचा पेच इंग्लंडास भोवल्यावाचून राहिला नाही. त्या तुटक्या यत्नांचा पाडाव करण्यासाठी देखील इंग्लंडला थोडा त्रास पडला नाही. त्यांच्या कित्येक रणतरी आणि रणसेना ओशियन जलात आणि स्थलांत अडकून पडल्या. हिंदी क्रांतिकारकांच्या मूठभर लोकांच्या चळवळींनी इंग्रजांच्या हिंदी सैन्यात एकदा तर मोठे बंड होता होता चुकले. तरीही कित्येक पलटणी बिघडून त्यांनी तुरळक उठावण्या केल्याच. त्यामुळे इंग्रजांचा हिंदी सैन्याच्या आधारावरचा विश्वास उजून गेला. बाहेर १९१७ चे महायुद्धाचे जिवावरचे संकट इंग्रजांवर गुदरले असताच हिंदुस्थानचे आंत १८५७ घडते की काय अशी घोर चिंता त्यांस रात्रंदिवस पडली होती. परंतु बाहेर १९१७ आणि आत १८५७ अशा दुर्धर प्रसंग आला नाही म्हणून इंग्लंड बचावले. नाही तर हिंदुस्थानच नव्हे तर उभे जग इंग्लंडच्या हातून गेल्यासारखेच होते.

ही जर्मन युद्धाच्या वेळची इंग्लंडची आणि त्याच्या शत्रूच्या हिंदुस्थानसंबंधीच्या बलाबलाची परिस्थिती ध्यानात ठेवून मग त्या आगामी रशियन युद्धाचे भविष्याच्या पडद्यातून दिसेल तितके निरीक्षण केले असता हिंदुस्थानपुरता तरी अत्यंत महत्वाचा फरक दिसून येतो. त्याचे स्वरूप शक्य तितक्या कसोशीने मोजून मापून ठेवणे हे इंग्रजांच्या आणि भारतीयांच्या दोघांच्याही हितार्थ अत्यंत अवश्य आहे. इंग्रज ते जाणून आहेत. नाहीत जाणून काय ते भारतीय. एतदर्थ त्या आगामी परिस्थितीची रुपरेखा भारताच्या दृष्टीसमोर एव्हांपासून अंकीत करून धरिली पाहिजे. ती आखण्याचे काम आता पुढील लेखांकी.

(श्रद्धानन्द, २३ फेब्रुवारी १९२८)

## लेखांक ३ रा

हिंदुस्थानच्या परिस्थितीपुरता जर्मन महायुद्धात आणि आगामी रशियन महायुद्धात जो पहिला मुख्य फरक पडणार आहे तो हा की, जर्मन महायुद्ध हे युरोपीय युद्ध होते आणि आगामी युद्ध हे रशियन युद्ध होणारे आहे. रशिया होऊन युद्धास सहसा हात घालणार नाही असे जरी गृहीत धरले, तरी त्यांच्या जन्मापासून रशियन बोल्होव्हिकांविरुद्ध युरोपीय राष्ट्रे जे भयंकर कट करीत राहीली आहेत ते रशियास युद्ध करण्यास भाग पाडल्यावाचून बहुधा राहणार नाहीत. इंग्लंडच्या साम्राज्यास जर्मनीची शक्ती हाच काय तो तेव्हा शत्रू होता. पण आता रशियाची शक्तिच नव्हे तर तत्त्वेही इंग्लंडच्या मुळावर आलेली आहेत. जर्मनी तलवार घेऊनच इंग्लंडशी लढला. पण साम्राज्यतृष्णा दोघांतही होतीच. हे तत्वतः त्यांच्यांत ऐक्य होते.

पण तलवार आणि तत्व ही दोन्ही भयंकर साधने घेऊन रशिया इंग्लंडच्या साम्राज्यावर तुटून पडणारा आहे. म्हणून इंग्लंडला जर्मनी बरा, पण हा रशिया नको असे झालेले आहे. एतदर्थ इच्छेने किंवा भाग पडले म्हणून पण रशिया जेव्हा केव्हा इंग्लंडशी लढण्यास उतरेल, तेव्हा त्याला आशियाच्या रणक्षेत्रातच उतरावे लागेल. कारण युरोपात समुद्रातून बाल्कन द्वीपातून आणि किंचित् पोलंडमधून इंग्लंडला प्रत्यक्ष रशियावर आघात करता येईल. पण सामुद्रिक शक्तीत दुर्बळ असणाऱ्या रशियाला इंग्लंडवर आघात करण्यास युरोपात मुळीच जागा नाही. त्याचा वचपा आशियातच काढावा लागेल. कारण प्रत्यक्ष इंग्लंडला जरी युरोपमध्ये रशियाचा हात पोचणारा नाही, तरी इंग्लंडच्या शक्तीचे जे मुख्य केंद्र हिंदुस्थान त्यावर घाला घालून इंग्लंडला विव्हल करून टाकणे हे रशियास शक्य आहे. आणि स्थलशक्तीनेच तो हिंदुस्थानावर आघात करून इंग्लंडला पेचात पाडण्यास समर्थ होणार आहे. ह्या परिस्थितीमुळे भावी युद्ध झुंजले जाणार. आशिया हे त्याचे मुख्य रणक्षेत्र बनून इतर रणांगणे उपरणक्षेत्रे होणार आहेत.

यामुळेच पुढील युद्धात हिंदुस्थानचे महत्व अत्यंत उत्कटतेने वाढणार आहे. विगत जर्मन युद्धात आशियाची स्थिती अत्यंत दुर्बळ होती. हिंदुस्थानच्या दृष्टीने अत्यंत प्रतिकूल होती. जपान फितलेला, चीन निजलेला अफगाणिस्थान भ्यालेला, इराण जिंकलेला, तुर्क हरलेला आणि रशिया तर इंग्लंडचा केवळ उजवा हात! हिंदुस्थानच्या सीमेवरील राष्ट्राची आणि त्याच्या सीमेवरील राष्ट्राची ही इंग्लंडासच सर्वस्वी अनुकूल

अशी दशा झालेली होती. त्यामुळे महायुद्धाच्या वणव्याची ठिणगीसुद्धा हिंदुस्थानात येऊन पडणे अशक्य झालेले होते. पण या आगामी रशियन महायुद्धात ती परिस्थिती इंग्लंडला तितकीच प्रतिकूल जाणारी आहे. प्रत्यक्ष प्रसंगी राजकीय स्थित्यंतरे काय होतील हे कोणासच नक्की सांगता येणार नाही. पण त्याची सद्यःप्रवृत्तीवरून साधारण रूपरेखा कशी आखली जाण्याचा संभव आहे हे आपणास पाहून ठेवणे भाग आहे. त्या प्रमाणे पाहता आज तरी असे स्पष्ट दिसत आहे की, आशियातील नि विशेषतः हिंदुस्थानच्या सरसीमेवरील बहुतेक राष्ट्रे इंग्लंडच्या विरूद्ध पक्षास मिळणारी आहेत. अफगाणिस्थान, इराण आणि तुर्कस्थान यांशी रशियाचे आजच संधी झालेले आहेत की, जर कोणाशी रशियाचे युद्ध जुंपले तर त्या राष्ट्रांनी रशियाचे विरूद्ध न जाता फार तर तटस्थपणे राहावे. यामुळे ते इंग्लंडला मिळणार नाहीतच; पण बहुधा तटस्थही न राहाता रशियाला मिळतील. कारण अफगाणिस्थानला हिंदुस्थानच्या अपहाराची महत्वाकांक्षा उत्पन्न झालेली असल्याने, त्याच्या स्वतःचीच खुमखुमी त्यास स्वस्थ बसू देणार नाही. तो या रशियाच्या बलिष्ठ रहाय्याची महान संधी साधून त्याच्या अस्तित्वावर नेहमीच रोवलेल्या हिंदुस्थानातील इंग्रजी साम्राज्याच्या पिस्तुलास इंग्लंडचे हातून छिनावून घेण्याचा प्रयत्न केल्यावाचून राहणार नाही. इराणाच्या समुद्रात इंग्रजांना ढवळाढवळ करण्यावाचून गत्यंतर नसल्यामुळे आणि इराणी आखातात रशियाविरूद्ध असणाऱ्या कोणत्याही युद्धमान राष्ट्रास आम्ही आश्रय देणार नाही, म्हणून इराणने रशियाशी स्पष्ट आणि अत्यंत महत्वाचा करार अलीकडे केला असल्याने इराणला इंग्रजाविरूद्ध जाण्याला भाग पाडणे इंग्लंडलाच अवश्य होऊन बसेल. तुर्कस्थानचे इंग्लंडने गिळलेले बगदाद इत्यादी प्रांत परत मिळविण्याची संधी साधून घेण्यास तुर्कस्थानही कमी करणार नाही. युद्धारंभीच नसले, तरी युद्ध इंग्लंडच्या किंचित्मात्र सुद्धा विरूद्ध जाताच तुर्क लढाईत पडल्यावाचून राहणार नाही. अशा रितीने उभा पूर्व आशियाशी संगनमत करून हिंदुस्थानच्या पूर्व बाजूस सुवेझपर्यंत इंग्रजांवर सर्व आशिया उठेल.

रशियाचे राष्ट्र तर महायुद्धाच्या रणयज्ञाचा मुख्य यजमानच त्याच्या प्रचंड भौमिक सेना आणि वैमानिक शक्ती हिंदुस्थानच्या काश्मीरपासून तिबेटपर्यंत अंगास अंग लावून उभ्या जर्मनीचा हात हिंदुस्थानचे तटास पोचण्यास खंडचे खंड आडवे आलेले होते. पण रशियाचा हात हिंदुस्थानचे तटास नेहमीच चिकटलेला. युद्ध पुकारले जाण्याच्या आठवड्याचे आत रशियन सेना काश्मीरपासून नेपाळ ते तिबेटपर्यंत हिंदुस्थानची सीमा व्यापून उभ्या असणार. आगे आव! म्हणताच हिंदुस्थानात शिरणार; वाटेल ती शस्त्रास्त्रे, विमाने, सैनिकांची सहस्त्रे, सेनापती-रशिया

पाण्यासारखी हिंदुस्थानात ओतू शकेल. हिंदुस्थानावर स्वारी करणे जर्मनीस जितके कठिण होते, तितकेच ते रशियास सोपे आहे. त्यातही रशियाची शक्ती ही इंग्रजाच्या शक्तीहून जर्मनीप्रमाणेच निदान भौमिक सामर्थ्यांत तरी मुळीच कमी नसून कांकणभर जास्तच आहे आणि जर्मनास प्राप्त नसलेली वैमानिक शक्तीही रशियास उपलब्ध झालेली आहे. हिंदुस्थानवर भौमिक आक्रमण जर्मनीला अशक्य होते, पण ह्या देशास महायुद्धाचे दोन चार प्रचंड धक्के तरी मारून त्यास गदगद हलवून सोडण्यासाठी जर्मनी फार तर एखादी एमडन पाठवू शकला.पण रशिया वैमानिक सामर्थ्याच्या जोरावर हिंदुस्थानच्या वाटेल त्या भागास वाटेल तितका प्रचंड धक्का वाटेल तेव्हा देऊ शकेल. हिंदुस्थानात असणाऱ्या इंग्रजी तळावर, शस्त्रागारावर, सरकारी केंद्रांवर विमानाचे हल्ले चढवून त्यास तास-तास भडिमारून (बंबार्ड करून), सर्व देशात धुमश्चक्री उडवून रशियाचे वैमानिक दळ प्रत्यही सकाळी काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत ये-जा करू शकेल, हिंदुस्थानातील लोकास त्यांची इच्छा असो वा नसो पण प्रचंड खळबळ उडवून युद्धोन्मुख व्हावयास शिकवू शकेल.

सर्व हिंदुस्थानात क्रांतीच्या लाटा उठोत वा न उठोत, त्या उठाव्या असे आपणास वाटो वा न वाटो, पण हे गृहीत धरल्यावाचून गत्यंतर नाही की, कुठे कुठे तरी मूठभर असोत वा मणभर असोत पण क्रांतिकारक दळे ही त्या महायुद्धाचे धुमश्चक्रीत मुग्घ वा प्रकट उठावण्या करणार हे असंभवनीय आहे काय? कारण आजही जर ते एकाकी बालासोरास लढतात, काकोरीस आगगाड्या अडवितात, चार पिस्तुले चोरून क्रांतीचे कट करतात आणि आज पंचवीस वर्षाच्या सरकारी दडपणाने, यातनांनी वा निर्यातनांनी, आशेने वा निराशेने निर्मूळ होत नाहीत, तर ते अशा महायुद्धाच्या खंडोखंडे पेटविणाऱ्या भडक्यात भडकून जाणार नाहीत असे गृहीत धरणे हिंदी लोकांच्या आणि इंग्रजांच्या दोघांच्याही हितास आयत्या वेळी अनर्थकारकच होणारे नाही का? हिंदुस्थानात तशा काही उठावण्या काही तापट क्रांतिकारक करतील हे गृहीत धरूनच त्यांचा बंदोबस्त कसा करता येईल, त्यांची शक्ती का वाढू शकेल आणि कशी घटू शकेल, याचा विचार आपले चित्ताशी करणे हे हिंदी आणि इंग्रजी पुढाऱ्यांचे कर्तव्य आहे. या दृष्टीने या विषयाचा सांगोपांग विचार करण्याचे जरी हे स्थळ नव्हे, किंवा या लेखाचा तो उद्देशही नसला तरी वरील छेदकांत रशियाच्या ज्या वैमानिक बळाच्या प्रश्नाचा उहापोह केलेला आहे, त्यापुरते येथे इतकेच सांगणे पुरे आहे की अशा क्रांतिकारकांच्या अगदी तुच्छ उठावण्या जरी कुठे झाल्या तरी त्यांस विषारी धुराची सर्व साधने, अल्प प्रमाणात पण भयंकर स्फोटकास्त्रे लहान मशीनगन्स, आणि वेळी काही सैन्यसंचालक देखील पुरविण्यास हे रशियाचे वैमानिक

बळ समर्थ होईल. इतकेच नव्हे तर तो पुरवठा त्यास हिंदुस्थानातील कोणत्याही स्थळी अचानक उडत येऊन करून समयी परतही उडून जाता येईल. रशियामध्ये कित्येक हिंदी क्रांतिकारक, क्रांतिशस्त्रास्त्रांचे आणि युद्धसंचालनाचे शिक्षण घेत पडलेले आहेत असे इंग्रजी पत्रे मधून मधून जी हाकाटी करता त्यावरून दिसते. त्यास आणि तदितर निर्वासित क्रांतिकारकास रशियन विमाने, युद्ध चालू होताच हिंदुस्थानात जिथे क्रांतीची ठिणगी उडेल तिथे तिला फुंकर घालण्यासाठी अचानक आणून सोडतील किंवा हिंदुस्थानातून बाहेर नेऊ शकतील. ही गोष्ट जर्मन लढाईत शक्य नव्हती. जर्मनी फार फार तर समुद्रतीरावर हत्यारे आणून ओतू शकता; पण पुढे देशाचे मध्यंतरी त्यास आणणे दुःसाध्यच होते आता हिंदी क्रांतिकारक जर चीनमध्ये किंवा सायबेरियात केंद्र करून दोन रणविमाने घेऊन सकाळी निघाले, तर सिमल्यावर दहा वाजता येतील, तास दोन तास बॉम्बचा भडिमार करून, पुनः परत निसटून संध्याकाळी चीनला जाऊन बसतील. बंगाल्यात एखादी तुच्छ उठावणी झाली, तर एकदम अगदी बीडन स्क्वेअरात लहान मशीनगन्स वा विषारी धूरास्त्रे इत्यादी क्रांतिकारकास देऊन निसटून परत जाऊ शकतील. या वैमानिक शक्तीचा अभ्युदय हा या महायुद्धाच एक भयंकर नवीन घटक होणार असून, इंग्लंड जसा त्याचा उपयोग करू शकेल तसाच रशियाही करू शकेल. विशेषतः ही वैमानिक शक्ती हिंदुस्थानातील अंतर्गत क्रांतीच्या उठावण्यास फार सहाय्य देऊ शकेल आणि त्या मानाने इंग्रजास फार पेच आणील. या गोष्टीचा विचार एव्हापासूनच इंग्लंडच्या आणि हिंदुस्थानच्या दोघांही जनतेस, दोघांच्याही हितार्थ करणे अवश्य आहे.

जर्मनीचा हात हिंदुस्थानास पोचणे त्याच्या सामुद्रिक शक्तीचे दौर्बल्याने, भौमिक शक्तीच्या सुदूरतेने आणि वैमानिक शक्तीच्या अभावाने अशक्य केले आणि त्यामुळे हिंदुस्थानात इंग्रजी सत्ता फारशी धोक्यात आली नाही पण रशियाची सीमा उत्तरेस पुष्कळशी हिंदुस्थानच्या सीमेस अगदी चिकटून असल्याने अफगाणादी राष्ट्रे इंग्रजाविरूद्ध उठून रशियास मिळणारी असल्याने, आणि त्याचप्रमाणे आणि त्याचमुळे युद्ध सुरू होण्याच्या दोन तीन आठवड्याचे आत रशियन सीमा ओलांडून हिंदुस्थानात घुसण्यास लाखो सैनिक इंग्रजाच्या तोडीस तोड देणाऱ्या नवीनातील नवीन युद्ध साधनांनी सज्ज, असे रशियापाशी असल्याने आणि हिंदुस्थानचे आत वाटेल तेथे युद्धाचे छापे-घाले घालीत धक्के मारून अंतर्गत क्रांतीच्या उठावण्या करविण्यास रशियास वैमानिक बळ प्राप्त झालेले असल्याने, आगामी महायुद्धात इंग्रजी साम्राज्याचे हृदयच असलेल्या हिंदुस्थानावर आघात करणे इंग्रजांच्या शत्रूस जर्मनीहून कितीतरी पटीने सोपे झालेले आहे; याचे विवेचन येथवर केले. परंतु

पश्चिमोत्तर सीमेकडून अफगाण आणि उत्तर सीमेकडून रशिया हिंदुस्थानावर स्वारी करू शकेल इतकेच संकट या लढाईत इंग्रजासमोर दत्त म्हणून उभे राहणारे आहे असे नाही.

महायुद्धाच्या भूकंपीय उलाढालीत कोणाचे काय होईल हे भविष्य निश्चितपणे वर्तविणे हे इतिहासज्ञांस किंवा राजकारण्यास शक्य नाही, मग स्वयमेवच अनिश्चित अशा ज्योतिष शास्त्रज्ञांची गोष्टच दूर! यासाठी आज जे जसे स्पष्ट दिसत आहे, ते सांगून टाकल्यावर, जे आज अंधुक दिसत आहे त्याचे स्पष्ट रूप कोणत्या प्रकारचे निघेल आणि ते निघाले तर त्याचा अनुकूल वा प्रतिकूल परिणाम कसा होईल हेही थोडे विवेचून ठेविलेच पाहिजे. या दृष्टीने पाहता हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर सीमांवर इंग्रजाविरूद्ध तुर्क, इराण, अफगाण, रशिया यांची सशस्त्र जिवंत भिंतची भिंत अशी उभारली जाऊन, चांगदेवाच्या भिंतीसारखी अनिवार्यतेने चालून येण्याचा संभव आहे, तसाच पूर्वोत्तर सीमेवरही इंग्रजाविरूद्ध कोणीच उठणार नाही असे काही निश्चयाने सांगता येत नाही.

कारण नेपाळ! नेपाळ आज इंग्रजांचा मित्र आहे; पण नेपाळ स्वतंत्र आहे. अफगाणिस्थानही इंग्रजांचा मित्र म्हणवीत होता; पण आता त्याचे मनात हिंदी साम्राज्य जिंकण्याची नवीन भयंकर महत्वाकांक्षा उगवलेली आहे. ती नेपाळचेही मनात महायुद्धाच्या भुकंपीय उलाढालीच्या खळबळी कशावरून उद्भवणार नाहीत? अफगाणिस्थान इंग्रजांच्या विरूद्ध जाईल हे जसे आज बहुतेक निश्चिततेने सांगता येते, तसे नेपाळही इंग्रजांचे विरुद्धच जाईल हे सांगता येत नाही. पण नेपाळ इंग्रजांचे विरूद्ध जाणारच नाही किंवा इंग्रजाविरूद्ध जाणे त्यास भाग पाडले जाणारच नाही हेही निश्चितेने सांगता येत नाही!

जर नेपाळ इंग्रजांचा मित्र राहिल तर तो इंग्रजास एक मोठाच आधार होणार आहे. आज नेपाळास निदान महायुद्धात बेल्जम, हॉलंड या लहान देशास जे महत्व प्राप्त झालेले होते ते प्राप्त झालेले आहे. त्यात ही नेपाळची ६३००० च्या वर खडी सेना असून युद्धकाली प्रत्येक तरूण गुरखा तरी लढाऊ वीर होणार आहे. त्याहूनही इंग्रजास पेचात आणणारी गोष्ट म्हणजे ही की, आज ब्रिटिशांच्या हिंदी सेनेचा मुख्य आधार गुरखे आहेत. जर नेपाळशी मित्रता राहिली तरच ह्या सर्व गोष्टी इंग्रजास अनुकूल जातील.

पण जर नेपाळची मैत्री तुटेल, रशियाच्या कारस्थानाने वा शक्तीने किंवा नेपाळचे मनात अफगाणिस्थानाचे संसर्गाने हिंदी साम्राज्याची वा निदान त्यातील बिहार बनारसपर्यंतच्या प्रदेशापर्यंत तरी नेपाळी राज्य सत्ता वाढविण्याची नवीन साहसी महत्वाकांक्षा उद्भवली, तर ह्याच सर्व गोष्टी इंग्रजास अत्यंत जड जाणाऱ्या आहेत. कारण, नेपाळ बिघडला तर त्याच्या अगदी पाठीशीच लगटून उभा असलेला आणि त्याचे मनात इंग्रजाविरूद्ध आकांक्षा उत्पन्न करण्याचे कार्यी हात धुवून पाठीस लागलेला रशिया उभा आहे. तो तिकडून अफगाणिस्थानास तसाच नेपाळास सैन्य, शस्त्रास्त्रे, सेनानी, विमाने आणि द्रव्य पुरविण्यास समर्थ आहे त्यामुळे जर का नेपाळशी इंग्रजांचे बिघडले, तर नेपाळ एकाएकी बिहारवर उतरेल. नेपाळच्या सारख्या कडव्या, लढाऊ आणि जिवंत सैनिकांचे ते पन्नास-साठ सहस्त्र सैन्य, आणि रशियाच्या धनाजनाचा आणि शस्त्रांचा त्यास पाठिंबा. नेपाळने बिहार प्रांतावर स्वारी करण्याचा अवकाश की, बंगालपर्यंत साफ मैदानच आहे. ते हजारो गुरखे एखाद्या हिमसंहती प्रमाणे कलकत्यापर्यंत येऊन आदळतील त्याचवेळी इंग्रजांच्या सेनेचा मुख्य आधार जो गुरखा त्याचीही गडबड उडाल्यावाचून रहाणार नाही कारण गुरखा सैनिक इंग्रजी सेनेत शिरतो, तेव्हा जी शपथ घेतो ती नेपाळचे महाराजाविरूद्ध मी लढणार नाही या अपवादानेच युक्त असते. तेव्हा इंग्रजांच्या अगदी म्यानात त्याची हिंदी तलवार बोथट होऊन आयत्या वेळी तुटण्याचा संभव आहे. नेपाळच्या ह्या संभवनीय स्वारीने गुरखा पलटणी त्यास जाऊन मिळण्याचा संभव आहे; इतकेच नव्हे, तर या अभूतपूर्व क्रांतीने स्फुरण पावून हिंदी लोकात गुप्तपणे ज्या थोड्या क्रांतिकारकांच्या टोळ्या वावरत आहेत असे पोलिस म्हणतात, त्याही त्या नेपाळी सैन्यास तत्काल जाऊन मिळाल्यावाचून रहाणार नाहीत. अशी महान धुमश्चक्री उडणे असंभवनीय नाही. आणि जर ही रणधुमाळी माजली, तर हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्यावर केवढे महान संकट कोसळून, ते कसे पायासुद्धा गदगद हालवून कोलमडू पाहील याची बरोबर कल्पना जर हिंदुस्थानात कोणास येणे शक्य असेल तर ती एका इंग्रजनांच होय!

कारण इंग्रज महाधूर्त आहेत. साम्राज्य जिंकण्याची आणि चालविण्याची कला ही इंग्रजी मुलांची जवळजवळ उपजत प्रवृत्ती (instinct)च होत आलेली आहे. १८५७ पासून इंग्रज आपल्या नेपाळचा उपयोग हिंदुस्थानच्या विरूद्ध करून घेत आहेत. पण नेपाळचा उपयोग करून घेण्याची बुद्धी ब्रिटिश हिंदुस्थानातल्या आपणा हिंदु लोकांना मात्र अजून सुचत नाही! त्यातूनही दुदैवाची गोष्ट म्हणजे नेपाळचे महत्व नेपाळचे नेपाळलाही कळत नाही- स्वतःलाही उपयोग करून घेण्याची बुद्धी त्याला सुचत नाही.

दुसऱ्याने कोणी सुचविली, तर ती वाक्ये ऐकण्याची देखील भीती वाटते. मद्रास राष्ट्रसभेमध्ये काबूलच्या अमीराचे नाव मधून मधून निघाले; पण त्याचवेळी ब्रिटिश हिंदुस्थानात आलेल्या नेपाळच्या महाराजांची मात्र कोणासही आठवणही झाली नाही. नेपाळचा आगामी महायुद्धातच नव्हे तर आगामी हिंदी राजकारणात केवढा उपयोग होणार आहे याची सध्याच्या पुढाऱ्यास काय नि त्यांच्या अनुयायास काय जाणीव अशी नाहीच नेपाळच्या त्या उपयोगाची रूपरेखा त्यांचे पुढे काढली गेली, तरी ते एखादी अंधारी खोली एकदम कोणी उघडली तर जसे आपण शून्यपणे डोकावून पुनः तिकडे पाहीनासे होतो, तसे अंधार भय होऊन त्रासाने होस हो मिळवून पुनः आपल्या एखाद्या विभागणीचा ठराव, सायमन सात किंवा आयर्विन आठच्या चिरपरिचित आणि चिरविफलित राजकीय भातुकली खेळण्यात दंग होतात, ह्या भातुकलीच्या पुढचा संसार शिकण्यास उपयुक्त आहेतच. पण भातुकलीचा खेळ म्हणजे संसार नव्हे. लहान मुलींना तो शोभतो पण त्यास खरा संसार समजून त्यात सर्व घरच जर रमू लागले तर त्या घराचे बारा वाजण्यास काही वेळ लागत नाही परंतु आज हिंदी राजकारणाची अशी भातुकली झाली आहे आणि तीतून सुटून नेपाळच्या सारख्या दूरवर परिणाम करणाऱ्या चळवळीकडे देशाचे अपराधी दुलर्क्ष होत आहे, हे जरी खरे आहे, तरी ते तसेच सदोदित होत राहील असे नाही. नेपाळच्या जागृतीची चिन्हे आधीच दिसू लागली आहेत. हिंदुसंघटनाचा दुंदुभी आज ना उद्या त्यास आणि आम्हा सर्वांस खडबडून जागा करील. त्याव्यतिरिक्त आगामी महायुद्धात तरी सरतेपदी नेपाळला निजता येणार नाही. कारण तिकडून रशिया त्यास चेपील किंवा इकडून इंग्लंड हलविल. नेपाळला महायुद्ध स्वस्थ राहू देत नाही हे निश्चित. आपणही त्या युद्धाचा अधिकात अधिक लाभ पदरी पाडून घेण्यासाठी हिंदु समाजाने संघबली बनून सिद्ध झाले पाहिजे.

श्रद्धानंद (१ मार्च १९२८)

## लेखांक ४ था

गेल्या तीन लेखांकातील विवेचनावरून इतके स्पष्ट होत आहे की निकट भविष्यात जे अँग्लो-रशियन महायुद्ध बहुशः घडणारसे दिसते ते आरंभताच इराण नि तुर्कस्थान हे रशियाच्या बाजूस प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे जाणार; अफगाणिस्थान उघडपणे रशियास मिळत हिंदुस्थानात उतरण्यास सज्ज होणार आणि स्वतः रशिया काश्मीर ते तिबेटपर्यंत सलग स्वारी करून हिंदुस्थानची उभी उत्तर सीमा लढाईचे प्रचंड रणक्षेत्र करून सोडणार. त्यातच जर आज नेपाळच्या जागृतीमुळे संभवनीय असणारा योगायोग जुळून येऊन नेपाळही त्याच्या दिव्य भवितव्यतेच्या दीप्तीमान दृश्याने आकर्षित होऊन किंवा रशियाच्या दाबाने भाग पडून रशियास मिळाला, तर हिंदुस्थानातील, इंग्रज साम्राज्यावर भयंकर प्रसंग गुदरून त्या जिवावरच्या संकटातून निभावणे इंग्रजास अत्यंत दुर्घट होणार आहे. जर नेपाळ इंग्रजांचेच बाजूस राहिला, तर मात्र इंग्रजांची बाजू थोडीशी सावरली जाणार आहे.

हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर सीमावर ही घटना चालत असता पूर्वसीमेवरील राष्ट्रातही इंग्रजांचे बाजूस येणारा कोणीही दिसत नाही. कारण चीन आज इंग्रजांचा कट्टर शत्रु झालेला आहे. त्याशिवाय तो गृहकलहात दंग आहे. त्या विस्तीर्ण देशातील उत्तरेकडील किंवा दक्षिणेकडील सरकारांपैकी कोणासही इंग्रजांच्या सहाय्यास येण्याची न इच्छा ना फुरसत! चीनची जनता तर आता हे पक्के जाणून आहे की त्यांच्या राष्ट्राचा अपहार करण्यासाठी इंग्लंड टपून बसलेले आहे. ब्रम्हादेशच्या सीमेवर चाललेल्या इंग्रजी सैनिक हालचाली म्हणजे चीनच्या साम्राज्याचे पोटात खुपसत जाणारा इंग्रजी खंजीर आहे. जर चीनला आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवणे असेल, तर हिंदुस्थानात इंग्रजांना पायबंद बसलाच पाहिजे, हे सत्य सन-यत्-सन च्या वेळेपासून चिनी राष्ट्रीय पक्षाच्या कार्यक्रमातील एक प्रमुख घटक झालेले आहे. अशा स्थितीत इंग्रजावर आक्रमण करण्यास जरी चीन पुढे येऊ शकला नाही, तरी इंग्रजींचे कैचीतून स्वदेश पूर्णपणे मुक्त करण्यासाठी तर तो आपले बळ खर्चील आणि आपल्या अस्तित्वास नेहमीच धोक्याचे असलेल्या ब्रिटिश हिंदी साम्राज्याचा रशियनाचे आघाताखाली चक्काचूर होण्याचा या सुवर्णसंधीस तो सैनिक नसले तरी मानसिक, आर्थिक आणि राजनैतिक साहय देण्यास एका पायावर सिद्ध राहील.

अशा रीतीने कॉकेशसपासून कॅन्टनपर्यंत उभा आशिया इंग्रजाचे विरूद्ध उठणार हे बहुधा निश्चित आहे. आणि हिंदुस्थानच्या सीमांवरील राष्ट्रे हिंदी ब्रिटिश साम्राज्याचे अस्तित्वावर अत्यंत भयंकर आणि मारक घाला घालणार. उभ्या आशियात ज्या एका बलाढ्य राष्ट्राच्या धोरणाविषयी आज काहीच निश्चितपणे सांगता येत नाही. असे राष्ट्र म्हणजे जपान होय. एवढे सोडले तर इंग्रजांना मित्र असा आशियात उरलेला नाही. आजपर्यंतही आशियात मित्र असा त्यांना नव्हताच. परंतु जर्मन महायुद्धापर्यंत त्याच्या विषयी मनातून जळफळणारी एशियन राष्ट्रे स्वतः इतकी निर्बल किंवा बेशुद्ध होती की, इंग्रजांना त्याच्या मैत्रीचे मूल्य ना शत्रुत्वाची भीती वाटे! पण या आगामी महासमरात रशिया, अफगाणिस्थान, तुर्कस्थान, चीन इत्यादी राष्ट्रांची शक्ती, संघटन आणि आंग्लद्वेष इतका वाढला आहे की, त्याचे शत्रुत्वाची आता उपेक्षा करणे इंग्लंडास शक्य नाही. इतकेच नव्हे तर तर त्या शत्रुत्वाशी आता जिवावरची एक झुंज घेतलीच पाहिजे हे इंग्लंडला कळून चुकले आहे.

इंग्रजांच्या हिंदुस्थानच्या साम्राज्यावर आगामी महायुद्धात कधी ही कोसळला नव्हता असा भयंकर प्रसंग कोसळणार आहे; हे वरील विवेचनावरून उघड दिसते. हिंदी साम्राज्य स्थापन झाले तेव्हापासून हिंदुस्थानच्या बाहेर जी महायुद्धे झाली ती युरोपात झाली. त्यामुळे हिंदुस्थानातील इंग्रजी सत्तेच्या प्रत्यक्ष माथ्यावरच कोणताही प्रचंड आघात पडू शकला नाही. हिंदुस्थानच्या आत एकच जिवावरचे संकट येऊन गेले; पण त्या ५७ च्या क्रांतियुद्धाचे प्रसंगी हिंदुस्थान आतून उठले असता बाहेरूनही इंग्रजी सत्तेवर मारक आघात करणारे शत्रु चढून आले नाहीत. त्यामुळे आजवर हिंदुस्थानी किंवा हिंदुस्थानेतर एक-एकट्या शत्रूंशी इंग्रजांना लढता आले. पण या महायुद्धात इंग्लंडवर हिंदुस्थान आणि हिंदुस्थानाबाहेर असलेल्या त्याच्या शत्रूंशी एकाच वेळी प्रचंड युद्ध करण्याचा कठिण प्रसंग गुदरणार आहे. असे संकट हिंदुस्थानातील इंग्रजी सत्तेवर आजपर्यंत कधीही आलेले नव्हते.

या सर्व लेखांकांत आम्ही काय व्हावे हे सांगत नसून, काय होण्याचा दृढतर संभव आहे तेच सांगत आलो.

त्या दृष्टीने पाहता हिंद आणि इंग्लंड, दोघांनीही लक्षात ठेविले पाहिजे की, आपणास आवडो वा न आवडो परंतु या आगामी महायुद्धात रशिया आणि अफगाणिस्थान जर हिंदुस्थानवर स्वारी करून आले तर वर विवृत्त केलेल्या कारणासाठी हिंदुस्थानचे प्रांतातून देखील लढाईच्या दंग्या-धोक्याच्या आणि प्रसंगविशेषी क्रांतीच्या ज्वाला

आणि धुमाळ्या उठल्यावाचून राहणार नाहीत. कारण ह्या ज्वाला हिंदी लोकांनी स्वेच्छेने न पेटविल्या तरी इंग्रजांचे शत्रु बळाने पेटवतील. अफगाणिस्थानच्या सेनेने पेशावर ओलंडले असे ऐकताच त्याचे हिंदुस्थानात असणारे असंख्य दूत धर्माचे ढोंगाखाली मद्रासपर्यंत बखेडे माजवतील, रशियाची विमाने हिंदुस्थानावर छापे घालून ठिकठिकाणी भयंकर उत्तेजना पसरवून अशांतता आणि अव्यवस्था याचे दळभार उभारील. त्यात ही जर का नेपाळ इंग्रजाविरूद्ध गेला किंवा त्यास जाणे भाग पाडले गेले, तर हिंदुस्थानात कोण्यातरी भूकंपीय उलाढाली झाल्यावाचून राहणार नाहीत.

हिंदुस्थानात ह्या दोन तीन पिढ्यांच्या आठवणीत अशा एखाद्या भूकंपीय राजकारणी प्रलयाचा अनुभव आलेला नाही. आपल्या आजच्या दुर्बळ आणि अंध पिढीस त्याची बरोबर कल्पना करू पाहिली तरी करवत नाही ही गोष्ट जरी खरी आहे, तरी आपल्या हिंदुस्थानच्या विगत इतिहासात साम्राज्याच्या अशा कित्येक उलाढाली शतका अर्धशतकामागे होत आलेल्या आहेत हे विसरता कामा नये. काबूलपासून कोलंबोपर्यंत अशोकाचे साम्राज्य आणि वर्चस्व असेच प्रस्थापित झालेले होते- अमर भासत होते; पण ते आता कोठे आहे? राजपुती साम्राज्यांचे केवढे ते बल आणि हिंदुकशपासून सिंहलपर्यंत कसली ती दिग्गजांना बांधून टाकील अशी त्यांची सबळ साखळी! पण महमद घोरीच्या एका सबळ स्वारीसरशी दिल्ली जी हिंदूंच्या हातून गेली ती नित्याची गेली! अकबराचे ते, त्या राजपुतांनीही आपल्या मुली देऊन ज्यास जगदीश्वर म्हणून गौरवावे ते सिंहासन, कोण अढळ दिसत होते. पण भाऊच्या घणाच्या एका घावाखाली ते भुसक्या लाडूसारखे चुरून गेले नाही का? खर्ड्याच्या अद्भुत विजयानंतर जेव्हा मराठी साम्राज्याच्या विजयी सेना पुण्यात जयोत्सवाची मिरवणूक काढून सवाई माधवावर सोन्यामोत्याची फुले वर्षत शनिवारचे वाड्यात शिरल्या, त्यादिवशी त्या लाख दीडलाख मराठी घोड्याच्या आणि तोफखान्याच्या आणि तलवारीच्या अफाट रानातून वाट कापीत वीस वर्षाचे आतच एक इंग्रज त्या शनिवार वाड्यात घुसून, पेशव्यास हुसकून देऊन आपण त्या गादी वर बसले हे कोणास खरे वाटते? काश्मीर-काबूल ते सतलजपर्यंत ज्याचा शब्द म्हणजे शस्त्राज्ञा होती, तो रणजीतसिंह आणि त्याचे ते बलाढ्य शीख! पण युद्धाच्या एका चुटकीसरशी मातीस मिळाले ना? आणि ते राज्य! आज लाहोरास त्याचे काय उरले आहे? हिंदुस्थान राजकीय ज्वालामुखीच्या स्फोटाचे एक ठाणे आहे? त्यात केव्हा काय होईल याचा काय नियम!

जर्मन युद्धात युरोपखंडात तरी एका चार वर्षात केवढे मन्वतंर झाले! ते पोलंड तीन राक्षसाच्या टांचाखाली चेपलेले! रशिया, जर्मनी, ऑस्ट्रिया! एकेकाशी लढणे अशक्य होते, मग तिघांची गोष्ट कशाला! असे तीनशे वर्षे ते झुंजत, मरत, सडत पडले होते; पण त्या महायुद्धाची संधी त्याने साधली-आणि चारशे वर्षांचा प्रश्न चार वर्षात सोडवून त्या तिन्ही सुंदोपसुदांच्या परस्पर नाशाचे पोटातून ते स्वतंत्र पोलंड निर्माण झाले! सर्व्हिया केवढा वाढला! उलट तुर्कांचे तुकडे उडाले, तो आमालिनया कधी तरी स्वतंत्र होओलसे दिसत होते का? पाचशे वर्षावर पारतंत्र्यात पिचून गेला होता. आणि झटक्यासरशी परराष्ट्रीय राजकारणाचे सुरूंग उडताच एखाद्या स्प्रिंगवरील मनुष्य पडताच ती जशी केवळ प्रतिक्रियेसरशी ताडकन वर येते तसा तुर्क परस्पर खेचा खेचीत पडताच ताडकन वर आला! उलट तो बलाढ्य जर्मन बादशहा आणि त्याची ती बादशाही! होती का नव्हतीशी झाली! तसेच या येत्या प्रचंड महायुद्धात उभ्या आशियात जी कालशक्तीने भरून ठेविलेली भयंकर सुरूंगाची ओळची ओळ उडेल, त्या भडक्यासरशी आणि धडक्यासरशी हिंदुस्थानची छकले होतील का असलेली छकले जुळून जातील ते कोणी कसे निश्चित सांगावे? का अफगाणिस्थानच्या स्वारी सरशी उभा मुसलमान उठून मोठा आकांत होतो, का नेपाळच्या वीर गुरख्यांची धाड बिहार-बंगालवर कोसळून एखादी महान हिंदु शक्ती निर्माण होते का ती दोन्ही अपूर्व स्थित्यंतरे एकत्र घडून हिंदुस्थान विभागले जाते, का रशियाचे ध्वज दिल्लीपर्यंत पोचवून एखादी सामाजिक आणि आर्थिक क्रांती हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानातच आपापसात डोकी फोडीत भीषण थैमान घालू लागते, का तिचा लाभ घेऊन इंग्लंड पुनः ह्या सगळ्यांचे छातीवर आहे त्याहूनही बलाढ्य होऊन बसते? ते कोणी निश्चित सागांवे? निश्चित नसले तरी जवळ जवळ निश्चितपणे ह्या दोन गोष्टीच काय त्या सांगता येतील की जर या सर्व संभवांची यथायोग्य छाननी आजपासून हिंदुस्थानने केली नाही आणि त्या प्रचंड घडामोडींच्या सपाट्यांत आपल्याला काय घडवायाचे आणि काय मोडावयाचे ते एव्हांपासून रेखून ठेवून ते कसे साधावयाचे याची रुपरेखा आखून, आणि तत्काळ त्याप्रमाणे कृति करावयास लागून या जागतिक प्रलयात पद्धतशीरपणे उडी घालण्याचे ठरविले नाही, तर एकतर हिदुस्थान जर्मन महायुद्धाहून अनेकपटीने त्यास अनुकूल असलेली हीही सुवर्णसंधी गमावून बसेल. समुद्रातून कोरडेचे कोरडेच बाहेर येईल किंवा यदृच्छेने काहीचे बाहीच जे घडेल तसे बनून राहील. नाहीतर जर त्याने एव्हांपासून त्या जागतिक प्रलयाची वायुमापनादी साधनांनी शक्य ती छाननी केली आणि तिला तोंड कसे आणि कोठे द्यावे ते ठरवून आपल्या साहसाचे नौसाधन आपल्या आकांक्षेचे आरमार-देवाचे नांव

घेऊन समुद्रात सोडून दिले, तर बहुशः हे भारत त्याच्या अभिष्ट गंतव्यालाही जाऊन पोचेल! पतित भारताचे महाभारत होईल!

(श्रद्धानन्द, ८ मार्च १९२८)

## नेताजी सुभाषबाबूंची नि माझी शेवटची भेट आणि नंतर...

दिनांक २२ जून १९४० ह्या दिवशी त्यावेळचे देशगौरव आणि आताचे नेताजी सुभाषचंद्र बोस हे अकस्मात सावरकर सदनात येऊन मला भेटले.

त्याकाळात दुसरे जागतिक महायुद्ध भर रंगात आलेले होते. सुभाषबाबू मुंबईला मुख्यतः हिंदु-मुसलमानाच्या एकीचा प्रश्न नित्याचा मिटवून टाकण्यासाठी आलेले होते. वृत्तपत्रात जी भाषा त्यावेळेस वापरलेली मी वाचली तीतच बोलायचे म्हणजे "बॅ. जिनांची समजूत घालण्यासाठी ते गांधीजींच्याही पुढे चार पाउले जाणार होते. (He was going to outbid Gandhiji)``

ही वृत्तपत्री भाषा सोडली तरी आम्ही बैठकीत बसताच ते स्वतः मला मनमोकळे हसत म्हणाले, "अहो, मी जिनांना आताच भेटून आलो पण काय गंमत सांगावी! त्यांनी मला विचारले, "मिस्टर सुभाषबाबू पण तुम्ही कोणाच्या वतीने ही तडजोडीची बोलणी करावयास येता आहात?" मी (सुभाषबाबू) म्हणालो, "काँग्रेसच्यावतीने" त्यावर जीना म्हणाले, "पण तुम्हाला तर काँग्रेसने बहिष्कारलेले आहे. मी म्हणालो, "पण Forward Block चा तरी मी अधिकृत पुढारी आहे की नाही? त्याच्या वतीने मी बोलू शकतो. त्यावर जिना म्हणाले, "परंतु जर तुम्ही मला मुसलमानांचा पुढारी म्हणून हिंदुमुसलमानांच्या तडजोडीकरिता भेटत असाल तर हिंदूच्या प्रतिनिधित्वाचा अधिकार असलेल्या कोणाशी तरी बोलण्यात अर्थ आहे. तुमचा Forward Block स्वतःला हिंदूसंस्था म्हणवून घेतो आहे का? नाही! मी (सुभाषबाबू) म्हणाले तर मग मी एक हिंदु म्हणून तरी हिंदु-मुसलमान तडजोडीविषयी बोलू इच्छितो" त्यावर जीना म्हणाले. "तर मग तुम्ही प्रथम सावरकरांना जाऊन भेटा. हिंदूचे प्रतिनिधित्व ते करू शकतात, व्यक्ति-व्यक्तीशी चर्चा करून काय उपयोग? सावरकर आले तर आपण काही चर्चा करू!" तेव्हा मी (सुभाषबाबू) जीनांचे घरून निघालो नि आपल्याकडे तडक आलो!" असे म्हणून सुभाषबाबू एकदा स्वतःच पोटभर हसले! नंतर पुन्हा म्हणाले "नाहीतरी मला आपल्याकडे एकदा यावयाचेच होते या पाळीला."

## साहसी प्रयत्नावाचून स्वातंत्र्य अशक्य

सुभाषबांबूनी काढलेल्या त्या हिंदु-मुसलमान एकीच्या मुख्य प्रश्नाविषयी मी काय चर्चा केली ते स्थलाभावी सोडून देतो. इतर सर्व चर्चा टाळून सांगा की चालू महायुद्धाच्या संकटात ब्रिटन सापडले असता आपणासारख्या पुढाऱ्यांनी हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात राहून हॉलवेलचा पुतळा कलकत्याच्या मार्गातून उखडून टाकण्याच्या चळवळीसारख्या सापेक्षतः अगदी क्षुल्लक चळवळीपायी ब्रिटिशांच्या बंदीगृहात जाऊन सडत पडण्यात काहीतरी अर्थ आहे का?"

तेव्हा किंचित् निराशेच्या स्वरात सुभाषबाबू उत्तरले. "जनतेत काहीतरी करून ब्रिटिशांविरूद्ध क्षोम चेतवीत राहिले पाहिजे. नाहीतर करावे तरी काय?

मी म्हणालो, "आपली तळमळ मी जाणतो. पण पुन्हा आपणास विचारतो की गव्हर्नर जनरल सुद्धा हे सहस्त्रावधी ब्रिटिश प्रपीडक (Tyrants) हिंदुस्थानात राज्य करीत असता हॉलवेलसारख्या मेलेल्या ब्रिटिश प्रपीडकांचे दगडी पुतळे हलविण्यातच ज्याचा व्यय होतो- तो जन क्षोभही निरर्थकच नाही का? आणि त्यापायी तुमच्यासारखा पुढाऱ्याने बंदिवासात पडणे म्हणजे शत्रूला जे हवे तेच नेमके आपण होऊन करणे नव्हे काय? खरे राजकारण म्हणजे शक्य तर शत्रूला बंदिगृहात डांबावे; स्वतःलाच नव्हे! हे पहा सुभाषबाबू, मी आपल्याला स्पष्टच विचारतो की आपण सशस्त्र क्रांतिकारकांशी सक्रीय नसलात तरी संबंध राखीत आला आहात. आपण गुप्तता राखू शकता. मागेही तुम्ही काँग्रेस अध्यक्ष असताना आपली माझी अंतस्थ(confidential) भेट झाली होती. तितक्याच विश्वासाने त्याच सूत्रास धरून मी आपणास असा आग्रह करू इच्छितो की सध्या ब्रिटिश हिंदी सैन्यामध्ये शक्य तितक्या हिंदूंची भरती करण्यासाठी हिंदुसभेच्या ढालीखाली मी जे सैनिकीकरणाचे भारत व्यापी नि आता बहु अंशी यशस्वी होत चाललेले आंदोलन चालविले आहे ते मूलतः क्रांतिकारक आंदोलन आहे. आपण त्याच्याविरूद्ध प्रचार करता तो मी जाणून आहे आपल्याला वाटेल की त्यायोगे कॉग्रेसमधल्या तुम्हालाही मवाळ वाटणाऱ्या इतर पुढाऱ्याप्रमाणे मी ब्रिटिशांना मनुष्यबळाचे सहाय्य देत आहे. पण वस्तुस्थिती सांगतो ती ऐका."

इथे मी त्यांना पहिल्या महायुद्धातील सशस्त्र क्रांतिकारकांनी जर्मनीशी केलेल्या तुल्य-अरीमित्र संधीची आणि ब्रिटिश हिंदी सैन्यातील जर्मनीच्या हाती पडलेल्या हिंदी सैनिकात क्रांतिसैन्य कसे उभारले गेले इत्यादी प्रकरणाची माहिती सांगितली.
मी पुढे म्हणालो, " की रासबिहारी बोसांचे हे ताजे पत्र पहा. ह्यावरून असे दिसते की जपान ह्या वर्षाच्या आत युद्ध पुकारील; असा उत्कट संभव दिसत आहे. जर असे झाले तर आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी जर्मनी जपानच्या अद्ययावत् शस्त्रानिशी नि लढाईत मुरलेल्या सहस्त्रावधी हिंदी सैनिकांनीशी हिंदुस्थानावर बाहेरून स्वारी करण्याची ही कधीही न आलेली सुवर्णसंधी आपणास साधणारी आहे. अशावेळी स्वदेशात अत्यंत क्षुल्लक नि बोलभांड चळवळीपायी आपल्या सारख्या पुढाऱ्याने स्वतःच बळेच इंग्लिशांकडून पकडून घेऊन बंदिवासात बळेच शिरून कुजत पाडणे सर्वस्वी हानिकारक आहे. काँग्रेस किंवा तत्सम निःशस्त्र प्रतिकारवादी संस्थेच्या कोणत्याही पुढाऱ्यापेक्षा ब्रिटिश सत्ता आपणासच प्रथमतः पकडण्यास टपलेली आहे. अशावेळी रासबिहारीसारखे अनेक सशस्त्र क्रांतिकारक पुढारी जसे हिंदुस्थानातून ब्रिटिशांच्या हातावर तुरी देऊन जपान, जर्मनी येथे निसटून गेले; तसे आपणही तत्काळ झुलकांडी देऊन देशाबाहेर निसटून जावे. तिकडे इटली जर्मनीच्या हाती पडलेल्या सहस्त्रावधी हिंदी सैनिकाचे पुढारीपण उघडपणे स्वीकारावे. हिंदुस्थानच्या संपूर्ण स्वातंत्र्याची प्रकट घोषणा करावी आणि जपान युद्धात पडताच साधेल त्या मार्गाने बंगालच्या उपसागरातून म्हणा किंवा ब्रम्हदेशातून म्हणा- हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेवर बाहेरून स्वारी करावी. असा काहीतरी सशस्त्र नि साहसी पराक्रम केल्यावाचून आपण हिंदुस्थान स्वतंत्र करू शकणार नाही. असा पराक्रम नि साहस करण्यासाठी जी दोन तीन माणसे आज मला समर्थ दिसतात त्यात आपण एक आहात. त्यातही माझा आपणावरच डोळा आहे!"

इतके बोलून मी थांबलो. सुभाषबाबू कोणत्या तरी आकस्मिक विचाराच्या तंद्रीत मनुष्य खाली पहात बसतो तसे काही वेळ स्तब्धपणे खाली पहात बसले

मी केलेल्या सूचनेवर त्यांनी झटपट काही तरी हो किंवा नाही म्हणावे असा माझा कोणताही आग्रह नाही,हे दर्शविण्याकरिता मी बळेच तो विषय अगदी सोडून देऊन त्याच्या "My Strange illness" ह्या लेखाचा विषय काढला पण तेच होऊन मला म्हणाले, "मी आता प्रथम कलकत्याला जाऊन, तेथे काय घडते ते पहातो. आणि मग माझा पुढचा नक्की कार्यक्रम कोणचा तो ठरवीन. इकडे आल्यास आपल्याला

पुन्हा भेटेनच." यापेक्षा ह्याविषयी अधिक उलगडा मी विचारला नाही त्यांनी केला नाही.

आणि नंतर-----

थोड्याच दिवसात सुभाषबाबू कलकत्याला गेले आणि जाताच पुतळा प्रकरणात पकडले जाऊन बंदिगृहात टाकले गेले, म्हणून अपेक्षित बातमी आली!

बंदिगृहात पडल्यानंतर मात्र त्यांच्या मनातील हिंदु-मुस्लीम ऐक्य, हॉलवेलचा पुतळा प्रभृति पूर्वीचे जे काय असतील नसतील ते सारे सापेक्षतः क्षुल्लक नि वायफळ कार्यक्रम झिडकारले जाऊन, त्यांचे सारे प्रयत्न बंदिवासातून कशीतरी सुटका करून घेऊन जर्मनी जपानकडे निसटून जाण्याचे साहस करण्यावरच केंद्रित झाले हे आता प्रसिद्ध झालेल्या सर्व वृत्तावरून उघडच आहे. त्यांनी बंदिवासात अन्नत्याग केला. ब्रिटिश शासनाच्या मानहानी करणाऱ्या अटी मानूनही पण सुटका करुन घेतली आणि नंतर पुन्हा बंदिगृहाकडे परतण्याआधीच अत्यंत धाडसाने नि कौशल्याने ते ब्रिटिश सत्तेच्या हातावर तुरी देऊन हिंदुस्थानातून निसटले.

जर जर्मन प्रभृति ब्रिटिश शत्रूंच्या राष्ट्रात जाऊन तेथील पाडाव झालेल्या सहस्त्रावधी हिंदी सैनिकातून सशस्त्र क्रांतिकारक मुक्ति सैन्याची उभारणी करण्याचा बेत सुभाषबाबूच्या मनात माझी भेट होण्यापूर्वीच ठरलेला असता तर इंग्रजांच्या हातून परराष्ट्रात निसटून जाण्यास ज्यावेळी ते स्वतंत्र होते त्यावेळी अधिक सुलभपणे यत्न करता आला असता आणि त्यांच्यासारख्या चाणाक्ष पुढाऱ्यांनी हालवेच्या पुतळा प्रकरणासारख्या क्षुद्र गोष्टीपायी स्वतःवर जाणून बुजून ओढवून घेण्याचा अनाडीपणा कधीही केला नसता! अर्थात बहुधा माझ्या भेटीत मी केलेल्या गंभीर सुचनेमुळेच परराष्ट्रात जाऊन क्रांतिकार्याची धुरा अंगावर घेण्याची निश्चित कल्पना नी स्फूर्ति नेताजी सुभाषचंद्राना झाली असली पाहिजे.

## हिटलर मुसोलिनीशी संधी

जर्मनीत पोचताच सुभाषबाबूंनी उघडपणे हिटलर मुसोलिनीशी तुल्यारिमित्र संधी करून ब्रिटिशांच्या विरूद्ध भारतीय युद्धांची घोषणा कशी केली, इटली जर्मनीच्या हाती पडलेल्या सहस्त्रो ब्रिटिश हिंदी सैनिकांना जर्मनीच्या अद्ययावत् शस्त्रास्त्रांनी सुसज्ज

करून भारतीय क्रांतिसेना कशी उभारली, जर्मन पाणबुडीतून ते जपानने जिंकून घेतलेल्या सिंगापूरला कसे गेले, सिंगापूरहून ब्रिटिश सेनानी पळून गेल्यामुळे तिथे उरलेल्या शस्त्रास्त्रांच्या अपार साठ्याने सुद्धा तेथील ४० ते ५० सहस्त्र हिंदी सैन्याने जपानच्या पाठिंब्यामुळे रासबिहारी बोसांच्या नेतृत्वाखाली हिंदुस्थानला मुक्त करण्यासाठी क्रांतिसैन्य कसे उभारले, सुभाषबाबू तेथे पोहचताच त्याच सैन्याचे सरसेनापती होऊन, त्याच शस्त्रबळाच्या आधारावर त्यांनी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची जागतिक घोषणा करून स्वतंत्र हिंदुस्थानचे अस्थायी राज्य शासन (Provisional Government) कसे स्थापिले आणि सिंगापूरहून चलो दिल्ली ची रणगर्जना करीत हे क्रांतिसैन्य ब्रम्हदेश ओलांडून थेट आसामच्या दाराशी भिडून ब्रिटिश सैन्याशी रणक्षेत्रात कसे लढत राहिले हे सर्व वृत्त आता आपणा सर्वांना काही अंशी विदित झालेलेच आहे.

## सैनिकीकरणामुळेच स्वतंत्र सेनेला सैनिक मिळाले.

याच मध्यंतरात हे जे पन्नास-साठ सहस्त्राचे हिंदी सैन्य अद्ययावत शस्त्रास्त्रासह सुभाषबाबूंना उभारता आले ते आधी हिंदुस्थानात ब्रिटिश सैन्यात सहस्त्रावधी हिंदु सैनिकांची भरती करणाऱ्या आमच्या सैनिकीकरणाच्या आंदोलनामुळेच शक्य झाले ही गोष्ट सुभाषबांबूनी स्वतःच प्रकटपणे घोषित केली. सिंगापूर येथील आझाद हिंद नभोवाणीवरून सन १९४४ च्या जून २५ व्या दिनांकास प्रक्षेपित झालेल्या सरसेनापति सुभाषबाबूंच्या भाषणात ते म्हणाले, “When due to mis-guided political whims and lack of vision almost all the leaders of Congress party have been decrying all the Soldiers in Indian Army as mercenaries, it is heartening to know that Veer Savarkar is fearlessly exhorting the youths of India to enlist in the Armed Forces. These enlisted youths them selves provide us with trained men and Soldiers for our Indian National Army” (काँग्रेसमधील बहुतेक अदूरदर्शी पुढारी ब्रिटिश हिंदी सैन्यास केवळ भाडोत्री पटबाबू म्हणून सारखे निंदित असता ही उत्साहदायी गोष्ट आहे की वीर सावरकर निर्भयपणे हिंदी तरुणांना सशस्त्र सैन्यांत शिरा म्हणून सारखे उत्तेजित आहेत. ब्रिटिश हिंदी सैन्यांत शिरलेल्या ह्याच हिंदी तरुणांतून आज आमच्या हिंदी राष्ट्रीय सैन्याला I.N.A. ला समरकलेत प्रवीण नि मुरलेल्या प्रशिक्षितांचा (Teained men) नि सैनिकांचा पुरवठा होत आहे.)

अलिकडे म्हणजे सन १९५४ ऑगस्टमध्ये एक सुप्रसिद्ध जपानी ग्रंथकार श्री. जे. जी. ओहसावा ह्यांनी The Two great Indians in Japan ह्या नावाचे पुस्तक प्रसिद्धीले आहे. त्यात त्यांनी रासबिहारी बोसांच्या चरित्राविषयी नि विशेषतः जपानमधील वास्तव्यांत त्यांनी केलेल्या क्रांतिकारक कार्याविषयी अश्रूतपूर्व असा वृत्तांत लिहिलेला आहे. दुसऱ्या महायुद्धात जपानी सैन्य सिंगापूरवर चालून गेले. तेव्हा तेथील ब्रिटिश हिंदी सैन्याशी जपानी सैन्याची लढाई चालली असता, सेनापती रास-बिहारी बोसांच्या क्रांतिकारक सैन्या (I.N.A.) ची तुकडीही ब्रिटिशांशी लढत होती. ह्या ग्रंथातील त्या प्रसंगासंबंधीच्या दैनंदिनीतील एक उतारा मी तुटकपणे देत आहे.

"...February : Japanese attack on singapore begun... The resistance of British Indian Force was strong. The Imperial Guards (The Japanese) H.Q. had to encounter many difficulties..."

"The chief of the Indian National Army (I.N.A.) proceeded alone to the front line and talked to Indian officers and soldiers in the British Army not to be false to their love of India and the independence of India in strling heart stirring words. Miracle accomplished!! The shooting (on the side of British Indian Forces) was stopped". Savarkars Militarisation policy in world war II began to take shape.
"The speech was finished. Waves of Cheers rose from the Indian soldiers who jumped into the Indian National Army (I.N.A.)! (even) The Japanese Imperial Guards were entirely stupified!"

"Fall of Singapore."

...Surrendered. British soldiers numbered some 45,000 and Indians too. I.N.A. absorbed these Indians (Soldiers and officers) and developed these Indians (soldiers and officers) and developed into a formidable foeces of 50,000.

"... Amongst the Indians nearby surrendered (I.N.A.) there were some 30 officers including Lt. Col. Gil. Rash Behari became Supreme Commandant".

बाहेरून ह्या क्रांतिकारक I.N.A. चे शस्त्रसज्ज सैनिक ब्रिटिशांवर चालून येत असताना हिंदुस्थानच्या आतही निःशस्त्रवादी नि अहिंसक म्हणविणाऱ्या काँग्रेसने निःशस्त्र प्रतिकाराचा उठाव केला. Quit India, but keep your Army here ही त्यांची प्रकट घोषणा होती. ब्रिटिशांनो, हिंदुस्थान सोडा, पण तुमचे सैन्य मात्र हिंदुस्थानात ठेवा. ही काँग्रेसची घोषणा जरी वदतोव्याघाताचे उत्कृष्ट उदाहरण होते. तरी सुदैवाने जनतेला त्यातील Quit India एवढा पूर्वार्धच काय तो ऐकू आला नि समजला. पण keep your army here हा बावळट नि भेकड उत्तरार्ध जनतेला नीटसा ऐकू आला नाही नि समजला तर नाहीच नाही. ह्या Quit India च्या काँग्रेसी आंदोलनानेही देशभर मोठी खळबळ उडवून दिली. काँग्रेसमधील शेकडो देशभक्त पुढारी बंदिवासात पडले. त्या त्यांच्या कार्याविषयी नि कष्टांविषयी त्यांचेही यथाप्रमाण आभार आहेतच. पण सर्वांना तो वृत्तांत माहितच आहे. म्हणून त्याची पुनरुक्ति न करता त्या Quit India चळवळीविषयी जी गोष्ट स्वतःस अहिंसक म्हणवून घेणाऱ्या काँग्रेसीय लेखकांकडून जाणून बुजून सांगितली जात नाही. ती तेवढी येथे ठळक पणे सांगतो. ती गोष्ट ही की, बंदिवासात जाणे, हरताळ पाडणे, प्रभृति केवळ आत्मक्लेशी नि निःशस्त्र साधनांनी ती चळवळ दडपून टाकण्यासाठी सशस्त्र अत्याचार करीत चाललेल्या हिंदुस्थानातील ब्रिटिश अधिकाऱ्यांना तोंड देणे आणि ब्रिटिश सत्तेला हादरा बसेल असा परिणामकारक प्रतिकार करणे अशक्य आहे, असे अनुभवास आलेल्या काँग्रेसमधील शेकडो नेत्यांनी नि अनुयायांनी शेवटी सशस्त्र क्रांतिकारकांचाच मार्ग पत्करला. त्यांनी पटापट भूमिगत होऊन गुप्तपणे ब्रिटिश सत्तेचा सशस्त्र प्रतिकार चालविला नि एकच रक्तपाती धुमाकूळ उडवून दिला. शेवटी निःशस्त्रवादी काँग्रेसच काही काळ सशस्त्र क्रांतिकारकांची मठी बनली.

## हिंदुस्थानशी संधी करण्यास ब्रिटन सिद्ध

ह्याप्रमाणे एकीकडे हिंदुस्थानात ह्या काँग्रेसमधील सशस्त्र क्रांतिकारकांचा हा धुमाकूळ आणि दुसरीकडे क्रांतिकारकांची हिंदुस्थान मुक्त करण्यासाठी बाहेरून येणारी मोठमोठी सैन्येची सैन्ये यांच्या कात्रीत हिंदुस्थानातील गांगरलेली ब्रिटिश सत्ता सापडली असता जपानवर अमेरिकेचा पहिला ॲटमबॉम्ब पडला नि जपान

शरण गेला! तिकडे युरोपमध्ये हिटलर मुसोलिनीचा सपशेल पराभव झाला. अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स ह्या त्रयीने ते दुसरे महायुद्ध जिंकले.!

परंतु ब्रिटनपुरता तरी त्याचा विजय हा, जिवावरच बेतले होते ते शेपटावर गेले, इतक्या पुरताच होता. ब्रिटन देश जरी वाचला तरी त्या दोन महायुद्धांच्या माऱ्याखाली ब्रिटनच्या साम्राज्यशक्तीचा आणि उन्मत्तपणाचा चक्काचूर झाला. हिंदुस्थानपुरते बोलायचे तर ब्रिटनची त्या महायुद्धाच्या शेवटी अशी स्थिती झाली होती की (१) हिंदुस्थानातील भूदल, नौदल नि आकाशदल ह्या तीनही विभागातील झाडून साऱ्या हिंदी सैन्याने ब्रिटिश विद्रोहाचा उठाव केलेला होता. किंवा ते सैन्य तसा उठाव करण्याच्या मनस्थितीत होते. २) १८५७ मध्ये हिंदी सैन्य ब्रिटिश सत्तेवर जेव्हा उलटले तेव्हा सहस्त्रावधी जातिवंत ब्रिटिशांचे नवे सैन्य ब्रिटन हिंदुस्थानांत धाडू शकले आणि त्या विद्रोहाचा नायनाट केला गेला. परंतु महायुद्धाच्या शेवटच्या ह्या काळात जर्मनी, जपान जरी धुळीला मिळाली तरी बोल्शेव्हिक रशियाच्या विजयामुळे ब्रिटनला पाण्यात पहाणारा एक नवा शत्रू उत्पन्न झाला आणि त्या विद्रोहाचा नायनाट केला गेला. परंतु महायुद्धाच्या वेळी मित्र म्हणवून म्हणविणाऱ्या अमेरिकेच्या हातातला ॲटमबॉम्ब पाहून त्या मित्राचीही धास्ती ब्रिटनला शत्रूइतकीच वाटू लागली. अशा स्थितीत प्रत्यक्ष आपल्या स्वदेशाचेच संरक्षण करण्यासाठी सारे जातिवंत ब्रिटिश सैन्य ब्रिटनला आपल्या घरीच आणून ठेवणे भाग पडले. हिंदुस्थानसारख्या विस्तीर्ण नि आता कट्टर ब्रिटिश विद्रोही बनलेल्या देशावर स्वतःची साम्राज्य सत्ता शस्त्र शक्तीने चालविण्यासाठी जुने वा नवे असे कोणाचेही जातिवंत ब्रिटिश सैन्य इकडे धाडणे ब्रिटनला अशक्य झाले आणि (३) या दुहेरी पेचामध्ये सापडल्यामुळे पूर्वीप्रमाणे हिंदुस्थानातल्या हिंदी सैन्याच्या बळावर हिंदुस्थानावर राज्य करणे ब्रिटिशांना अशक्य झाले आणि स्वातंत्र्यासाठी ब्रिटिशांविरुद्ध सशस्त्र विद्रोह करून उठलेल्या हिंदुस्थानला शरण जाण्यावाचून ब्रिटनला गत्यंतर उरले नाही.

तेव्हा निरुपाय म्हणून ब्रिटनने हिंदुस्थानला काही अटींवर स्वातंत्र्य देण्याचे आणि हिंदुस्थानातून आपला गाशा गुंडाळण्याचे ठरविले आणि हिंदुस्थानशी संधी करण्यास ब्रिटन सिद्ध झाले.

Independance of India Act च्या वेळी ब्रिटिश पालर्मेंटमध्ये साम्राज्यसत्ता सोडण्याचा प्रसंग आल्यामुळे दुःखी कष्टी झालेल्या चर्चिलच्या एका प्रश्नास निरुपाय

आहे म्हणून उत्तरितांना त्यावेळचे ब्रिटिश पंतप्रधान अ‍ॅटली ह्यांनी ज्या तीनचार वाक्यात ब्रिटनच्या मनाचे अगदी सूक्तरुपाने वर्णन केले ती वाक्ये अशी-

“Britain is transferring power due to the fact that (१) The Indian Mercenary army is no longer loyal to British and (२) Britain cannot afford to have a large British Army to hold down India”.

ह्या दोन सैनिक दुर्बलतेच्या कारणाने ब्रिटनला हिंदुस्थान सोडावे लागले. “अहिंसेचे तत्व आम्हास पटल्यामुळे, आमचे हृदयपरिवर्तन झाले किंवा साम्राज्यवाद अन्याय्य आहे म्हणून स्वेच्छेने आम्ही हिंदुस्थान सोडले” असे काही ब्रिटनचे पंतप्रधान अ‍ॅटली किंवा कोणताही ब्रिटिश सभासद म्हणाला नाही! अर्थात सन १९०६ पासून ४७ पर्यंत सशस्त्र क्रांतिकारक पक्षाने हिंदी सैन्यांत ब्रिटिश विद्रोह जो फैलावला आणि परराष्ट्रीय राजकारण लढवून दोन्ही महायुद्धांत ब्रिटनच्या शत्रूशी संधी करून त्यांच्याकडून शस्त्रबळ संपादून सशस्त्र क्रांतिकारकांनी रणांगणांत जी झुंज दिली त्यामुळेच ब्रिटिश सत्ता ह्या पेचात सापडली. ह्याचा प्रत्यक्ष ब्रिटिश पंतप्रधानांच्या तोंडूनच हा पडताळा मिळत आहे.

परंतु अशा अत्यंत आणीबाणीच्या वेळी ब्रिटनशी हिंदुस्थानच्या वतीने संधी करण्यास जे त्यातल्या त्यात कच्चे तेच प्रतिनिधी निवडले गेले. Quit India चळवळीचा परिणाम Split India मध्ये होईल. छोडो हिंदुस्थानचा परिणाम तोडो हिंदुस्थानात होईल; म्हणून ज्या हिंदी राजकीय पक्षाला तुम्ही आपले प्रतिनिधी म्हणून निवडू नका असे माझ्यासारखे सशस्त्र क्रांतिकारक आणि हिंदुसंघटक कंठशोष करून सांगत होते. तोच पक्ष जनतेकडून प्रतिनिधी म्हणून निवडून दिला गेला. अर्थात त्यांच्याशीच त्यांच्या राजकीय कच्चेपणाचा लाभ घेऊन ब्रिटनने देशाचे तुकडे पाडण्याच्या अटीवर सत्तांतराची संधी केली.

पण आता जे झाले ते होऊन गेले. उरले आहे ते पराक्रम करून उद्या पुरते करुन घेऊ. परंतु जे साधले आहे ते यशही इतके उदंड आहे की गेल्या एक सहस्त्र वर्षांत, आज आपण मिळविलेल्या ह्या यशाला आपल्या इतिहासात तोड सापडणार नाही. ब्रिटिशांसारख्या शत्रूच्या हातून आज निदान तीन चतुर्थांश हिंदुस्थान तरी आपण स्वतंत्र केला आहे.

## वीर युवक शशिमोहन डे

एकनापी सुपुत्रेण सिंही स्वपिति निर्भयम्।

असा आठवडा जात नाही, असा दिवस जात नाही की, बंगालमध्ये कुठे ना कुठे तरी हिंदू कुमारिकांस आणि हिंदू कुमारांस कोणा ना कोणा तरी मुसलमान गुंडांनी राक्षसी अत्याचार करून पळवून नेले नाही!

परंतु त्या हिंदू कुमारिका ज्या समाजातून पळवून नेल्या जातात, तो हिंदू समाज स्वस्थपणे म्हणत आहे, मला काय त्याचे! बंगालमधील हिंदू कुमारिकांवर अत्याचार होत आहे -महाराष्ट्रात तर नाही ना? मग मला काय त्याचे?

बंगालमधील ज्या गावी प्रथम कोणा हिंदू अबलेस रात्री बेरात्री छापा मारून अशा कोणी अधमांनी भ्रष्ट केली, त्या गावचे शेजारच्या गावी ती बातमी जाताच तेथील प्रत्येकजण म्हणत असे, त्या गावी ना? आग लागेना त्या गावात, मला काय त्याचे! जेव्हा ती आग त्या दुसऱ्या गावीही लागली आणि त्यात हिंदू राष्ट्राची होळी पेटली तेव्हा तिसरा गाव म्हणाला, त्या दोन गावांची होळी झाली ना? असेल. मला काय त्याचे! माझ्या घरातील मुलेबाळे सुखरूप आहेत!

इतक्यात त्या तिसऱ्या गावीही क्रूर आणि राक्षसी धर्मवेड त्याच्याच घरच्या मुलाबाळांच्या तोंडात बोळे कोंबून त्याचे समक्ष त्यांस भ्रष्टविते झाले, तरी त्याच्या शेजारच्या हिंदू घराने म्हटले, आपले दार लावून घ्या! ते शेजारचे हिंदू घर जाणे आणि त्यांचा हिंदुधर्म जाणे! मला काय त्याचे!

अशा रीतीने या षंढ तंत्रातील सूत्रापायी, या मला काय त्याचे पायी, बंगालमध्ये हजारो हिंदूंच्या वस्तीत एकेक दोन दोन मुसलमानी गुंड घुसून वाटेल तो अनन्वित अत्याचार करीत आले. आग, जाळपोळ, अत्याचार -धर हिंदू की कर मुसलमान, असा धडाका चालला; असे हजार वर्षे चालले! एका गेल्या साठ वर्षापूर्वी हिंदू शेकडा ५५ ते आता शेकडा ३० इतके असून मुसलमान शेकडा ७० पर्यंत वाढले! याचे एक मुख्य कारण म्हणजे हेच होते की, खालच्या जातीच्या शेकडो हिंदू स्त्रिया मुसलमान सरसहा भ्रष्टवीत गेले, तरी वरच्या जातीचे हिंदू असल्या गुंडगिरीच्या प्रकरणात लक्ष

घालणे म्हणजे आपल्या सभ्यपणास लांछन होय, असे समजून म्हणत बसले की, मला काय त्याचे! पण आपल्या स्वधर्माच्या त्या खालच्या जातीतील स्त्रियांचा आपल्या भगिनींचा -अपमान उघड्या डोळ्यांनी पाहण्याच्या या घोर पापाचे शासन निघृण काळाने अंती त्या निलर्ज्ज सभ्यपणासही देण्यास सोडले नाही! आपल्या हिंदू शेजाऱ्यांच्या पत्नीस परधर्मीय असुर छळत असता, दारे लावून बसणाऱ्या मला काय त्याचे -वाल्या सभ्य गृहस्थाच्या पत्नीवरच आज प्रसंग कोसळत आहे. त्या पळवून नेऊ दिलेल्या असभ्य स्त्रियांच्या पोटी झालेल्या संततीने सारखी वाढत गेलेली मुसलमानांची संख्या शेवटी सभ्यांच्याही शिरावर नाचू लागली! इतक्यात एक वीर युवक बंगाल्यात जन्मास आला. त्याचे नाव शशिमोहन डे. तो सिल्हटचा निवासी. तो वयाने अजून पुरता अठरा वर्षांचा देखील नाही! पण अठराशे वर्षांत हिंदू जाती जे शिकू शकली नाही, ते तो या अठरा वर्षांत शिकला! जो तो हिंदू मला काय त्याचे म्हणत होता. गेल्या तीन वर्षात प्रत्येक दिवशी कोणा ना कोणा तरी हिंदू कुमारिकेवर, हिंदू अबलेवर, कोणी तरी अधम मुसलमान बलात्कार करीत आला आहे. पण मेल्या आईचे दूध प्यालेले निलर्ज्ज सभ्यपण अजूनही म्हणत होते की, मला काय त्याचे! ते अहिंसावादी होते; त्यांना स्वराज्य मिळवायचे होते! त्यांच्या आया बहिणी मुसलमान नेत तेव्हा ते म्हणत, आम्ही स्वराज्य मिळवीत आहोत! आम्हाला काय त्याचे! अशा स्थितीत हिंदू कन्यकांवर हात टाकावयास सवकलेला सिल्हट जिल्ह्यातील एक मुसलमान जमीनदार फैयाजअल्ली हा आजूबाजूच्या कित्येक गावात एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्यासारखा जो हिंदू दिसेल त्याला चावत चालला. हिंदू कन्यकांना त्या गुंडाचे भीतीने एकटे दुकटे मार्गातून फिरण्याची चोरी झाली! जो जो तो या पापकर्मात पटाईत होऊ लागला तो तो मुसलमानातील पाजी लोकांत तो गाजी म्हणून मान्यता पावू लागला! कारण, हिंदू कन्यकांस बलात्काराने भ्रष्टविणे म्हणजे एक शतकृत्य करणे होय, मुसलमान जाती वाढविणे होय, मक्केची एक यात्रा करण्याचे पुण्य जोडणे होय, अशी काही मुसलमानांची राक्षसी वृत्ती झालेली आहे. हे केवळ गेल्या दोन तीन वर्षांतील न्यायालयातून चाललेल्या अनेक खटल्यांवरूनही सिद्ध होण्यासारखे आहे! असा तो पाजी गाजी फैयाजअल्ली चंदेरचंद्र, राधाचक्र इत्यादी गावी अनेक हिंदू कन्यांना भ्रष्टवीत आणि पळवून नेत असता त्यास नेहमीप्रमाणे बहुतेक हिंदू मला काय त्याचे! म्हणून म्हणणारेच मिळाले. पण एक दिवस मात्र त्याला एक हिंदू वीर युवक असा भेटला की, ज्याने या मुसलमान गुंडास हटकले! त्या वीर युवकाने त्या गुंडाच्या दुष्कृत्यास ऐकून मनात म्हटले, थांब दुष्टा! जी जी हिंदू स्त्री या बंगाल्यात आहे, या हिंदुस्थानात आहे ती ती माझी धर्माची बहिण आहे! तिचा अपमान तो माझ्या बहिणीचाच अपमान! त्या वीर

युवकाने मला काय त्याचे म्हणून पाठ फिरविली नाही; तर तोंडास तोंड देऊन म्हटले, मला काय त्याचे? नाही! तर मला त्याचे सर्व काही आहेच आहे!

हिंदूंच्या कोणत्याही स्त्रीचा अपमान तो माझ्या बहिणीचाच अपमान असून त्याचे शुभाशुभ मला आहेच आहे! हिंदूंचे कोणीही अपत्य कुठेही जन्मले, तरी मला सुवेर आहेच आहे; कारण त्याने माझे कुटुंब वृद्धी पावते! कोणीही हिंदू स्त्री किंवा पुरुष हिंदुत्वास कुठेही मुकला -मेला की, मला त्याचे सुतक आहेच आहे; कारण त्यायोगे माझ्या रक्ताचा माझा एक भाऊ मला अंतरतो! जेथे कोठे कोणा हिंदूचा छळ होत असेल तेथे तेथे तो माझाच छळ होत आहे. मला त्याचे दुःख होणार! मी त्याचा प्रतिशोध- सूड घेणार!

अशा प्रवृत्तीचे काहूर ज्याच्या चित्तात माजले आहे, अशा तो वीर युवक, तो अठरा वर्षांचा तरुण, एक दिवस मार्गाने चालला असता, एका सामान्यशा हिंदूचे घरात त्याने आरडाओरड ऐकली. तो किंचित वळला, तो कोणा दीन अबलेचे करुणाकंदन कोणा नरपिशाच्चाच्या भेसूर भेवडावण्यात मिसळलेले त्याला ऐकू आले. तो घरात डोकावला. तो त्या आजुबाजूच्या गावात कुलीन हिंदुबंधुंना भ्रष्टवीत माजलेला तो राक्षस, जमीनदार फैयाजअल्ली, एका विवाहित हिंदू कुलवधूस फरफर ओढीत हाणीत तिच्यावर बलात्कार करू पाहात असताना त्याला दिसला! ते घर शशिमोहनच्या ओळखीचे नव्हते. ती मुलगी शशिमोहनची बहिण वा भावजय वा पुतणी -कोणीही लागत नव्हती. पण ती हिंदूची मुलगी होती. आणि शशिमोहनही हिंदूच होता. म्हणूनच ते घर त्याचे होते. ती हिंदू मुलगी त्याला त्याच्या सख्ख्या बहिणीप्रमाणे -भावजयीप्रमाणेच जवळची होती. ती दीन अबला हिंदू होती. आणि तो तिचे सतीत्व आणि हिंदुत्व बलात्काराने भ्रष्टवू पाहाणारा नरपशु एक अहिंदु होता. -एक मुसलमान होता! वीज तळपावी तशा शशिमोहन अकस्मात आत घुसला. त्याला पाहाताच गाय हंबरावी तशी ती हिंदू कन्यका साह्यार्थ दीन रवाने हंबरली, फैयाजअल्ली गुरकावून त्या तरुणाचे अंगावर आला. मला काय त्याचे! म्हणणाऱ्या हिंदुतीलच हा एक हिंदू म्हणून फैयाज गुरकावला आणि म्हणाला, तुला काय त्याचे? शशिमोहन कृतीनं म्हणाला, जे बहिणीचे भावाला, हिंदुंचे हिंदुला -ते तिचे मला! नराधमा, सोड तिला! फैयाज सोडिना. वीज कडकडून पडावी तसा कडकडून तो वीर युवक त्या उन्मत्त फैयाजअल्लीचे अंगावर कोसळला आणि क्षणार्धात त्याने शस्त्र उपसून त्या फैयाजास छाटून काढले! शशिमोहनने त्या मुसलमानी गुंडास ठिकच्या ठिकाणी ठार केले!

शशिमोहन असा विचार केला नाही की, या कोण्या यत्किंचित हिंदू स्त्रीसाठी मी माझा अठरा वर्षांचा कोवळा लुसलुशीत प्राण का देऊन टाकू? मला फाशी होईल. माझी आई रडेल. संसाराच्या सुखाने षड्रसयुक्त पान माझ्यापुढे तारुण्याने आत्ताच वाढून ठेवले आहे, मी त्या पानावरुन तसाच कसा उठू! असा काहीही शहाणा षंढपणा मनास शिवू न देता एका हिंदू कन्यकेस एक मुसलमान बलात्काराने भ्रष्टावीत आहे हे पाहाताच पूर्वी देवांनी राहूस छाटले तसे शशिमोहनने फैयाजला छाटून टाकले! ती कन्यका ग्रहणातून सुटलेल्या चंद्रकलेसारखी म्लान स्मिताने त्या वीर युवकाचे आभार मानती झाली.

मला काय त्याचे हा षंढ तंत्रातील मूलमंत्र एका हिंदूने पायाखाली तुडविला. हे पहिले महान आश्चर्य पाहून आजूबाजूच्या मुसलमानांस भयंकर वचक बसला. मुसलमानी गुंडगिरी शेपूट घालून घरादारात लपू लागली. परंतु ह्या घटनेतील दुसरे महान आश्चर्य ते पुढेच होते. कारण शशिमोहनला पोलिसांनी धरले तेव्हा तो फाशी जाणार हे बहुतेक गृहितच होते. नागरिकांच्या जीवितांचे आणि धर्माचे जे संरक्षण आपण करू शकत नाही ते इतराने केलेले पोलिसांस आणि सरकारास सहसा खपत नसते. त्यायोगे त्यांची अकर्मण्यता अधिकच उघडी पडते. त्यातही एका हिंदुने शस्त्र उपसून दुसऱ्या हिंदूंचे रक्षणार्थ धावून यावे ही वृत्ती तर त्यांस बहुधा अगदीच वावडी असते. कारण एकदा का ही वीरवृत्ती हिंदूच्या अंगी बाणली तर मग ह्या हिंदुस्थानात जे तेथे आहेत ते तेथेच कसे राहू शकतील? म्हणून आजपर्यंतच्या परकीय सत्तेच्या धोरणाप्रमाणे त्या हिंदुयुवकास भयंकर शिक्षा होणार हे उघड होते. त्याप्रमाणे पहिल्या न्यायालयात ती झालीही. मृत्यूसारख्या कठोर शिक्षेलाही न भिता शशिमोहनने सांगितले की, माझ्या हिंदू धर्माच्या बहिणीला राक्षसी बलात्काराचे हातून सोडविणे हे माझे, एका हिंदूचे, कर्तव्यच होते. जेव्हा इतर कोणतेही साधन वा साहाय्य हातात उरले नाही तेव्हा शस्त्र उपसून त्या दुष्टास ठार करण्याचा धार्मिक अधिकार तर मला होताच होता, पण नैर्बंधिक कायदेशीर अधिकारही मला होता! शशिमोहनच्या ह्याच विधानाचे आधारावर हायकोर्टात अपील झाले आणि केवढे आश्चर्य की, हिंदूस पाण्यात पाहाणाऱ्या आणि मुसलमानांस चिथावणाऱ्या या दिवसांतही शशिमोहनला हायकोर्टाने निर्दोषी म्हणून सोडून दिले!

इतकेच नव्हे तर एका अबलेवर एक दुष्ट राक्षस क्रूर बलात्कार करीत असता, इतर पुरुष तिच्या साह्यार्थ धावून जाण्यास भीत असता आणि पोलिसांचे साह्य घेण्याची संधी उरली नसता शशिमोहनने ज्या साहसाने आणि चपळाईने त्या अधम

फैयाजअल्लीस ठार मारून त्या अबलेची सुटका केली, त्या साहसाचे आणि शौर्याचे नैर्बंधिक दृष्ट्याही हायकोर्टाने उलट अभिनंदन केले!! कारण भारतीय दंडविधानाच्या इंडियन पीनल कोडच्या ९६ ते १०० पर्यंतच्या कलमांत हे स्पष्टपणे सांगितले आहे की, निर्बंधाच्या कायद्याच्या दृष्टीनेही प्रत्येक नागरिकास आपल्या स्वतःच्या किंवा दुसऱ्या नागरिकाच्या नैर्बंधिक अधिकाराचे आणि देहाचे संरक्षण करण्याचा पूर्ण अधिकार आहे. त्यात दिलेले अपवाद मात्र प्रत्येक नागरिकाने विचारपूर्वक टाळावे. नीतिदृष्टीने तर ते कर्तव्यच आहे. शशिमोहनला त्या अबलेच्या देहावर होणाऱ्या दुष्ट आणि अधम बलात्कारापासून तिची सुटका करण्याचाही अधिकार होता आणि त्या नैर्बंधिक कायदेशीर आणि धार्मिक अधिकाराचा उपयोग करू जाताच फैयाजअल्लीशी जुपलेल्या झुंजीत त्याचा स्वतःचा प्राणही संकटात पडल्याने स्वसंरक्षणाचा दुसरा अधिकारही निर्बंध दृष्ट्या प्राप्त झाला होता. निर्बधाच्या कक्षेत उभे राहून त्याने फैयाजशी झुंज घेतली आणि अपरिहार्य आवश्यकता म्हणून हायकोर्टाने त्यास सन्मानासहित सोडून दिले.

वास्तविक पाहाता शशिमोहनने निर्बंधाच्या घटपटादी खटपटीचा विचार तेथे मुळीच केला नव्हता. निर्बंधाची आशा किंवा सवलत म्हणून नव्हे तर निसर्गप्रवृत्ती म्हणून त्याने त्या दुष्टास छाटून टाकिले. एका अनाथ कन्यकेस गाईसारखी फरफरा ओढीत आणि हाणित तिच्यावर एक अहिंदू बलात्कार करीत आहे हे पाहताच त्याचे हिंदू रक्त उसळले आणि प्रवृत्तीसरशी तो वीर तिच्या साह्यार्थ धावून गेला. ही त्याची अंतःकरणप्रवृत्तीच त्याला प्रमाण होती. तो फाशी गेला असता तरी त्याने केले ते चांगलेच केले असे तो म्हणाला असता. ते नैतिक कर्तव्यच होते. हायकोर्टाने अशा सत्प्रवृत्तीचे समर्थन करून नैतिक कर्तव्यास नैर्बंधिक अधिकाराचाही दुजोरा दिला. याविषयी कलकत्ता हायकोर्टाचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. एका युवकाचे प्राण वाचवून हायकोर्टाने आमच्या हिंदू जातीवर खरोखर उपकार केले आहेत. हे वीर युवक शशिमोहन, प्रत्येक हिंदू तुला आशिर्वाद देत आहे की, देव तुला दीर्घायुषी करो! तुझ्यासारखे वीर युवक ह्या आमच्या हतभाग्य हिंदू जातीत एकामागून एक उपजोत! तुझ्या आयुष्यातील प्रौढ कालाचा मध्यान्ह आणि अस्त या तारुण्यातील उदयासारखाच तेज आणि पराक्रम यांनी समन्वित असो! नागरिकांची नैर्बंधिक (कायदेशीर) कर्तव्य बजावण्याचे धैर्य आणि साहस आणि उदारता प्रत्येक हिंदु तरुणाचे हृदयात उसळू लागो! असे त्रस्त हिंदूच्या हाकेसरशी धावून जाणारे हिंदू वीर आपल्या समाजात निपजू लागोत आणि त्या जुन्या मला काय त्याचेचे मढे जाळून राख केले जावो! हिंदुसभा असेल तिथे तिथे शशिमोहनवर सार्वजनिक अभिनंदनाच्या

तारांच्या आणि प्रेमळ आशिर्वादाचा नुसता पाऊस पाडला पाहिजे. कारण हिंदू अबलांच्या पावित्र्याच्या पदरास हात घालण्यास चटकलेल्या मुसलमानी गुंडपणाचे शिरावर ह्या शशिमोहनने पहिला मारक घाव घातला. आता पुन्हा तो गुंडपणा पूर्वाल्इितक्या पिसाळ पिशाच्चपणाने थैमान घालण्यास असा सहजासहजी धजणार नाही.

श्रद्धानंद १४ मे १९२७

* * *

## देशवीर शचीन्द्रनाथ संन्याल

### तुम्हांस स्वार्थाचा लवलेशही शिवला नव्हता. तुम्ही जे जे केलेत ते ते स्वदेशासाठीच केलेत.- न्यायाधीश.

आज उणीपुरी दोन वर्षे होऊन गेली. उत्तर हिंदुस्थानात लखनौ नगरामध्ये काकोरीच्या राजकीय कटाचा खटला चाललेला आहे. वर्षोनुवर्षे त्या खटल्यातील अभियुक्तास कारागारातील कच्च्या बंदीत डांबून ठेवून रेंगाळत रेंगाळत शेवटी त्याचा निवाडाही झाला. त्या निवाड्यावर औधच्या हायकोर्टात अभियुक्तांच्या वतीने नि सरकारच्या वतीने अपील करण्यात आले असता काही आरोपीस सेशन्स कोर्टात दिलेल्या शिक्षांपेक्षाही भयंकर नि अमानुष शिक्षा देण्यात आल्या आहेत. पकडल्यानंतर राजकीय कटाचे आरोप असलेल्या बहुतेक बंदीवानांस प्रथमतः कच्च्या बंदीतच वर्ष वर्ष सडत पडावे लागते. पुढे ज्या दहा दहा, वीस वीस वर्षांच्या भयंकर शिक्षा भोगाव्या लागतात त्या पुन्हा निराळ्याच. जरी एखाद्या दुसरा राजकीय बंदीवान सुटला, तरी या कच्च्या बंदीतच त्याला इतके दिवस रखडावे लागते आणि हाल सोसावे लागतात की, इतक्या दिवसांत एखाद्या चोरास दीड दोन वर्षांची आपली सगळी शिक्षा भरून सुटता येते. एखाद्या चोरासारख्या अपराध्यास जी शिक्षा म्हणून भरावी लागते, ती एखाद्या निरपराध नागरिकास, राजकीय कटाचा नुसता संशय त्याचेवर पडला म्हणून, भरावी लागते. त्यामुळे पुढे तो निर्दोषी म्हणून सुटला तरी त्यास या अन्य प्रकारे हा भुर्दंड विनाकारण सोसावा लागलेलाच असतो. अशा रितीने सरकारच ज्याला पुढे निरपराध म्हणून ठरविते. त्याला दीड दोन वर्षाची शिक्षा सरकारच भोगावयास लावते. राजकीय कटाचे नाव काढताच त्याच्या वाऱ्यासही न उभ्या राहिलेल्या जनतेसही त्या विषयाचा दरारा वाटावा या उद्देशाने ही रीत कुटाळ राजनीतीने पाडली असली, तथापि ती निंदनीय आहे इतके स्पष्टपणे सांगून ठेवण्यास तरी कशाचीही हरकत नाही. हे कटांचे खटले असे रखडत जे ठेवावे लागतात. ते बहुधा निष्कारण नि सहेतुक ढिलेपणानेच असतात अशी शंका येण्यास प्रत्येक कटाचे खटल्यात अनेक प्रसंग आढळून आलेले आहेत.

तथापि काकोरीच्या खटल्यात इतर कटांचे खटल्यांप्रमाणे आरोपींपासून कथने आणि माहिती बलात्काराने काढण्यासाठी धाकदपटशाचा किंवा त्याहूनही निर्दय प्रकारचा

सैतानी जाच झाला असल्याचा बोभाट आरोपींच्या वतीनेही फारसा ऐकू येत नाही ही गोष्ट विशेष आहे. महाराष्ट्रात, बंगालात आणि पंजाबात आजवर जे मोठमोठे कटाचे खटले झाले, त्यातील बहुतेकात आरोपीतील बहुतेक प्रामाणिक आणि सुशिक्षित गृहस्थांनी अशा प्रकारचे आरोप सरकारी अधिकाऱ्यांवर उघड उघड न्यायालयात केले होते. काकोरीच्या खटल्यात तसे आरोप सरकारच्या पोलीस अधिकाऱ्यांवर झालेले आमच्या वाचनात आलेले नाहीत. ही आम्ही वाचलेल्या माहितीवरून आढळून आलेली गोष्ट जर खरी असेल तर ती पोलीस अधिकाऱ्यांस भूषणावह आहे यात शंका नाही.

परंतु त्या खटल्यात जे आरोपी गवसले होते त्यांनी मात्र ती गोष्ट अशीच घडून येईल अशी आशा तिळमात्र ठेवलेली नव्हती. ज्या वेळेस आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यार्थ इतर मार्ग सुचेनासे झाल्यामुळे त्यांनी, आपले शिर आपले हातावर घेऊन सशस्त्र क्रांतीच्या भयंकर दिव्यात प्रवेश केला, तेव्हाच त्या साहसी आणि शूर लोकांनी ही खूणगाठ बांधून ठेविली होती की, या मार्गात पुढे-मागे आपणास न्यायाच्या आणि अन्यायाच्या अशा उभयविध जाचास आणि छळास, देहदंडास आणि मृत्युदंडास तोंड द्यावेच लागणार! प्रथम प्रथम जेव्हा क्रांतिकारकांचे खटले सुरू झाले, तेव्हा अशा खटल्यात पोलिसांचा नैर्बंधिक आणि प्रसंगी अनैर्बंधिक छळही कसा सोसावा लागतो, याची त्यांच्यातील काही लोकांस कल्पना नव्हती आणि म्हणून ते क्रांतीसारख्या कार्यात फसले असे म्हणता येत असे. परंतु काकोरीच्या कटाच्या खटल्यात तसा प्रकार झालेला दिसत नाही. त्यांतील प्रमुख आरोपींत संन्याल बंधू आहेत. या बंधूंपैकी ज्येष्ठ बंधू श्री. शचीन्द्रनाथ संन्याल हे तर यापूर्वीच क्रांतिकारक खटल्याचे भीषण भोग भोगून दंडितही झालेले होते. त्यांस त्या वेळी आजन्म काळेपाण्याची शिक्षा दिली गेली. ते अंदमानात पाच वर्षे कुजत पडले होते आणि तेथील अनेक यातनांस जेव्हा बाणेदारपणाने तोंड देत होते, तेव्हा त्यास कल्पनाही नव्हती की, त्यास त्यांची प्रिय मातृभूमी पुन्हा कधी याच जन्मी दिसेल! पण योगायोगाने ती त्यांस पाचव्यास वर्षी पुन्हा दिसली. त्यांच्या जन्मठेपीच्या शिक्षेची सूट मिळून ते पाचव्याच वर्षी १९२०-२१ चे संधीस सुटले. त्यांच्याचप्रमाणे त्या खटल्यातील इतर अनेक जणांनी पूर्वीच क्रांतीच्या मार्गात पाऊल टाकले म्हणजे पाऊलच नव्हे पण हृदयही कसे रक्तबंबाळ होते हे अनुभवलेले होते. पोलिसांचे छळ, मारहाण, जाच, उपास, अपमान, कारावास आणि मृत्युदंड यांचे भयंकर अनुभव त्यांस अंशतः आलेले होते आणि ज्यांस ते पूर्णतः आलेले होते, त्यांचे तोंडून आणि लेखांतून त्यांनी अनेकदा ऐकिले आणि वाचले होते. तरीदेखील ज्याअर्थी काकोरीच्या

या आरोपींनी पुन्हा क्रांतिकारक कट केले, शस्त्रे जमविली, दहा-पंधरावर मोठमोठे राजकीय दरवडे घालून सरकारास हलवून सोडले आणि शेवटी शेवटी चालत्या आगगाड्यांस थोपवून पिस्तुले आणि बंदुका झाडीत सरकारी कोष (खजिने) साफ लुटून नेले- का तर सशस्त्र क्रांतीवाचून आपल्या प्रिय मातृभूमीस स्वतंत्र करण्याचा दुसरा कोणताही उपाय त्यांस शक्य दिसेना. निःशस्त्र असहयोग, निःशस्त्र सहयोग, निःशस्त्र प्रतिसहयोग, सगळे तेथे हात टेकताना त्यांनी पाहिले. तेव्हा या सगळ्या उपायांना सापेक्षतः अधिक स्वस्त आणि सफल म्हणून त्यांस जो वाटे, त्या क्रांतीचा नगारा त्यांनी पुन्हा पिटला.

सगळे शहाणे ज्या उपायास अगदी अशक्य आणि अत्यंत महाग म्हणून समजतात तोच या माथेफिरूस सापेक्षतः शक्यतर आणि सफलतर उपाय वाटला. सगळ्या शहाण्यांस जे खादी मंडळ, विधिमंडळ, गोरक्षण, अस्पृश्योद्वार, शिशुसप्ताह, उपोषणे, हरताळ इत्यादी सभ्य उपाय स्वातंत्र्यसंपादनाच्या कार्यी सुलभतर आणि सफलतर वाटले, तेच या माथेफिरूस सुलभ होते. निष्फळ आणि सुलभ नव्हते ते क्रांतिपेक्षा जितके महाग तितकेच व्यर्थ वाटले! भिन्नमतिर्हीं लोकः!

असा त्यांचा विश्वास असल्याने या क्रांतिकारक गृहस्थांनी- कारण त्यांच्यात केवळ मुलेच भरलेली नाहीत, शौर्यांच्या आणि ध्येयनिष्ठेच्या कामात मोठ्यांसही मान खाली घालावयास लावणारी (विशीच्या) आत बाहेरील मुलेही त्यात जशी आहेत, तसेच मुलांसारखा सरलपणा नि नव तारुण्याचा अदम्य उत्साह आणि धडाडी ज्यांत भरलेली आहे, अशी तिशीच्या वरची मोठी माणसेही त्यात आहेत- त्या ह्या गृहस्थांनी शहाण्यांस त्यांच्या शहाणपणाचे मार्ग मोकळे ठेवून, जे इतरास करवत होते तितके देशहित ते करीत असता त्यांचे हात न धरिता, जे कोणीही करू शकत नव्हते ते उरलेले कार्य आपण स्वतः करण्याची प्रतिज्ञा केली आणि त्याप्रमाणे तो मार्ग किती भयंकर असतो हे स्वतःचे अनुभवाने आणि कटांचे भूतकलीन खटल्याचे माहितीने ज्ञात असताही जाणून बुजून त्या रक्तरंजित क्रांतीच्या ध्वजास त्यांनी उभारिले. माथेफिरूच ते!

अशा आगलावेपणाचे फळही त्यास शीघ्रच मिळाले. काकोरीच्या आसपास चालत्या आगगाडीस रोखून, गाडी हाकणारास पिस्तुले दाखवून, बद्ध करून त्यांनी गाडीवर सशस्त्र आक्रमण केले होते. सर्व प्रवाशांस प्रथम कळविले की, आम्ही सरकारी खजिना तेवढा लुटणार आहोत, आम्ही क्रांतिकारक तुमच्याच हितासाठी झटत

आहोत, तुम्ही निर्भय असा! पण असे सांगूनही साहजिकच जे एक-दोन प्रवासी आरडाओरड करू लागले, त्यास त्यांनी तत्काळ गोळ्या घातल्या. नंतर सरकारी खजिना फोडून तो सर्व वाहून नेला! गाडी पुढे गेली. हे मागून गेले. या अपराधासाठी धरपकड होता होता तो सर्व राजकीय कट उघडकीस आला आणि एकाचे सूत्राने दुसरा, दुसऱ्याने तिसरा असे करीत ते बरेच क्रांतिकारक पकडले गेले.

पण पकडल्यानंतरही फुटला कट! व्यर्थ मेलो! म्हणून त्यांच्यातील बहुतेक जण रडत बसेनात! राजकीय कट म्हटला की, तो सद्यःपरिस्थितीतील स्वपक्षाच्या असंघटित आणि हताश स्थितीत आणि विपक्षाच्या संघटित प्राबल्यात फुटणारच! फुटत फुटतच ते घटत जाणार असा उलटा युक्तिवाद करीत ते निर्ढावलेले आणि पूर्वीही अशाच कटाचे, फुटण्याचे, खटल्यांचे आणि शिक्षांचे प्रसंग अनुभवून बसलेले क्रांतिकारक उलट खो खो हसत बसले!

त्यांची पोलिस-चौकशी जवळजवळ वर्षभर चालली; पण त्या वर्षाच्या कारावासाने त्यांचे धैर्य खचले नाही. पुढे खटला सुरू झाला. त्या क्रांतिकारकांस न्यायालयात नेणारी जी बंदिशाळेतील गाडी असे ती सशस्त्र शिपायांचे पहाऱ्यात न्यायालयात प्रत्यही जाऊ येऊ लागली. हाती हातकड्या, पायबेड्या आणि दोर यांनी जखडलेले हे क्रांतिकारक प्रत्यही त्या गाडीतून जातायेता मोठमोठ्याने क्रांतिकारक गीते म्हणत जात. त्यांच्यात काही कवी आणि काही चांगले गाणारे होते ते सांगत आणि सर्वजण ती राष्ट्रगीते गात. ती इतकी हृदय हलवून सोडणारी असत की आजूबाजूस शेकडो लोकांचे थवे ती गीते एकण्यासाठी त्या मार्गावर प्रत्यही तिष्ठत बसत. त्यांचे ते तेज, ती देशभक्ती ती निर्मिकता पाहून प्रत्यक्ष पोलिसांच्या डोळ्यांस पाणी येई! उभा मार्ग गर्जवीत जाणारी ती त्या देशभक्त वीरांकडून म्हटली जाणारी रणगीते हिंदीतील आणि उर्दूतील बहुतेक दैनिकांतून छापली गेली आहेत.

पुष्कळ शहाण्यांना आशा होती की, क्रांतीसारखा अव्यापारेशु व्यापार करण्याचे भयंकर परिणाम जेव्हा या उन्मत्त देशवेड्यांस भोगावे लागतील, तेव्हा त्यांचे डळे उघडतील आणि बंदीच्या पिंजऱ्यात, बेड्यांत जखडलेल्या हातात आपले अवनत माथे धरून दूरदृष्टीच्या शहाणपणास शोभणारे असे पश्चातप्त निष्क्रियतेचे उसासे टाकतील. पण तसे काही एक झालेले नाही. त्यांच्यात शहाण्या माणसास शोभणारा हा माथेफिरूपणा दिसून येईना. ते शहाण्या निष्क्रियतेच्या गुंगीत माथे धरून

रडगीताचे उसासे टाकीत बसण्याचे ठिकाणी रणगीते गात उफळत, उसळत होते. माथेफिरूच ते! काही केल्या माथेफिरू शहाणपणा त्यास देईना!

शेवटी त्यास शिक्षा झाली. त्यातील बहुतेकांस माहीत होते की, शिक्षा होणार आणि तीही अशी की, नुसती वर्तमानपत्रांतून दुसऱ्यास मिळालेली वाचताच माथेफिरू शहाणपणास दरदरून घाम सुटावा! पण त्या माथेफिरूस तिचे तितकेसे काही वाटेना. त्यांनी त्या दिवशी कारागारातून निघताना एक सण पाळला. प्रार्थना केल्या. सर्वांनी स्वदेशी वेष परिधान केले आणि कपाळी लाल गंधाचे टिळे लावले. न्यायालयात त्यांची वाट पाहात मोठमोठ्या लोकांची आणि अधिकाऱ्यांची दाटी झाली होती. ते न्यायालयाचे बाहेर गाडीतून उतरताच वंदे मातरम्चा तुमुल ध्वनी करू लागले. नंतर शिस्तीने आपल्या पुढाऱ्याच्या मागोमाग एक उत्तेजक राष्ट्रगीत सर्व मिळून उंच स्वराने गात त्यांनी न्यायालयात प्रवेश केला.

आता बलिदानाची पर्वणी आलेली आहे. आमच्या मनात काय आहे ते सगळे आताच काय सांगावे! शत्रो, थांब. वेळ येऊ दे म्हणजे सगळे गुप्त प्रकट होईल. हे मातृभूमी, आम्ही तुझ्यावरून जीव ओवाळून टाकू. आम्ही बघून घेऊ शत्रूचे बळ बळ ते काय आहे. आता नुसती बकबक नाही- तर आता बलिदानाशी गाठ आहे.

अभियुक्त न्यायालयात आल्यावर न्यायाधिशाने निर्णय दिला. या खटल्यात एकंदर अकराशे कागदी पुरावे परीक्षावे लागले. शेकडो साक्षीदारांच्या साक्षी झाल्या होत्या. न्यायाधीशाने आपल्या निर्णयपत्रिकेत सांगितले की, संयुक्त प्रांतात एक विस्तृत षड्यंत्र स्थापित झालेले असून, त्याचा उद्देश सशस्त्र क्रांती करून हिंदुस्थानात हिंदुस्थानचे स्वातंत्र्य संपादन करावे हा आहे. याचे पूर्व संस्थापक शचीन्द्रनाथ संन्याल हे होते आणि या षड्यंत्राचा बंगालच्या क्रांतिकारकांशी निकट संबंध होता. हे एकमेकांस राजकीय वधासाठी आणि दरवड्यांसाठी शस्त्रे पुरवीत, या षड्यंत्रातील मंडळींनी सरकारी अधिकाऱ्यांवर सशस्त्र आक्रमणे केली, खजिने लुटले, बॉम्ब इत्यादी स्फोटक साहित्य जमविले आणि अनेक भयंकर दरवडे मारले. निर्णयातील उतारे वाचून न्यायाधिशाने शिक्षा सांगितल्या- राजेंद्रनाथ लाहिरी, रामप्रसादजी आणि रौशनसिंग या त्रिवर्गास फाशी, शचींद्रनाथ संन्यालांना आजन्म काळेपाणी, मन्मथनाथ गुप्त यांना चौदा वर्षे, खत्री, खन्ना इत्यादींना दहा वर्षे आणि इतरांस सात आणि पाच वर्षे शिक्षा सांगितली गेली. शिक्षा सांगितल्यानंतर न्यायाधिश म्हणाला- ज्या मार्गाने तुम्ही स्वातंत्र्य संपादक करू इच्छित होते तो मार्ग चुकला

होता. पण दंडितहो, तुमची ती चुकी प्रामाणिकपणाची होती. तुमच्या तत्वानुरुप तुम्ही प्रामाणिकपणे झुंजत राहिलात. मी हे स्पष्टपणे निर्दिष्ट करितो की, त्या सर्व खटाटोपात स्वार्थाचा लवलेश तुम्हांस शिवला नव्हता. तुम्ही जे जे केलेत ते ते सर्व स्वदेशासाठीच केलेत.

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या क्रूर शिक्षा देत असतानाच न्यायाधिशाच्या तोंडातूनही जेव्हा ह उद्गार बाहेर पडले, तेव्हा सर्व श्रोत्यांस, एकाएकी गहिवर आल्यासारखे झाले. जे पोलिस त्या देशवीरांवर पहारा देत होते, त्यांचीही मुद्रा ती भयंकर नि क्रूर शिक्षा ऐकताच बदललेली दिसू लागली. मतवाला पत्र म्हणते, स्वदेशावरून प्राण ओवाळून टाकणाऱ्या त्या वीरात्म्यांची काही तरी सेवा घडावी म्हणून त्यांच्या शक्तीत होत्या तेवढ्या अनेक थंड पाण्यासारख्या लहानसहान वस्तू पुढे करून पोलिसांनी त्यांची कृतज्ञता बुद्धी व्यक्त केली!

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या आणि दहादहा वर्षाच्या कठोर कारावासाच्या शिक्षा जशजशा सांगितल्या जात, तसतसे ते सर्व दंडित क्रांतिकारक सस्मित वदनाने त्या शिक्षांचे स्वागत करीत होते. शिक्षा सांगून झाल्या तरी हातावर माथा धरून चिंताक्रांत बसणारा शहाणपणा त्यांच्यात उदय पावलेला दिसेना! त्यांचा कट फुटला म्हणून ते रडत बसले नाहीत. त्यांच्यातील काही साथीदार सरकारचे साक्षीदार होऊन त्यांचा विश्वासघात करिते झाले होते. पण म्हणून ते हतवीर्य झाले नव्हते. कारण त्यांना जगाच्या आणि प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या भूतकालीन क्रांतिकारक प्रयत्नांवरून माहीत झाले होते की, ज्याला क्रांतीच्या मार्गात पाऊल टाकणे, त्याने प्रथम आपले शिर आपल्या हातात घ्यावे; मग मनास म्हणावे, मना, ध्यानात ठेव की, या परतंत्र आणि दलित देशातल्या तीस कोटींपैकी एकोणतीस कोटी विश्वासघातक निघणार, तुला शाप देणार, तुला शिव्या देणार, तुझा शिरच्छेद स्वतःचे हातांनीच करणारे असणार, तरीही तुला पुढे गेले पाहिजे. सगळे जग काय वाटेल ते करो, तू एकटा तर तुझ्या देशाकरिता झुंजत मरण्यास सिद्ध आहेस ना? पुरे? क्रांतीची सामग्री तुझ्यापुरती तुझ्यापाशी जुळली तर मग! चल, एकोणतीस कोटी सरकारी साक्षीदार होतील हे गृहीत धरून चल. त्या उरलेल्या एक कोटीत कोणी तरी तुझ्याबरोबर राहाणारा किंवा तू गेल्यानंतर तुझ्या मागून येणारा मिळेल. तोही न मिळाला तरी तू चल! माथेफिरूपणापेक्षाही माथेफिरुपणाच एखादी भूकंपीय उलाढाल आता करील तर करील!

या माथेफिरुपणाच्या विचारपरंपरेने उत्स्फूर्त झालेल्या त्या क्रांतिकारकांस भयंकर शिक्षा ऐकून अधिकच अन्माद चढल्यासारखा दिसू लागला. श्री. मालवीयांचे अभ्युदयासारखे प्रमुख पत्र म्हणते- खटल्याच्या निकालाच्या वेळचे दृश्य खरोखर अपूर्व होते. शिक्षा ऐकल्यानंतर ते क्रांतिकारक जेव्हा जावयास निघाले, तेव्हा त्यांनी प्रथम एकमेकांच्या गळ्यात मिठ्या मारल्या आणि डोळ्यांतून गळत असलेल्या प्रेमाश्रूंत त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला. त्या वेळेस न्यायालयात उपस्थित असलेले लोकही रडू लागले. श्री. रामप्रसादजी, राजेंद्रनाथ लाहिरी, श्री. रौशनसिंग-ज्या त्रिवर्गांना फाशीची शिक्षा झाली होती आणि श्री. संन्याल यांना जन्मठेप झाली होती, त्या चौघांच्या चरणांस इतर सर्व दंडितांनी भक्तिपूर्वक स्पर्श केला. श्रीयुत रामप्रसाद यांचे धुरीणत्वाखाली ते सर्व वन्दे मातरम् ची तुमुल गर्जना करून एक हृदयस्पर्शी गीत म्हणत न्यायालयातून जाऊ लागले.

जिच्या प्रेमासाठी आम्ही प्राणही ओवाळून टाकीत आहो, त्या भारतभूमीचा वायू आता आम्हांस कुठला श्वासोच्छवासास मिळणार! चिंता नाही! हे स्वदेशा, तुझे कल्याण होवो- आम्ही आता निघालो. हे मातृभूमी, तू सुखी राहा म्हणजे झाले- आम्ही तर आता चाललो!!!

हे वाचक, हे गाणे गात जे फाशीच्या खांबाकडे जात आहेत ते देशभक्त सर्व हिंदू आहेत. साधनांच्या विषयी त्यांच्याशी आम्ही सर्वसंमत नसलो तरीही हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे की, त्यांच्यात हे तेज आणि हे धैर्य हे हिंदूंची गीता वाचूनच उत्पन्न झाले. त्यांच्या उपस्थितीत तरी हिंदू दुर्बल आहे, हिंदू भ्याड आहे, असे म्हणण्याची कोणाची माय व्याली आहे!

मुसलमान बंधूंनो, असले निधड्या छातीचे हिंदू लोक ज्या हिंदू समाजात निपजतात, त्या समाजास भ्याड समजून त्यांच्यावर गुंडगिरीने कुरघोडी करू पाहण्याची जी भयंकर चूक तुम्ही करीत आहात, ती अजून तरी सुधारा. स्वदेशासाठी आज वीस वर्षे फाशीच्या दोरावर सारखा झोका घेत खेळत असलेल्या या हिंदू क्रांतिकारकांस स्वधर्मासाठीही, तुम्ही जसे चार दोन हत्या करिता आहा- दहा-पाच देवळे फोडता आहा- पाच-पंचवीस हिंदू अबलांना पळविता आहा- तसे पराक्रम काय करिता आले नसते? चालत्या आगगाड्या रोखून धरून ज्यांनी सरकारी खजिने लुटले आणि गव्हर्नराचे दाढीस हात घालून ती हिंसकली, त्यांना मुसलमानांच्या चार बायका पळविण्याचा किंवा लपून छपून एखाद्या मौलवीचे डोक्यात लाठी घालण्याचा पराक्रम

करिता आला नसता असे का तुम्हांस वाटते? त्यांनी कोणी अजून तसे केले नाही, ते त्यांस शक्ती नव्हती म्हणून नव्हे, तर इच्छा नव्हती म्हणून, बलात्काराने धर्म वाढतो, स्त्रियांवर पशूसारखे अत्याचार करणे हे धर्मवीरत्वाचे एक लक्षण असते ही पिशाच्ची शिकवण त्यांस मिळालेली नव्हती. मुसलमान आपले देशबंधू- आज नाही उद्या शुद्धीवर येतील ही आशा त्यास होती, म्हणून आजवर त्यांनी तुमचे भयंकर अपराधही पोटात घातले. श्रद्धानंदांची हत्याही त्यांनी डोळ्याआड केली हे पक्के ध्यानात ठेवा आणि आता यापुढे तरी हिंदुंतील क्षात्रतेजाचा अंत पाहू नका. तुम्ही एकपट गुंडगिरी केलीत पण यावरही जर तुम्ही शुद्धीवर येणार नाही, तर धर्माचे नावानेही हिंदू दसपट गुंडगिरी करण्यास सोडणार नाहीत असा रंग दिसत आहे. म्हणून मुसलमान हो, या काकोरीच्या क्रांतिकारकांचे नाव ऐकून तरी सावध व्हा आणि आपसातील यादवी बंद करा.

आणि इंग्रजहो, तुम्हीही या दृश्याकडे जरा गंभीरपणे पाहा. आमची आमच्या पुढाऱ्यांस विनंती आहे की, त्यांनी, जेव्हा आता रॉयल कमिशन इकडे येईल तेव्हा त्यांच्यापुढे निर्भयपणे या क्रांतिकारक माथेफिरूचा इतिहास वाचून दाखवावा. आज वीस-पंचवीस वर्षे सरकारने आपल्या भात्यातील सर्व शस्त्रास्त्रे या क्रांतिकारकांवर सोडून पाहिली आहेत. साधी बंदी, सश्रम बंदी, काळेपाणी, फाशी, मारहाण, जाच, आत्मिक पीडन, दैहिक पीडन, विशिष्ट दंडक, सैनिक दंडक, बंदुका, बेयोनेट, विमान-बॉम्ब, सरसहा कत्तली- सर्व प्रकारची आयुधे सरकारने या माथेफिरू वर योजून पाहिली. पण या मूठभर लोकांच्या संप्रदायाची वीण भुयाराभुयारांतून वाढतच आहे- हे या काकोरीच्या अगदी आजच्या क्रांतिकारकांच्या उदात्त उग्रतेस साक्षी ठेवून सांगा. सांगा की, या अमर्त्य क्रांतिकारकांसही मारण्याचा मार्ग आहे आणि आश्चर्याची गोष्ट की, तो अगदी सोपा आहे. तो म्हणजे हाच की, जे हिंदुस्थानचे स्वातंत्र्य शेवटी केव्हा तरी द्यावे लागणारच आहे ते तुमच्या आमच्यातील लाखो लोकांचे रक्त सांडण्याच्या आधीच सुखासमाधानाने देऊन टाकून या चिरडीस आलेल्या प्रकरणाचे पर्यवसान आनंदात करा. अजूनही जर इंग्रज राष्ट्राने मोकळ्या मनाने हे धोरण स्वीकारून वैध प्रगती (Constitutional) शक्य करण्यासारखी परिणामकारक राज्यघटना सुरू केली, तर तिच्या किंचित दिरंगाईच्या कार्यपद्धतीसही स्वीकारणे हे, हे क्रांतिकारक राजनितीदृष्ट्या आपले कर्तव्य समजतील. इतकेच नव्हे तर, जर ती राज्यघटना देताच इंग्लंड निष्कपपट रीतीने भारताशी समानतेचे

सहकार्य करू लागले तर तेही इंग्लंडशी तितक्याच निष्कपटपणे उभयतांच्या कल्याणास अनुरुप असे सहकार्यही करू लागतील.

श्रद्धानंद: १ सप्टेंबर १९२७

## क्रांतीच्या ठिणग्या

काकोरीच्या क्रांतिकारकांस सेशन्स कोर्टात ज्या शिक्षा झाल्या त्या कमी वाटून हायकोर्टाने त्या अधिकच भयंकर प्रमाणात वाढविल्या आहेत. दहा वर्षे, चौदा वर्षे अशा शिक्षा जन्मठेपीपर्यंत वाढविल्या! अपिलात शिक्षा कमी होतील म्हणून अपिले झाली. पण क्रांतीच्या काकोरीच्या कटाच्या ठिणगीने दाढी पेटलेल्या हायकोर्टी क्रोधास, त्या क्रांतिकारकांपैकी तिघाचौघांस फाशी झाली असताही, तेवढा बळी पुरेसा न वाटून, त्याने त्या कटातील मंडळींच्या आधीच भयंकर असलेल्या शिक्षा अधिकच भयंकर प्रमाणात वाढविल्या!

ज्यांस पाच वर्षे सश्रम कारावास होता त्यांस तो दहा वर्षे दिला; ज्यांस दहा वर्षे द्वीपान्तर होते त्यास जन्मठेपी दिल्या! तरीही एवढ्यावरून न्यायाधीशास दयेचा किंवा सौम्यतेचा लवलेशही शिवला नाही असे अनुमान मात्र कोणीही करू नये. कारण इतरांच्या जरी त्यांनी अत्यंत कठोरपणे शिक्षा वाढविल्या, तरी काहींच्या शिक्षा त्यांनी सदयपणे वाढविण्याचे साफ नाकारिले. उदाहरणार्थ, सेशन्स कोर्टात ज्यांस फाशीच्या शिक्षा झाल्या त्यांनीही अपील केले होते. पण हायकोर्टाने सदय अंतःकरणाने, इतर कटवाल्यांच्या शिक्षा दुपटीने वाढविल्या असताही, फाशी दिलेल्या शिक्षेवर ही जी अपिले झाली त्यांच्या शिक्षा मुळीच वाढविल्या नाहीत. त्यांना सेशन्सकोर्टाने दिलेली फाशीच काय ती पुरे, असे एकमताने उदारपणे घोषित केले. या औदार्याविषयी न्यायमूर्तींचे आभार क्रांतिकारक कटवाले मानितीलच. हो! जशा इतर शिक्षा दुपटीने वाढवून पुढील जन्माची फाशीही देऊन टाकण्याचे हायकोर्टाने मनात आणिले असते, तर त्याचा कोण हात धरणार होता!

एका क्रांतिकारक कटास अशा अत्यंत कठोर शिक्षा दिल्या की बाकीचे क्रांतिकारक भिऊन त्या नादात पडणार नाहीत अशी जर हायकोर्टाची किंवा त्यांच्यावर उभ्या असणाऱ्या सरकारची समजूत असेल तर ती मात्र सफल होण्याचा तितकासा रंग सध्या दिसत नाही. कारण, ही काकोरीच्या कटाची ठिणगी, त्यांच्यातील फाशी

जाणाऱ्या तीन-चार क्रांतिकारकांच्या उष्णोष्ण रक्ताच्या शिरा तुटताच उसळून पडणाऱ्या लालभडक सड्यात विझते न विझते तोच बंगाल्यात आणखी एक भयंकर कट उघडकीस येण्याच्या मार्गास लागला आहे. एका घरास वेढा घालून पोलिसांनी कित्येक बॉम्ब, बंदुका, पिस्तुले आणि क्रांतिकारक वाङ्मय धरिले आहे. त्या घरातील घरधनी त्याचा भाऊ, त्याची दोन कर्ती मुले निरनिराळ्या ठिकाणी पकडली गेली असून झडत्यांचा गावभर नुसता धुमाकूळ चालला आहे. आतल्या आत धुमसणाऱ्या क्रांतीची ही आणखी एक ठिणगी वर उडून, सत्तेच्या क्रोधाची दाढी पुनः पेटवीत आहे. काकोरीच्या कटवाल्यांची आज दीड वर्षावर जी दुर्दशा आणि हाल चालले आहेत आणि हायकोर्टातल्या अपिलाचा वर जो भयंकर निकाल दिला आहे; त्यामुळे क्रांतिकारकांचे मरणामारणाचे उग्र उद्योग बंद पडलेले दिसत नाहीत किंवा त्या उग्र उद्योगास पोसण्यास आणि त्यास लागणारी शस्त्रास्त्रादी साधनसामुग्री जुळविण्यास लागणार लाखो रुपयांचा आर्थिक निधी जमविण्यासाठी घालण्यात येणारे राजकीय दरवडे ही उतरत्या पंथास लागण्याचे काहीही चिन्ह दिसत नाही. दर आठवड्यास बहुधा राजकीय दरवडे पडतातच आहेत. क्रांती मारण्यासाठी म्हणून बंगाल्यात अनेक पुढारी लोकांस मध्यंतरी दृष्टीबद्ध, स्थलबद्ध, काराबद्ध करून ठेवले; पुनः सुभाषबाबूंसुद्धा त्यांच्यातील अनेकास सोडून देण्यात आले. पण क्रांतिकारक चळवळ आतल्या आत घुमसतच आहे.

क्रांतीच्या ठिणग्या उडताच त्यावर क्रांतिकारकांस फाशीवर चढवून त्यांच्या उष्णोष्ण रक्ताचा सडा घालण्याचा उपाय असा निष्फळ होत आहे. त्या क्रांतीच्या फाशीवरून उसळणाऱ्या रक्ताच्या सड्यांनी त्या ठिणग्या विझत नाहीत तर आगीवर ओतलेल्या रॉकेलप्रमाणे उलटा भडकाच घेतात! पंचवीस वर्षे हा क्रांतीचे रक्त शिंपडून क्रांतीच्या ठिणग्या विझविण्याचा उपाय सरकारने करून पाहिला आहे. पण तो काही पुरतेपणी सफल होतोसे दिसत नाही. तेव्हा अजून तरी सरकारने क्रांती विझविण्याचा सरळ आणि सफळ असा उपाय- जो इतिहासाच्या वैद्यशास्त्राने आणि जगाच्या अनुभवाने अगदी रामबाण म्हणून ठरविलेला आहे, तो योजून पाहावा. क्रांतिकारक जी क्रांती करू म्हणतात ती आपण होऊनच करून टाकावी आणि हिंदुस्थानास स्वातंत्र्य देऊन टाकून या क्रांतिकारक वृक्षाच्या मुळावरच कुऱ्हाड घालावी!

पण हा उपाय सरकार करणार काय? क्रांती मरणार काय? इतिहासाची पुनरावृत्ती झाल्यावाचून राहाणार काय? काय? या दैवदुर्विलासास करावे काय?

बरे, या ठिणग्या नुसत्या हिंदुस्थानाच्या आतल्या आत उडत असल्या तरी सरकारास इतके घाबरण्याचे कारण नव्हते. पण आगामी महायुद्धात सरकारास अडवून धरण्यासाठी या क्रांतिकारकांनी उभ्या जगात जेथे जेथे इंग्रजांचा शत्रू दिसेल तेथे तेथे त्याच्याशी संगनमत करण्याचा अतिदुष्ट प्रयत्न चालविला आहे. चीनमध्येच पाहा. चीनचे राष्ट्रीय सरकार इंग्रजांच्या विरुद्ध आहे. चीनमध्ये जे तुमुल स्वातंत्र्ययुद्ध चालले आहे, ते दडपून टाकण्यासाठी इंग्रजांनी हजारो सैनिक आणि मोठमोठ्या रणनौका तिकडे धाडल्या आहेत. उलटपक्षी रशियाने चीनच्या राष्ट्रीय पक्षाची कड घेतली असून चीनमध्ये सबळ सत्ता स्थापून मग चीनकडून हिंदुस्थानमध्ये राज्यक्रांती करण्याचा रशियाचा डाव आहे. अशी संधी साधून चीनमध्ये असणाऱ्या हिंदुस्थानी क्रांतिकारकांनी चीनची आणि रशियाची बाजू उचलून धरण्याची सारखी खटपट चालू ठेविली आहे. हिंदुस्थानातून काही हिंदी सेना इंग्रजांनी चीनला चीनविरुद्ध लढण्यास धाडिली. पण ही गोष्ट भारतीय क्रांतिकारकांस पटली नाही. चीनमध्ये हिंदी सैन्याने जाऊन चीनच्या विरुद्ध लढू नये असे प्रत्येक देशभक्त भारतीय पुढाऱ्याचे मत होतेच. विधिमंडळात हिंदी सभासदांनी या सरकारी धोरणाचा शक्य तेवढा विरोधही केला. चीन बौद्ध राष्ट्र आहे; ते आमच्या हिंदूंचे धर्मबांधव आहेत. त्यातही ते त्यांच्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी चाललेल्या पवित्र युद्धात लढत आहेत. त्यातही जर चीन स्वतंत्र झाले, प्रबळ झाले तर त्याचा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या आकांक्षांस पाठिंबा मिळण्याचा अधिक संभव आहे. अशा स्थितीत इंग्रजांच्या आपल्या पायातील बेड्या तोडून टाकण्याइतकेही पौरुष अंगी नसणाऱ्या हिंदी सेनेने केवळ इंग्रजांकडून दिल्या जाणाऱ्या चार कवड्यांच्या वेतनासाठी चीनच्या नरडीचा घोट घेऊन त्याच्या पायातही इंग्रजी वर्चस्वाच्या बेड्या ठोकण्यास साहाय्य व्हावे, ही अत्यंत नीचपणाची वर्तणूक कोणाही भारतीय मनुष्यास लाजिरवाणी वाटणारी होतीच. तेव्हा वरिष्ठ विधिमंडळाने हिंदी सैन्य चीनकडे लढण्यास धाडू नये,म्हणून सरकारास बजावून सांगितले; पण ते न ऐकता इंग्रजांनी चीनला हिंदी सैन्य धाडलेच! विधिमंडळाच्या हातात शाब्दिक निषेध करण्यापलिकडे काहीच सत्ता नसल्याने ते बिचारे हतबल होऊन चूप राहिले!

पण हिंदी क्रांतिकारकांचे बळ नुसते शब्दातच साठविलेले नसते. विधिमंडळाचे शाब्दिक बळ जेथे जेथे संपते, तेथूनच त्यांचे उग्र उपाय सुरू होतात. चीनला हिंदी

सेना विधिमंडळास न जुमानता इंग्रजांनी नेताच चिनात असलेल्या हिंदी क्रांतिकारकांच्या गुप्त संस्थांनी, गुप्त आणि प्रकट उपायांनी त्या सेनेतील शीखादिक सैनिकांच्या गाठी घेऊन त्यांस सांगितले की, अरे, स्वतःच्या मातृभूमीस पारतंत्र्यातून सोडविण्याचे तुमचे कर्तव्य! ते तर तुम्हांस करवत नाही! तेथे तुमच्या या मिशा आणि दाढ्या आणि तरवारी शेळीच्या शेपटासारख्या मेंग्या होतात! पण तेवढे पाप तुम्हांस नरकास धाडण्यास पुरेसे नाही, म्हणून का तुम्ही आता या चीनलाही दास्यात ढकलण्यास इकडे आला आहात? आपल्या मायभूस दास्यातून सोडविण्यास न धजणाऱ्या या तुमच्या मेंग्या मिशा आणि तरवारी चीनला दास्यात ढकलण्यास तेवढ्या अशा कशा फुरफुरू लागल्या? देशबांधवहो, स्वदेश दास्यातून सोडविता येत नसेल तर, आता निदान तुकड्यासाठी इंग्रजांची कुत्री बनून या चीनादिक आपल्या शेजाऱ्यांस तरी इंग्रजांच्या दास्यात ढकलण्याचे महापाप करू नका! असा उपदेश क्रांतिकारकांनी त्या हिंदी सैनिकांत सारखा सुरू केल्यामुळे त्यांची मने लवकरच बिथरली. चीनविरुद्ध लढण्यास त्यास भाग पाडणे धोक्याचे आहे, असे इंग्रजी अधिकाऱ्यांच्या ध्यानात आले. शांघायहून हॉगकाँग आणि हाँगकाँगहून शांघाय, अशा सैनिकांच्या थारेपालटी आणि वारेपालटीही झाल्या. इतक्यात त्या सैन्यात बंडाच्या ज्वाला पेटण्याचा संभवही दिसू लागला काही मोठमोठ्या हिंदी सैनिक अधिकाऱ्यांस इंग्रजाविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून पकडून सैनिक खटले (कोर्टमार्शल) करण्यात आले. जूनच्या १८ तारखेस तार आली की शांघायमधील इंग्रजी सरकारचा मुख्य पोलीस अधिकारी यास राज्यक्रांतिकारकांपैकी हरबंतसिंग नावाच्या एका निधड्या लढवय्याने गोळी घालून ठार केले! आणखीही राज्यक्रांतीचे प्रयत्न आणि कट उघडकीस येतच गेले. क्यांटन, शांघाय, हाँगकाँग इत्यादी प्रमुख नगरांतून हिंदी राज्यक्रांतिकारकांची गुप्त संस्थांची जाळी पसरलेली असून त्यांचे सर्व धोरण चीनी राष्ट्रीय पक्षास साह्य देऊन इंग्रजांचे नाक खाली करण्याचे आहे. आशा ही की, चीनमधून इंग्रज उठला की त्या चीनच्या राष्ट्रीय सरकारच्या पाठिंब्याने आणि रशियाच्या संगनमताने इंग्रजांशी त्या दोन राष्ट्रांची लढाई जुंपताच ब्रह्मदेशाच्या सरसीमेवरून बंड करून हिंदुस्थानवर स्वारी करावयाची आणि राज्यक्रांतीच्या झेंडा हिंदभूमीवर पाय ठेवताच उभारावयाचा!

पण चीनमधील हिंदी राज्यक्रांतिकारकांचा डाव इंग्रजांच्या लक्षात आल्यावाचून थोडाच राहाणार होता! त्या डावाचे मर्म विधिमंडळातील, खादीमंडळातील, तुम्हा आम्हा इंग्रजी चाबकाखाली माणसाळलेल्या मंदांच्या लक्षात येणार नाही. आपणास

तो एक केवळ पोरखेळ वाटेल; माथेफिरूपणाची एक लहर वाटेल. पण इंग्रजांस त्या डावातील अर्थ तेव्हाच कळला. इंग्रज विधिमंडळ, खादी मंडळ इत्यादी सभ्य संस्थांच्या माणसाळलेल्या निरुपद्रवी डावाकडे कौतुकाने पाहात बसतात. त्यास वेळी अवेळी वाहवा! भले! म्हणून त्यातील निरुपद्रवीपणाच्या प्रमाणात अधिकाधिक भलाई पण देतात; पण क्रांतिकारकांच्या डावाचे नाव काढताच कसे अगदी तत्काळ पिसाळून, दिसेल त्यास चावू लागतात हे सर्वश्रुतच आहे. इकडे इतर चळवळींच्या म्होरक्यांची, अैंशी हजार लोकांची सभा भरून कडकातील कडक भाषा बोलत बसली तरी गव्हर्नर स्वस्थ झोप घेत असतात. पण एखादे अठरा वर्षांचे पोर जरी एखादा क्रांतिकारक शब्द बोलले तरी एकदम राजाच्या विरुद्ध लढाई म्हणून रणशिंगे फुंकली जातात. अठरा वर्षांच्या क्रांतिकारकांच्या माथेफिरू पोरांची, अैंशी हजार माथेधरू पोरांहून इंग्रजास भीती वाटते! कारण इंग्रज सगळ्यांच्या बारशास जेवलेला. त्याला माथेधरू सभ्यपणा आणि माथेफिरू उनाडपणा यातील फरक तेव्हाच कळतो! त्यातही या चीनमधील क्रांतिकारक माथेफिरूंच्या उनाडपणाला रशियन अस्वलाची नखे फुटलेली आणि चीनच्या नागाचा विषारी दात आलेला! इतर भुसाच्या आगीच्या ठिणग्या कितीक उडून गेल्या आणि विझल्या! पण ही ठिणगी क्रांतिकारक आगीची! वेळीच लक्ष दिले नाही तर जसा ग्यारिबाल्डी दक्षिण अमेरिकेतून सज्ज झालेली सेना घेऊन, इटलीत उतरला, तसे हिंदी क्रांतिकारक रशियन शिक्षकांचे हाताखाली सैनिक, वैमानिक आणि सामुद्रिक शिक्षण घेऊन, रशियाची आणि इंग्रजांची लढाई जुंपताच, ब्रह्मदेशाचे सरसीमेवर उतरून हिंदुस्थानात क्रांतीची आग भडकवीत युद्ध पुकारणार नाहीत म्हणून कशावरून? मेलेल्या दुधावर वाढलेल्या आमच्या माथेधरू शहाणपणाच्या राजकारणास जरी हा केवळ पोरकट भ्रम वाटला तरी वाघिणीच्या जिवंत दुधावर वाढलेल्या चाणाक्ष इंग्रजांस ती एक भयंकर शक्यता वाटली, हे साहजिकच होते. ब्रम्हदेशावर चीन, रशिया आणि हिंदी क्रांतिकारक हे स्वारी करण्याची सिद्धता करीत आहेत, ही गोष्ट इंग्रजी राजनीतीचे सूक्ष्म दृष्टीस दिसताच त्यांचे पटाईत बुद्धिमत्तेस तिचे महत्व तत्काळ समजून आले आणि त्यांनी हिंदुस्थानचे वायव्य सरसीमेवर ज्याप्रमाणे युद्धाची सज्जता आजवर ठेवण्यास ते झटत असत, त्याचप्रमाणे आता हिंदुस्थानचे पूर्व सरसीमेवरही लढाईची सज्जता ठेवण्यास इंग्लंड तत्काळ झटू लागले.

आजपर्यंत सरसीमा (सरहद्द), आणि सरसीमेवरची युद्धाची सिद्धता म्हटली म्हणजे वायव्य सरसीमा काय ती हिंदी लोकांच्या दृष्टीसमोर उभी राही. रशिया पूर्वी

तिकडूनच येणार होता. अफगाणिस्थानही तिकडूनच स्वारी करण्याच्या उद्योगात असतो. रानटी जातीही हिंदू लोकांच्या नाशास तत्पर होऊन लुटमार करीत तिकडूनच धावे छापे मारितात. म्हणून आजवर हिंदुस्थानला त्या वायव्य सरसीमेची काय ती चिंता असे. हिदुस्थानची पूर्व सरसीमा अगदी निरुपद्रवी आणि पूर्वी सभ्य असल्याने आणि नंतर दुर्बळ झाल्याने, दुसऱ्या आणि त्यातही त्याची देवभूमी असलेल्या हिंदुस्थानावर स्वारी करण्याचे ज्यांच्या मनातही आले नाही अशा तिबेट आणि चीन या राष्ट्रांनी व्यापलेली असल्याने शतकोशतके हिंदुस्थानास पूर्व सीमेवर युद्धाची सज्जता म्हणजे काय याची कल्पनाही उरली नव्हती. पण शेवटी आज वायव्य सरसीमेप्रमाणेच पूर्वसीमेवरही युद्धाची सज्जता ठेवण्याचा प्रसंग सरकारवर गुजरला आहे. कारण, अफगाणिस्थानास पुढे करून रशिया जसा वायव्य सीमेवर स्वारी करू पाहात आहे, तसाच चीनदेशास पुढे करून रशिया पूर्वसीमेवर स्वारी करू पहात आहे. आणि त्या दोन्ही बाजूंनी या महायुद्धाचे सुंदोपसुंदीत आपलाही लग्गा लागला तर पाहावा म्हणून हिंदी क्रांतिकारक फार दूरवर परिणाम करणारा राजकारणी डाव टाकून आणि इंग्रजांच्या शत्रूंशी संगनमत करून हिंदुस्थानावर क्रांतिकारक सेनेची चढाई करू पाहात आहेत.

यासाठी, त्यास तोंड देता यावे म्हणून दूरदर्शी इंग्रजांनी आजपासूनच ब्रह्मदेशाच्या सरसीमेवर मोठी प्रबळ सज्जता चालविली आहे. त्या सीमेवर किल्ले बांधण्याचे काम वेगाने चालले असून मोठमोठे सैनिक-मार्ग सिद्ध करण्यात येत आहेत. त्यावर सुटलेल्या बंदीवानांच्या टोळ्याच्या टोळ्या धाडण्यात येऊन त्यांच्याकडून कार्य करून घेण्यात येत आहे. त्याप्रीत्यर्थ धनसंग्रहही सुरू असून त्या सीमेवर चाललेल्या या भावी महायुद्धाच्या पूर्वसिद्धतेविषयी कोणतीही बातमी किंवा सैन्याच्या हालचाहीची गुणगुण प्रसिद्ध करण्याची कडक बंदी करण्यात आली आहे.

अफगाणिस्थानकडच्या जेवढ्या स्वाऱ्या -शिकंदराच्या स्वारीपासून तो परवाच्या जिहादी गुंडांपर्यंत- झाल्या त्या हिंदुस्थानास दास्यात दडपून ठेवण्यासाठी होत्या. पण ब्रम्हदेशाकडून होऊ पाहणाऱ्या या पूर्वसीमेवरील ही स्वारी झालीच तर हिंदुस्थान जिंकण्याकरिता होणारी नसून केवळ इंग्रजांस हिंदुस्थानातून हाकून त्याची शक्ती कमी करण्यासाठीच होणारी आहे. इंग्रजांच्या साम्राज्याचे तुकडे उडविण्यासाठी, त्या साम्राज्याचे जे प्रत्यक्ष हृदय असे हिंदुस्थान, त्यावरच आघात करिता यावा, इंग्रजांना

हिंदुस्थानातच पेचात धरिता यावे, एवढ्यापुरताच त्यांचा स्वारीचा बेत आहे. त्यांचे आणि त्यांचेसह सहकार्य करीत असलेल्या हिंदी क्रांतिकारकांचे असे धोरण आहे की, हिंदुस्थानच्या पूर्व सीमेकडून इंग्रजांस टाच दिली असता त्यांची शक्ती विभागेल आणि आतून हिंदी लोक क्रांती करून उठतील! काय वेडे धोरण हे! विधिमंडळे, खादी-मंडळे, शिवोत्सव, शुद्धी, स्वदेशी इत्यादी अत्यंत उपयुक्त आणि सुखासीन उपायांनी बैठी प्रगती करण्याचे सोडून या क्रांतिकारकांच्या कानठाळ्या बसविणाऱ्या पोरखेळांच्या घोडदौडी प्रगतीत शिरून दातबीत फोडून घेण्याचे संकट स्वतःवर ओढून घ्यावयास आम्हा सभ्य गृहस्थांस वेड थोडेच लागले आहे!!

परंतु आम्हांस नसले तरी ब्रह्मदेशातील काही लोकांवर मात्र या वेडाची थोडीशी छाया पडत असल्याचे दिसते. कारण, त्यांच्यातील बऱ्याच लोकांनी केव्हापासूनच अशी हाकाटी करण्यास सुरुवात केली आहे की, जर कधी ब्रह्मदेशाच्या सरसीमेवर चीन आणि इंग्रज यांचे युद्ध जुंपले तर आपण इंग्रजांस धनाची वा जनाची यकिंचितही सहायता देणार नाही. कोण ही बंडगिरी! सरकार महात्मा गांधीस का तिकडे धाडीत नाही? ते गेले तर सत्य, अहिंसा नाही तर निदान वनस्पत्याहार अशा कोणत्या तरी गालभरू मुर्दाड तत्वाच्या नावाखाली तेव्हाच ब्रह्मी लोकांस समाजावतील की, इंग्रजांशी अशा युद्धाचे वेळी निरपेक्ष, बिनअट, बिनबोभाट, मागतील तो सहकार करणे आणि साह्य देणे हेच खऱ्या असहकारितेचे लक्षण आहे. मागे जर्मन लोकांस मारण्यासाठी महात्माजींनी सैनिक जमविले तसे आता रशिया विरुद्ध सैनिकभरती करणे आणि रशियन चिन्यांची हिंसा करणे हीच खरी अहिंसा आहे. आणि अशा रीतीने इंग्रज आपला अमित्र आहे म्हणूनच त्यास त्याचेवरील संकटात पेचात न धरिता त्यास साह्य करण्यासाठी आपला मित्र चीन त्याचे डोके उडविणे हीच खरी देशभक्ती आणि स्वराज्यप्राप्तीचा सरळ मार्ग आहे!

श्रद्धानंद: २२ सप्टेंबर १९२७

* * *

## वीरमाता क्षीरोदवासिनी

**स्वातंत्र्याच्या सुखनीमाजी जन्म स्वतंत्रांचे**

**गुलामगिरीच्या उकिरड्यावरी गुलाम निपजाचे !!**

**-सिंहगडचा पोवाडा**

मागे श्रद्धानंदमध्ये काकोरीचे क्रांतिकारक या लेखात श्री. शचीन्द्रनाथ संन्याल यांचा उल्लेख केलेला होता आणि त्यांचे छायाचित्रही देण्यात आले होते. त्या प्रखर देशभक्त वीरात्म्यास काकोरीच्या क्रांतिकारकांच्या कटात आजन्म काळ्या पाण्याची भयंकर शिक्षा मिळालेली आहे. त्याच शचीन्द्रनाथ संन्याल यांच्या वृद्ध मातेचे नाव श्रीमती क्षीरोदवासिनी देवी हे होते.

ती वृद्ध वीरमाता, तिचे पुत्र देशस्वातंत्र्यासाठी कारागारात जन्मठेपीच्या भयंकर शिक्षाच्या बेड्या ठोकून बंद झालेले असता, घरी एकटी त्यांच्या स्मरणाने विव्हळ होई, परंतु त्यांस स्वदेशसेवेच्या भीषण दिव्यात यश येवो म्हणून सरत्या श्वासानेही आशिर्वाद देत एप्रिल १९२८ मध्ये मृत्यु पावली.

तिला एकंदर चार मुले होती. वडील मुलगा साधारण वयात येतो न येतो तोच तिचा भ्रतार वारला आणि त्या चिल्यापिल्यांच्या भरण-पोषणाचा भार श्रीमती क्षीरोदवासिनी देवी यांजवर पडला. ते कुटुंब मूळचे बंगाली. पण फार दिवसांपासून काशीसच त्यांचा निवास होता. त्यांचे वडील वारल्यामुळे उघडी पडलेली ही चारी मुले आपल्या ममतेच्या पंखाखाली झाकून ही दुःखी आई अशा आशेने कालक्रमण करू लागली की, लवकरच माझा वडील मुलगा वयात येईल संसाराचा भार सांभाळील आणि माझ्या वार्धक्याचे दिवस कौटुंबिक आनंदात घालवून माझ्या कष्टाचे पारणे फेडील.

पण तिचा तो वडील मुलगा जसजसा वयात येऊ लागला तसतसा ज्या मातेने त्यास सांभाळले, तिच्याहून दुसरीच एक मूर्ती त्याला आकर्षण करू लागली. तो तिला आईची आई, मातेची माता म्हणून संबोधून आपल्या आईला विसरत चालला! आपल्या आईच्या खांद्यावर पडलेला संसाराचा भार सांभाळण्याचे सोडून तो त्या

परम मातेच्या संसारासच आपला संसार मानून तिच्या दुःखासाठी तो झुरू लागला, तिच्या मोचनासाठी झुंजू लागला. त्याच्या त्या दुःखी आईच्या घरी तिची नुसती भेट घेण्यासही त्यास सवड मिळेनाशी झाली. कारण, रात्रंदिवस तो त्या त्याचे मनास आकर्षणकरून हरून नेणाऱ्या दिव्यमूर्तीच्या मंदिरात हे भारतमाते! हे जननी! हे जन्मभूमी! अशा ध्यास धरीत पडलेला असे. आईला जननी म्हणण्याचे विसरून स्वजातीलाच हे जनक-जननी-जननी! म्हणून आई म्हणू लागला!

१९०५ ते १९११ च्या क्रांतिकारकांच्या आगखाऊ चळवळीचे ते दिवस होते. त्यांच्या उग्र व्रताच्या उग्रतेसच तरुण अंतःकरणे मोहून जात होती. आईबाप, बायकामुले, घरदार यांची दृश्ये त्या दिव्य ध्येयाची आणि त्या उग्रसाधनांची दैवी दारू जो एकदा पिई तो तरुण धुंद होऊन त्याच्या दृष्टीस दिसेनाशी होत. त्याच्या दृष्टीस एकच दृश्य दिसे. भारतमाता, ती जनक-जननी-जननी दास्याच्या शृंखलात जखडलेली आहे आणि तिच्या तीस कोटी संतानातील जात्यायेत्यास हटकावीत आहे. प्रथम पुढे होऊन या माझ्या विमोचनार्थ पेटलेल्या महान अग्निकुंडात उडी घालून बलिदानाच्या नवसांची संख्या पुरी करण्यास कोणी प्रथम पुढे येतो आहे काय?

या मनोवृत्तीने उत्स्फूर्त झालेला तरुण, शहाणपणाच्या किंवा मूर्खपणाच्या सर्व उपदेशाच्या टप्प्याबाहेर गेलेला असे. प्रकृती विकृतीसारखी आणि विकृती त्यास प्रकृतीसारखी वाटे. घरचा संसार बुडवून दारचा संसार तो थाटू पाही. जीवन मरण वाटून त्यास मरणात मजा वाटे. काशीयात्रेहून त्यास फाशीयात्रा अधिक पुण्यप्रद वाटे. सर्व जिवंत शहाण्यांचा उपदेश त्याला एकू येईनासा होई आणि मेलेल्या आत्म्याचे वाचाहीन वक्तृत्वाचे त्यास अक्षर एकू येई.

किशोर शचीन्द्रनाथ संन्याल त्याच वक्तृत्वास भाळला आणि त्याच आगगिळू पंथाचा अनुयायी झाला. काशीला त्याने क्रांतीच्या जीवघेऊ जीवदेऊ शपथा घेतल्या. क्रांतिकारकांच्या कटास मिळून तो बॉम्बची विद्या शिकला. शस्त्रे संचवू लागला, महायुद्धाचे धामधुमीत आपले शिर आपले हातात घेऊन सर्व हिंदुस्थानभर बंड करून क्रातिकारकांच्या भयंकर योजनांत तो भाग घेऊ लागला आणि तो सैनिकांच्या शिबिरांत घुसून, नाना रुपे पालटून, पलटणीस फितवू लागला. त्याच्या घरावर पोलिस पहारे बसले. दिल्लीच्या गव्हर्नर जनरलवर बॉम्ब फेकून सत्तेच्या

सामर्थ्याच्या हत्तीच्या अंबारीत व्हाईसरायास घायाळ करण्याचे अमानुष कृत्य करणाऱ्या क्रांतिकारकांच्या भीषण साहसाने आणि त्या प्रकरणी अनेक लोक फासावर चढविले असताही त्या दृश्याने ज्या संन्यालचे मन चंचल न होता अधिकच रणोन्मत्त होऊन उठले त्याला लाहोरात, फिरोजपूरला, कोमागाटामारूच्या झुंजीत, बालासोडच्या लढाईत झालेल्या क्रांतिकारकांच्या आणि इंग्रजांच्या भयंकर चकमकीत क्रांतिकारकांचे शेकडो तरुण रणात लढून मेले असता, फाशीवर लटकाविले जात असता, अंदमानात शेकड्यांनी मोजून कोंबले जात असता, भीतीचा लेशही शिवला नाही किंवा त्याचा तो जिवंत शहाण्यांनी निदिलेला मार्ग त्यास टाकाऊ वाटला नाही, हे त्याच्या स्वभावास साजेसेच झाले. ज्या वेळेस राजनिष्ठेच्या शपथा घेऊन गांधीसारखे शहाणे लोक इंग्रजांस महायुद्धात साहाय्य देववून जर्मनांची कत्तल उडविण्यासाठी इंग्रजी सैन्यात हिंदी शिपायांची भरती करीत स्वराज्याच्या सरळ मार्गावर भरधाव चाललेले होते, त्याच वेळेस शेकडो क्रांतिकारक तरुणांसह गुप्त रीतीने हा तरुण संन्याल, भरती झालेल्या पलटणीतून बंडाचा उपदेश देत स्वराज्याच्या वक्र आणि रक्ताळलेल्या मार्गाने भरघाव चाललेला होता.

ते बंड फसले, लाहोरला मोठमोठे गुप्त कटांचे खटले होऊन इंग्रजांचे राज्य उलथे पाडण्यासाठी आणि भारतीय स्वातंत्र्य संपादन करण्यासाठी शस्त्र धारण करून रणांगणात उतरण्याच्या अपराधास्तव शेकडो फाशी गेले, जहाजे भरून जन्मठेपीवर धाडण्यात आले- त्याच धांदलीत शचींद्रनाथ संन्याललाही काशीच्या कटाच्या खटल्यात जन्मठेपीची शिक्षा झाली. त्याच्या नादाने त्याचे बंधूही या कटात गवसले होते, त्यांनाही बंदीची शिक्षा झाली, संन्यालचे घरदार जप्त करण्यात आले. त्याच्या नातलगांच्या मागे ससेमिरा लागला. त्या उद्ध्वस्त कुटुंबात त्यांची ती वृद्ध माता श्रीमती क्षीरोदवासिनी देवी तेवढी उरली.

शोकाने विव्हल झाली असेल नाही ती माता? होय. ती विव्हल झालेली होती. वडील मुलगा वयात आल्यावर घरचा संसार तो सांभाळील आणि वृद्धपणी माझ्यावर पडलेल्या वैधव्याच्या घाल्याखाली चुरडून गेलेली हीच माझी बाळे संततिसंपत्तीने युक्त होऊन माझी सेवा करून माझे पांग फेडतील, ही तिची आशा जळून गेली होती. तिच्या वडील मुलाने वयात येताच त्या आईचे पांग न फेडता, तिची विचारपूस देखील न करता तिकडे काळेपाण्यावर जाऊन तेलाचा घाणा फिरविला आणि इकडे

घरादारावर नांगर फिरविला. त्याने त्याच्या इतर भावांनाही त्याला लागलेले देशस्वातंत्र्याचे दिव्य वेड लावून दिले; त्यांचाही नाश केला; इतकेच नव्हे, तर त्याच्या संगतीने त्या त्यांच्या आईला देखील त्या सांसर्गिक वेडाने पछाडले!

-आणि तिचे उजाड घरही तिला भरलेले दिसू लागले. अंदमानात तिचा वडिल मुलगा जन्मठेपीच्या शिक्षेवर असताना तिची त्याला जी पत्रे जात त्यामध्ये आपल्या चारही मुलांनी स्वदेशस्वातंत्र्यार्थ घेतलेल्या व्रतापायी आपला संसार उद्ध्वस्त केल्याविषयी तिने एका शब्दानेही त्रास व्यक्त केलेला नसे!

पण लवकरच तो पुन्हा तिला भेटणार नाही अशा कठीण जन्मठेपीच्या शिक्षेवर गेलेला तिचा पुत्र योगायोगाने तिला भेटला. जन्मठेपीची वीस वर्षांच्या शिक्षेची पाच वर्षांतच सूट मिळून राजक्षमेच्या उलाढालीत संन्याल सुटले, आणि अंदमानातून घरी परत आले. त्यांचे तिघे भाऊही कारागारातून आणि राजकोपातून मुक्त झाले. त्या वृद्ध आणि निराश क्षीरोदवासिनी देवीच्या हेचि देही हेचि डोळा पुन्हा सर्व मुले भेटली. जे संकट जन्मात पार पडणारे नव्हते ते पाच-वर्षांचे आत पार पडले, तिच्या भ्रताराच्या आकस्मिक निधनानंतर प्राणाहून पलीकडच्या प्रेमाने वाढविलेली आणि क्रांतीच्या वादळात मध्यंतरी नाहीशी झालेली तिची कच्चीबच्ची तिच्या घरट्यात आणि तिच्या पंखाखाली पुन्हा एकसहा गोळा झाली. आनंद झाला. घर भरले.

-पण कोणाचे घर भरले? क्षीरोदवासिनीचे घर भरले. तथापि तिच्या मुलाला आणि त्याच्या संगतीने आता तिलाही त्या घराला स्वतःचे घर म्हणावेसे वाटतच नव्हते, जिवावर आले होते पण शेपटावर गेले असे समजून आपल्या दैवाने अंदमानहून परत आलेल्या मुलास नोकरी कर कशी! आता मात्र जपून राहा बरं! मरू दे तो देश संकटात! तुम्ही तुरुंगात पडलात तेव्हा एकजण देखील मला भीक घालीत नव्हता! अशा या लोकांसाठी कशाला मरतोस. ते सगळे तू गेलास तेव्हा म्हणत मला काय त्याचे? मग तू तरी कशाला मरतोस अशा कृतघ्नांकरिता? -इत्यादी शहाणपणाचा उपदेश क्षीरोदवासिनीने आपल्या मुलास दिला असता तर ते अगदी स्तुत्य नसले तरी क्षम्य होते; पण तिने तसा चकार शब्दही काढला नाही!

गरुडास जसे मातीत विसावा घेववतच नाही तसे संन्यालला घरी करमेचना. वादळाशी झुंजणे हीच जशी गरूडाची करमणूक तशीच वीरात्म्यांची. देशवीर संन्याल आणि त्याचे तिघे भाऊ पुन्हा क्रांतीच्या भयंकर निशेत चूर झाले. त्या जनक-जननी-जननी भारत-मातेची हाक त्यांच्या हृदयात सारखी प्रतिध्वनित होऊ लागली. ते त्यांच्यासारख्याच जाज्वल्य आणि अघोरी क्रांतिकारकांसह शस्त्रास्त्रे जमवीत, राजकीय स्वातंत्र्यार्थ इंग्रजांशी जीव-घेऊ-देऊ चकमकी लढत, सरकारी निधी बळकावीत, आगगाड्या लुटीत संयुक्त प्रांतभर पुनः धिंगाणा घालू लागले. त्यांचे तेच प्रकरण पुढे काकोरीचा खटला म्हणून प्रसिद्ध झाले!

त्या खटल्यात संन्यालला पुन्हा जन्मठेप झाली. त्याच्या भावांनाही पुन्हा शिक्षा झाल्या! वर्ष दीडवर्ष पोलिसांनी तिच्या मुलांस तिच्या घरून पुन्हा धरून नेल्यापासून तो मुलांना काकोरीच्या खटल्यात जन्मठेपीच्या दुसऱ्या शिक्षा लागेतो त्या क्षीरोदवासिनी देवीने खाणे, पिणे, राहाणे, निजणे इत्यादी शारीरिक आवश्यकतेच्या गोष्टीतही अत्यंत त्रास सोसला, छळ सोसले, दुःख सोसले!

-पण एका शब्दानेही मरो तो देश! जळो ते स्वराज्य! असे म्हटले नाही. ती माता होती. तिची चारी मुले दहा-बारा वर्षे सारखी पोलिस अटकेत जाऊन सुटत आणि पुन्हा पडत होती. अर्थात मुलांच्या ताटातुटीने ती विव्हल होई, पण एका शब्दानेही त्यांना स्वातंत्र्य युद्धापासून परावृत्त करीना! उलट त्यांना विजय मिळो म्हणून ती त्यांना अशिर्वाद देई! कारण ती नुसती माताच नसून वीरमाता होती. स्वदेशस्वातंत्र्यार्थ आपली मुले तिने देवाला आणि देशाला मनोभावाने अर्पणच केली होती. शचीन्द्रनाथ संन्यालला दुसरी जन्मठेप होऊन ते पुन्हा कारागारात पडल्यानंतर आणि तिची इतर मुलेही दुरावल्यानंतर क्षीरोदवासिनी झुरणीस लागली; आणि मुलांवाचून तळमळत आईची जी अवस्था होते, ती तिची झाली. झुरत झुरत देवी क्षीरोदवासिनी एप्रिल १९२८ मध्ये वारली! तिचा तो वडिल मुलगा तिला मरताना मांडी देण्यास देखील येऊ शकला नाही!!

मुलांसाठी झुरत आई मेली- पण मरताना देखील, आपल्या या देवाप्रिय मातृभूमीचे स्वातंत्र्यार्थ झुंजणारे वीरपुत्र आपल्या कुशीत उत्पन्न झाले म्हणून ती वीरमाता स्वतःस धन्य मानीत मेली!

प्रिय मातृभूमीच्या स्वातंत्र्ययज्ञात आपण स्वतःचं नव्हे तर आपला वंशचा वंश पुनःपुन्हा स्वातंत्र्यलक्ष्मीच्या स्थंडिलावर बळी देणारे जे काही धन्य देशवीर या हिंदुस्थानात आणि या हिंदूंत निघाले, त्यात शचीन्द्रनाथ संन्याल यांचे कुटुंबही गणले गेले पाहिजे.

त्या वीर कुटुंबातली ती वीरप्रसू क्षीरोदवासिनी-तिचे नाव, कुमारिकांनो आणि गृहिणींनो! -गर्भवतींनो आणि मातांनो! -तुम्ही प्रत्यही प्रातःकाळी स्मरण करा, त्या तशा पंचकन्यांच्या स्मरणाइतकेच ह्या अशा वीरकन्यांचे स्मरणही तुम्हास आणि तुमच्या देशास कल्याणकारक झाल्याविना राहाणार नाही!

श्रद्धानंद: ३ मे १९२८

* * *

## जितेन्द्रनाथांचे बलिदान!!

**की समयी न वदावी तरि मग केव्हा हितोक्त्ती बोलावी !**

**-- मोरोपंत**

जितेन्द्रनाथ दासांनी, राजबंदीना तुरुंगातून इतर अनैतिक अपराध्यांप्रमाणे न वागविता त्यांच्या पवित्र हेतूला आणि उच्च भावनांना शोभेल अशा सभ्य रीतीने वागविण्यात यावे, अशी मागणी करून ती पुरविली जाईतो अन्नत्याग करण्याची प्रतिज्ञा केली, आणि शेवटी त्या प्रतिज्ञेपायी उपासमारीच्या अत्यंत हालअपेष्टा सहन करीत आपला प्राण सोडला, ही माहिती ऐकताच उभे राष्ट्र विव्हल व्हावे हे साहजिकच होते. या भारतीय राष्ट्रीय स्वातंत्र्यार्थ ज्यांनी ज्यांनी गेल्या वीस-पंचवीस वर्षात आपल्या सर्वस्वाची आहुती दिली, त्या त्या हुतात्म्यांत जितेन्द्रांचे नाव अक्षय झळकत राहील यात शंका नाही. स्वदेशास्तव कोणी मारीत मारीत मरतात; ते देशवीर होतात. जितेन्द्रांवरील इंग्रजी आरोपांची छाननी होऊन त्यांनी काय काय केले हे आपणा सर्वांस अद्याप कळले नाही, तरीही आजच्या परिस्थितीत स्वदेशासाठी जितेन्द्र अन्नत्यागाची अमोघ प्रतिज्ञा करून स्वतःच स्वदेश-स्वातंत्र्याच्या यशात बळी पडला -मरणी मेला, हे तरी स्पष्टच आहे. म्हणून जितेन्द्रनाथ हुतात्म्याच्या गौरवास तरी पात्र आहेच आहे, यात शंका नाही. याला शेवटच्या आठवड्यापर्यंत तरी आपले मरण कोणत्याही क्षणी टाळता आले असते. त्याने अन्न स्वीकार करावा म्हणून अनेक देशभक्त त्यास विनवीत होते. त्याने प्राणावर बेतण्याचे संधीस उपास सोडला असता, तर कोणीही समंजस भारतीय त्यास माघार घेतली म्हणता ना, पण तरीही त्या मानी आणि एकवचनी वीराने अन्न स्वीकारले नाही, तो मरणास तिळमात्र भ्याला नाही. जिवाचे तिळतीळ तुकडे करून ते एकेक मोजून त्याने राष्ट्रीय यज्ञात स्वाहा केले, हे त्याचे अलौकिक प्राणदान, हे त्याचे धैर्य, ही त्याची सत्यसंघता प्रशंसनीय आहे. शूर संभाजी, वीर बंदा, गुरू तेगबहाद्दर या पूर्वकालीन महान् हुतात्म्यांच्या बलिदानाची गोष्ट जरी सोडली, तरी गेल्या वीस वर्षात भारतीय हुतात्म्यांच्या राष्ट्रीय यज्ञात दिलेल्या कोणत्याही आत्महविर्दानाइतके ते जितेन्द्राचे प्राणदान प्रशंसनीय आहेच आहे; वंदनीय आहेच आहे- पण?

भगतसिंग - दत्त, सतीन - सेन इत्यादी

भारताच्या या अवनत काली असा एक जरी देशभक्त तरुण उत्पन्न झाला असता, स्वातंत्र्ययज्ञात केवळ स्वतःच मरणी मरून का होईना, पण एकाने जरी अशा भीषण हालअपेष्टा सोशीत आपला प्राण आपणच स्वदेशाय स्वाहा! स्वदेशाय इदं न मम! म्हणून हवन केला असता,तरीही ते प्राणदान आपल्या भारताच्या पुनरुत्थानाची एक सुनिश्चित हमी होऊ शकते; परंतु जितेन्द्राप्रमाणेच, अगदी या क्षणीही त्याच्याच सहकाऱ्यांपैकी अनेक जण तेच दिव्य आणि दुर्धर साहस करीत आहेत. भगतसिंग आणि दत्त तर काय- ते अन्नत्याग करून स्वतःचे देहास अनेक दुःसह यातनात ढकलणारे केवळ तपस्वीच नाहीत, आपल्या देहाचा आपणच बळी देणारे मरणी मरते हुतात्मेच नाहीत, पण मारता मारता मरणारे देशवीरही आहेत, अशी या भारतातच नव्हे तर जगातही शेकडो लोकांची धारणा आहे. त्यांच्या मार्गावर विश्वास ठेवावा, त्या मार्गाचा पाठपुरावा करावा की नाही ही चर्चा येथे उद्दिष्ट नाही, म्हणून तो अप्रस्तुत विषय सोडला, तरी त्यांस शेकडो लोक देशवीर मानीत आहेत ही गोष्ट लपविण्याचे काही कारण नाही- लपविणे शक्यही नाही. त्या देशवीरांनी अन्नत्याग केल्यापासून प्रत्यही वृत्तपत्र उघडताना प्रत्येक राष्ट्रभक्ताचे मनांत धस्स होते की, वीर भगतसिंग- दत्ताची काही अशुभ बातमी तर आज वाचावी लागणार नाही ना? तीच स्थिती बंगाल्यातील हिंदुकुलभूषण सेनानी सत्येन्द्रनाथ सेनांची! पत्वाखालीला हिंदुराष्ट्राचे वतीने सतत वर्षभर झुंज घेऊन विजयी झालेला हा अट्टल सेनानी आज बारिसालच्या तुरुंगात अशाच एका सापेक्षतः क्षुल्लक अटीवरून निकरावर आला; त्याने अन्न वर्ज्य केले आणि आज शंभरावर दिवस नाना देहदंड भोगीत भोगीत जर्जर होऊन शरपंजरी पडला आहे. अन्नावाचून शक्ती क्षीण होत आहे, त्याचे अर्धांग लुळे झाले आहे! वाचा मंद झाली आहे! आता ते सुटले तरी जन्माचे पंगूपण घेऊन सुटणार. मेले- तर मरणी मारणार! भारतीय हुतात्म्यांच्या नामावलीत एक नाव अधिक वाढणार; पण -! या सर्वांचा निर्धार, ही तपस्या, हे धैर्य, ही देशभक्ती प्रसंशनीय आहे, वंदनीय आहे! -पण!

## हुतात्मा देशवीर रामरखा आणि

## अंदमानातील अन्नत्यागी

आज हे राजनैतिक बंदिवान लोकांच्या डोळयांसमोर आहेत, ते हिंदुस्थानच्या कारागृहात आहेत. त्यातही कच्च्या बंदीत अजून अभियुक्त अवस्थेत आहेत, accused आहेत, दंडित झालेले नाहीत- म्हणून त्यांच्या भावना, त्यांचे निश्चय, त्यांचे अपमान, त्यांचा मृत्यु-राष्ट्रीय दृष्टीच्या निःस्पंद दृष्टीसमोर एखाद्या चित्रपटासारखा धरलेला आहे. म्हणून त्यांची यातना उभ्या राष्ट्रभर हृदयाहृदयास पीळ पाडीत आहे. तथापि या वेळेस, माहित नसणारास नसले तरी माहित असणारास, राजकीय बंदिवानांना सन्माननीय वागणूक लाभावी याच प्रश्नासाठी अशाच अन्नत्यागाच्या भीषण प्रतिज्ञा करून अशाच दुर्धर यातना, जशा महिनोगणतीच्या उपासमारीने झिजत झिजत त्या दृष्टीच्या पलीकडील कठोर काळोखात -त्या अंदमानात -ज्यांनी गेली दहा वर्षे सहन केल्या, त्या नानी गोपाळांची, त्या भाई परमानंदांची, त्या शूर पृथ्वीसिंहांची -भाई सोहनसिंगादी त्या अनेकानेक राजकीय जन्मठेप्यांची आठवण आज झाल्यावाचून राहाणार नाही. अशाच उपासमारी, हेच हाल त्यांनी चार चार महिने सोसले!... स्वदेशाच्या ह्या भले वीर म्हणून सारखी पाठ थोपटणाऱ्या प्रेमळ सहानुभूतीची संजीवनी जवळ नसताना सोसले! -आणि ह्या जितेन्द्रासारखाच तो वीर रामरखा अन्न सोडून, कपडे टाकून, उपाशी, हातकडीनी जखडलेला महिनोगणतीच्या यातनांनी क्षय होऊन शेवटी मरणी मेला! त्याचे शव कुठे फाडले, कुठे पुरले, कुठे पडले याचा पत्तादेखील नाही! अनशन करून, आमची अमुक मागणी तुम्ही मानीत नसाल तर हे इंग्लंड देशा, तुझ्या दाराशी मी त्रागा करीत, उपाशी प्राण सोडीत ते पाप तुझ्या माथी म्हणून भीती घालीत, ते अंदमानात जे गेले, जे पंगू झाले, हे जे इथे मरत आहेत, पंगू होत आहेत -ते सर्व हुतात्मे निःसंशय प्रशंसनीय आहेत! पण!

जे एकाच्या उदाहरणात प्रशंसनीय असते ते एकंदरीत सर्वांना अनुकरणीय असतेच असे नव्हे!--

पण जे जे वर्तन किंवा जो जो सद्गुण सर्वसामान्यतः प्रशंसनीय किंवा वंदनीय असू शकतो, तो तो, सर्व परिस्थितीत सारखाच अनुकरणीय असतोच असतो असे नसल्याने, किंबहुना काही विशिष्ट परिस्थितीत तो सामान्यतः सद्गुण किंवा ते सामान्यतः प्रशंसनीय वर्तन अनिष्टच होत असल्याने, राष्ट्रीय लढ्यात, राजकीय पेचापेचीत, सदोदित विपक्षाची हालचाल आणि स्वपक्षाचे बल ही तोलून विवेचून, मग काय ते आपल्या सैनिकांचे संचलन करणे अगत्याचे होऊन बसते. राष्ट्रातील प्रत्येक चळवळ, राष्ट्रीय झुंजारांचा प्रत्येक सामना, नुसता प्रशंसनीयच असून उपयोगी नाही, तर तो कुशल, इष्ट आणि कार्यक्षमही असला पाहिजे. अत्यंत तीव्र देशभक्तीच्या वेदनांनी विव्हल होऊन एका तरुणाने, लोकमान्य टिळक मेल्याची बातमी एकताच, माडीवरून उडी टाकून जीव दिला म्हणून ऐकिवात होते. आता ही त्याची उत्कट देशभक्ती वंदनीय होतीच होती. ते प्राणार्पण करताना त्याची दैहिक जीवनाची तुच्छता कोणत्याही हुतात्म्याइतकीच प्रशंसनीय होती- पण त्यामुळे ते कृत्य अनुकरणीय ठरत नाही. कारण, ज्या ध्येयासाठी, स्वदेशहितासाठी, प्रेरित झाल्यामुळे त्याच्या हृदयात लोकमान्यांचे मरणवृत्त ऐकताच अशी बलिदानाची भावना उसळून आली, ते देशहित, ते त्याचे प्राण असे न देता-नुसते मरणी न मरता -जर जरा निराळ्या रीतीने त्याने दिले असते, तर अधिकच साधले असते. त्याचे कृत्य प्रशंसनीय असताही इष्ट नव्हते. ज्या नीच स्वार्थपरायण प्राण्याला लोकमान्यांचे मरणाचे दिवशीही क्षणभर देखील स्वदेशासाठी दुःख सोसण्याची उर्मी आली नसेल, क्षणभर देखील ज्याचे स्वार्थलंपट मन विचलित झाले नाही, त्याचे मनाहून हा स्वदेशप्रेमाने तळमळून तत्वाला आत्मार्पण करणारा तरुण कोटिपटीने वंदनीय आहे. पण तरीही त्याचे त्या कृत्यामुळे झाले त्याहून त्याच प्राणाच्या मूल्याने, शतपट अधिक स्वदेशहित त्यास सहज साधता आले असते. म्हणून ते कृत्य, प्राण देण्याची ती रीत, नुसते मरणी मरून जाण्याचे ते बलिदान, इतर राष्ट्र-योद्ध्यांपुढे अनुकरणीय म्हणून धरता येणार नाही. कारण, बलिदान आणि कत्तल, हवी आणि हत्या यांत एक चांगले आणि दुसरे वाईट हे जे आपण ठरवितो, ते का ह्याचे विवेचन केले असता त्यातील भिन्नतेची हीच कसोटी आढळून येथे की, त्यापैकी पहिले परोप्रकारास्तव आणि आत्मोन्नतीस्तव अत्यंत अवश्य असा त्याग असतो, महत्तर अर्थ साधण्यासाठी अपरिहार्य अशा अर्थाचा त्याग असतो आणि दुसरा म्हणजे स्वतःचा किंवा दुसऱ्याचा तामसी नाश असतो. लोककल्याणाला पोषक न होता क्वचित उलट विघातकच होणारा परिहार्य प्राणनाश असतो. मुक्तीला अवश्य तितकेच हवी घेतो तो खरा यज्ञ -हवी देतो तो खरा यजमान. न्याय्य समर जिंकावयास अवश्य तितकेच सैनिक अन्याय्य बलाचे शासनार्थ जो मरणावर चाल

करावयास धाडतो, तो खरा सेनापती.नुसते आत्मार्पण करणे म्हणजे मुक्ती मिळणे नव्हे; नुसते मरत राहाणे म्हणजे समर जिंकणे नव्हे. तसेच नुसते मरणी मरणे, हुतात्मा होत राहाणे म्हणजे राष्ट्रीय वा धार्मिक स्वातंत्र्य संपादन करणे नव्हे. ते जेव्हा केव्हा त्या स्वातंत्र्ययुद्धातील अपरिहार्य घटक, असेल, तेव्हा तेही केलेच पाहिजे, जसे तेगबहादुराने केले, जसे जे लढाईच्या पहिल्याच पायी शत्रूच्या गोळीस बळी पडतात, जसे शत्रूच्या कारागारात जन्मोजन्म जे स्वदेशार्थ सडतात ते करतात. परंतु राष्ट्रीय सैन्याचे मुख्य ध्येय विजय हे आहे. आपल्या न्याय्य पक्षाची एकंदरीत कमीत कमी हानी होऊन अन्याय्य विपक्षाची एकंदरीत जास्तीत जास्त हानी करण्यास जी युद्धकला झटते ती खरी युद्धकला होय!

त्या युद्धकलेचा हुतात्मता हाही केव्हा केव्हा एक अत्यंत अवश्य आणि अत्यंत वंद्य असा घटक होऊ शकतो. पण तो अपवाद म्हणून. केवळ हौतात्म्य ही काही विजयाची निश्चित हमी नव्हे! रामाची सीता रावणाने चोरली; जो सीतेला चोरून नेण्याइतका नीच आणि दुष्ट होता, तो रावण रामाने लाख उपोषणे करीत त्याच्या दाराशी सीतेला दे, नाही तर मी त्राग्याने स्वतःचा प्राण देतो असे म्हटले असता ज्याच्या अंतःकरणास लेशही द्रव फुटणार नाही इतका निलर्ज्ज, निष्ठुर होताच होता! म्हणून रामाने अन्न सोडले नाही; तर उलट रावणाचे पुढील जीवनाच्या अन्नाचे ताट ठोकरून त्यालाच मरणाच्या उपासमारीने कसा नामशेष करून टाकता येईल याच्या व्यवस्थेत श्रीराम तातडीने लागला. सीतेने देखील अशोक वनात असता, मला अमुकच भोजन आणि अमुकच मान देशील तर बरे; नाही तर अन्न सोडून मरेन, अशी नसती प्रतिज्ञा केली नाही. कारण, तिचे मुख्य ध्येय जे रामाकडून रावणाचा वध करविणे, त्यास ते आवश्यक नव्हते; इतकेच नव्हे तर क्वचित अपायकारकही झाले असते. हां, एक मात्र प्रतिज्ञा तिने केली -एक गोष्टीसाठी मात्र ती प्राणत्यागही करती -ती म्हणजे स्वतःचे प्रीतीस्वातंत्र्य -ते पातिव्रत्य -ते ध्येयच जर संकटात सापडते, आणि प्राण वाचविणे म्हणजे मुख्य ध्येयच सोडणे असा प्रसंग येता, तर -तर मग मात्र प्राण सोडणेच तिचे कर्तव्य होते -आणि तिने ते केलेही असते. गुरु तेगबहादूर, बंदा वीर किंवा राजे संभाजी यांचे मुख्य ध्येयच स्वधर्मरक्षण होते; म्हणून जेव्हा त्या ध्येयासाठीच प्राण देणे प्राप्त झाले, तेव्हा त्यांनी प्राण दिला हेच युक्त झाले. तेच खरे हौतात्म्य नुसते प्रशंसनीयच नव्हे -वंदनीयच नव्हे -पण अनुकरणीयही असणारे हौतात्म्य तेच! तीच गोष्ट कोठल्याही राजकीय क्रांतिकारकांचे मुख्य ध्येय जे महनीय स्वदेशस्वातंत्र्य आहे. त्यासही लागू आहे. त्यासाठी झुंजताना ते धरले जाऊन, वाताहात होऊन, त्यांच्या विपक्षाचे हाती पडले असता, जर

उदाहरणार्थ त्यांस त्यांच्या स्वातंत्र्यसेनेची वा त्यांच्या दारुगोळ्याची माहिती त्यांना विपक्ष विचारू लागला -जर त्याकरिता त्यांचे प्राणांतिक छळ होऊ लागले, तर छळ सोसून त्याकरिता प्राणही गेला तर तो देणे हे त्यांस त्यांच्या दृष्टीने कर्तव्य वाटलेच पाहिजे.

-कारण मुख्य ध्येयार्थच ते प्राणदान तशा स्थितीत अवश्य आहे. म्हणूनच उपयुक्त आहे. ज्या एका प्राणाच्या तशा दानाने शेकडो निरपराध प्राण, एका राष्ट्राचा मान, एका न्याय्य ध्येयाच्या ध्वजाचा गौरव हे राखले जातात तो प्राण देणे हेच खरे हौतात्म्य -केवळ प्रशंसनीयच नव्हे, वंदनीयच नव्हे- पण अनुकरणीय हौतात्म्य. क्रांतिकारकांच्या तत्वांशी किंवा मार्गाशी ज्यांची सहानुभूती नाही त्यांची चर्चा या विवेचनात अप्रस्तुत म्हणून तीविषयी अनुकूल प्रतिकूल असे काहीच मत या स्थली न देता त्रयस्थपणे आम्ही इतकेच सांगतो की ध्येयार्थ अत्यवश्य असलेले प्राणदानच तेवढे मुक्त आहे. पण ध्येयार्थ अनावश्यक असलेले प्राणदान त्या वीरात्म्याच्या देशभक्तीचे किंवा निग्रहाचे किंवा निःस्वार्थ निर्भयतेचे द्योतक होणारे आणि म्हणूनच हेतुतः वंदनीय असणारे परंतु व्यवहारतः ध्येयाच्या अंतिम विजयास अनावश्यक नव्हे तर एका अर्थी अपायकारकही होणारे आणि म्हणूनच अनुकरणीय नसणारे आहे. हे सर्वसाधारणपणे सांगण्यास काहीएक हरकत नाही. केवळ प्राणहानी अनिष्टकारकच होय आणि या दृष्टीने सध्या जिकडे तिकडे उठलेल्या या अन्न सोडून आपण होऊन अनेक यातना सोशीत, केवळ मरणी मरून जाण्याच्या पद्धतीची जी अन्न सोडून मरून जाण्याची साथ उठू पाहात आहे तिचा, या अन्नत्यागाच्या साथीचा, युद्धातील एक धोरण म्हणून निषेध करणे हे आम्ही आमचे कर्तव्य समजतो.

जी माणसे अशा उच्च देशभक्तीने प्रेरित होऊन अशी कठोर तपस्या करून, मरणी मरतात, त्यांचे वैयक्तिक मोल कमी न करता, त्यांच्या त्या दैवी वैयक्तिक बलिदानाचा यथोचित आदर करीत असताही हे स्पष्टपणे सांगणे अवश्य आहे, भावना दुखली तरी दुखवून, राष्ट्रीय हितासाठी हा बुद्धिवाद प्रकटपणे बोलून दाखविणे कर्तव्य आहे की, ही अनशनाची लाट जर अशीच फैलावू पाहील, तर तिच्यामुळे राष्ट्राच्या मुख्य ध्येयाला -स्वातंत्र्याला -ज्या माणसांच्या सक्रिय जीवनांची किंवा लढत्या मरणाची अपेक्षा आहे, त्यांना जवळ जवळ व्यर्थ गमावून, नुसते मरणी मारवून, आपण दुर्घर हानी पोचवू; कारण हे जे देशभक्त आता एकाचे पाहून दुसरा, दुसऱ्याचे पाहून तिसरा, असे अन्नत्याग करून लुळे, पांगळे, क्षयग्रस्त होत, दुःखद

मरणी मरणाचे भक्ष्य होऊ पाहात आहेत हे कशाकरता? तर राजकीय बंदींना थोडे बरे वागविले जावे, या सापेक्षतः अगदी दुय्यम मागणीसाठी! आणि अशा अगदी दुय्यम मागणीसाठी एवढाले वीर बळी द्यावयाचे! जितेंद्र, सेन, भगतसिंग, दत्त - असे एकाहून एक अभिमन्यु, जनकोजीसारखे वीर- एखाद्या भारतीय युद्धास जिंकणारे -एकेकाच्या प्राणाचे मूल्य दहा-दहा प्राण-असे हे देशभक्त, मुख्य ध्येय जे स्वातंत्र्य त्याच्यासाठी होणाऱ्या लढ्यामध्ये (struggle) अभिमुख आक्रमण करीत, मोलास मोल घेत मरावयाचे, ते असे अवेळी, अकाली, एका सापेक्षतः यःकिश्चित चांगल्या भाकरीच्या किंवा वर्तमानपत्राच्या तुकड्यासाठी किंवा एक खुर्ची-टेबल राजबंदिवानास मिळावे म्हणून अन्न सोडून सडत मरावे- नुसते मरणी मरून जावे! मातीच्या मोलाने असला घाटकरी इरेस घालून मातीस मिळवावा! राजंबदीच्या मानाप्रमाणे त्यांस वागवावे हा प्रश्न मानाचा आहे. ही गोष्ट खरी आहे. त्या मागणीसही मोल आहे; पण ते असल्या प्राणांचे नव्हे. अंदमानातही दहा वर्षे संप करून, इतर कैद्यांत संप पसरवून, अधिकाऱ्यांस उत्थापन देण्याचे नाकारून, बळाने पत्रे आत आणून, बळाने एकमेकांशी बोलून, हातकडी, बेडी -इतका त्रास अशा दुय्यम प्रश्नांकरिता, हक्काकरिता सोसला; परंतु तिथे जेव्हा जेव्हा, अन्नत्यागाचा त्रागा करण्याइतका कुणी संतापे आणि भलतीच प्रतिज्ञा करी, तेव्हा त्यास तत्काळ प्रेमाने आग्रह केला जाऊन त्या आत्मघातक निश्चयापासून परावृत्त केले जाई. एखादा अवसानबाज मनुष्य एखाद्या लिलावात एका दोन कवडीच्या वस्तुचे मोल हट्टास पेटून जसा दोन हजार रुपयांपर्यंत चढवीत जातो, तसेच राजबंदींना सुधारलेल्या पद्धतीने वागविण्याच्या दुय्यम मागणीसाठी अशा वीरांच्या अमोल प्राणांची अशी मातीमोलाने नासाडी करण्याची ही हटवादी चूकही अपायकारकच होणारी आहे. एखाद्या जितेंद्रसारखा उदात्त अपवाद झाला तर झाला; झाला तेवढा क्षम्य आहे. पण आता या यःकश्चित मागणीसाठी ही अनशनाची साथ अधिक फैलावू देता कामा नये.

राजकीय बंदिवानांना कितीही बऱ्या रीतीने वागविले तरी काय? स्वतःस बंदिवान म्हणवून घेण्याचे दौर्बल्य तर राहाणारच ना! अगदी खुर्चीवर बसून ताजे पत्र वाचीत राहिले, तरी इंग्रजांचा बंदिवान्! बरे, कारागृहाबाहेर आले तरी काय?

बंदी नसे त्यातील कोण बोल।<br>
जो लोक दैवे परदास झाला।।<br>
तो बंदि तद्भूचि तुरुंगशाला।।

या इतक्या दहा पंधरा हिऱ्यांस नागवून तो बरे वागविण्याचा अधिकार मिळाला -तरी काय? तो उद्या सामसूम होताच पुन्हा छिनला जाईल! जोवर हिंदुस्थान पारतंत्र्यात आहे तोवर लहानसहान अधिकार, जागा, पागा हिंसकवेल तितक्या हिसकीत राहायचेच; त्यासाठी परिमित आणि प्रमाणशीर तो स्वार्थत्याग आणि प्राणत्याग करीत राहायचेच -पण तरीही ते कधी विसरायचे नाही की, ते अधिकार जिने दिले ती परकी सत्ता जोवर जिवंत आणि प्रबळ आहे, तोवर ते केव्हा छिनावले जातील याचा काही नियम नाही. ते धुळीवरचे सारवण! म्हणूनच भलत्याच दुय्यम प्रश्नास हा मानाचा प्रश्न आहे असे नसते महत्व देऊन, लाखाचा प्राण मातीच्या मोलाने देण्याच्या प्रतिज्ञा यापुढे तरी कोणी कधी करूच नयेत. केल्या असल्या तरी मुख्य ध्येय जे स्वातंत्र्य त्यास असला सापेक्षतः निरर्थक आणि अतिशय सवंग प्राणत्याग अपायकारक असल्याने तशा भलत्याच प्रतिज्ञांची चूक त्या प्रतिज्ञा मोडून सुधारावी.

भलती प्रतिज्ञा करणे एक भूल तर ती प्रतिज्ञा राष्ट्रीय हितास अपायकारक असताही तशीच चालविणे ही सवाई भूल. अशा परिस्थितीत शक्यतो त्वरीत पाय मागे घेणे हेच खरे शौर्य, खरा देशाभिमान, खरे धैर्य आहे; म्हणून आम्ही आमच्या सर्व देशबंधूंस -त्यातही भगतसिंगादी अत्यंत तेजस्वी आणि लाखाच्या मोलाच्या नररत्नांस, वीरांस अशी आग्रहाची विनंती करतो की, त्यांनी राजकीय बंदिवानांच्या हक्कासारख्या दुय्यम आणि सापेक्षतः थोड्या मोलाच्या मागणीचे पायी आपल्या राष्ट्रीय पक्षाचे केवळ धुरंधर असे तरुण बळी देऊ नयेत. मुख्य ध्येय जे स्वातंत्र्य, त्याचे प्राप्तीसाठी हे प्राण व्यय करावे. युद्धाच्या मुख्य केंद्रावर, शत्रूच्या मुख्य मर्मावर ह्या निवडक वीरांच्या फळीच्या फळीने चालून जावयाचे की, विपक्षाच्या बाजारबुणग्यांशी मूठभर आट्यासाठी त्रागा करीत अनशनाच्या चिमट्याने एखाद्या फकिराप्रमाणे आपलेच अंग भोसकून मरणी मरून जायचे! त्यातही राजकीय बंदिवानांच्या दुय्यम प्रश्नांसाठीच काय ते अनशन हे अनुपयुक्त साधन आहे. इतकेच नव्हे तर स्वातंत्र्ययुद्धाच्या अशा प्रकारच्या युध्यमान परिस्थितीत अशा विपक्षाशी लढण्याचे ते साधनच नव्हे, ते शस्त्रच नव्हे.

जे शस्त्र विपक्षाच्या अंगात न भोसकले जाता स्वतःसच भोसकले जाते ते शस्त्रच नव्हे! आणि तेच वापरू पाहाणारा कुशल लढवय्याही नव्हे!

ही अनशनाची बंदूक विपक्षावर रोखली जाताच गोळी पुढे न जाता मागे निसटून धरणाऱ्याच्याच पोटात अचूक घुसते. ती अवसानघातकी बंदूक, ते अनशन, तो त्रागा,

हा उदात्त हेतूने पण अपायकारक चुकीने आत्मनाशास कारण होतो. ह्या अनशनापायी एक-दोन-दहा-वीस जरी भगतसिंग मेले तरी त्याचे विपक्षाला काय दुःख होणार!

उलट परसत्तेच्या पायवाटेतील हे जाचक होणारे भयंकर विषारी काटे तुम्ही आपण होऊन दूर फेकून दिलेत, असेच ती परसत्ता म्हणत राहील. मृगांनी सिंहाच्या दाराशी नुसत्या उपासाचा सत्याग्रह केला, तर सिंह बसल्याबसल्याच त्यास खाऊन टाकता येते म्हणून उलट हसत राहील! मृगांच्या अनशनाने नव्हे तर मृगयेच्या भीतीने सिंह गांगरला तर गांगरतो.

तुम्ही म्हणाल, परसत्तेचे अनैतिक स्वरूप जगाच्या दृष्टीस या योगे आम्ही पाडतो! -पण देशबंधूंनो, परसत्ता मूलतःच अन्यायाच्या पायावर उभी आहे हे जगास न कळण्याइतके ते जग -म्हणजे मुख्यत्वे युरोप आणि अमेरिका -वेडे आहे, असे का तुम्हांस वाटते? वॉरन हेस्टिंग्जच्या वेळची वर्कची भाषणे, बेगमांचा छळ, डलहौसीचे अपहार, सत्तावनच्या कत्तली, दुष्काळ, प्लेग, जालियनवाला बाग, अगदी परवाचा लालाजींवरील लाठ्यांचा मार -अहो, प्रत्यही आज दीडशे वर्षे नागवे हिंडणारे या परसत्तेचे अनैतिक रूप ह्या जगास जर दिसले नाही, तर त्या जगास ते आता आणखी ते काय दिसणार आहे? जगास सगळे माहित आहे. ते सगळे एकमेकांचे साथी आहेत, मिंधे आहेत. ते जग तुमच्यासाठी काहीही करणार नाही. उलट या तुमच्या आपल्याच माणसांचा बळी देणाऱ्या विक्षिप्त युद्धपद्धतीला पाहून ते तुमची अधिकच उपेक्षा करते. मॅक्सविनी मेला -म्हणून जगाने किती हजार सैन्य आयर्लंडच्या साहाय्यास धाडले? किती हजार विमाने? कोणी कोणी इंग्रजांशी केवळ त्या प्रश्नापायी लढाई सुरू केली? तीच स्थिती जतींद्रांची -भगतसिंगांची -दत्तांची! नव्हे, त्याहून वाईट! कारण, मॅक्सविनीच्या मृत्युच्या पाठीमागे स्वतः आयर्लंडच्या मशिनगनांचे बळ होते! म्हणून त्याची आग इंग्रजांना थोडी तरी पोळवू शकली. पण तुमच्या हुतात्म्यांच्या अन्न त्यागून मरणी मरून गेल्याने उत्पन्न होणाऱ्या क्षोभाच्या मागे कसले पाठबळ आहे? पुन्हा, एक मॅक्सविनी अन्नत्याग करून मेला त्याचे आधी त्याने एका प्राणदानाच्या विनिमयात शत्रुपक्षाची यथेच्छ हानी केलेली होती. वास्तविक तो मारीत मारीतच मेला. पण तरीही त्याने अन्नत्याग केला म्हणून साऱ्याच साऱ्या आयरिश बंदिवानांनी अन्नत्याग करून नुसते मरणी मरून जाण्याची परधार्जिणी चूक केली नाही. उलट त्यांनी तुरुंगातील अधिकाऱ्यांस सळो की पळो केले, आणि खाणे सोडले नाही; तर दंगे करून दुप्पट खाल्ले. आतून

बंदीगृहे फोडली, बाहेरून सशस्त्र आक्रमणे करवून बंदिवान सोडवून नेले! आयर्लंड स्वतंत्र झाला, तो मॅक्स्विनीच्या नुसत्या अन्नत्यागाने नव्हे, केवळ हुतात्मतेने नव्हे तर त्या हौतात्म्याचा पुरा पुरा लाभ घेणारी सशस्त्र रणधुमाळी उठवून देण्याचा त्याने त्यापूर्वीच हरिॐ केला होता, त्यामुळे आणि पुढे क्रांतीचा सारखा भडिमार करीत राहिला त्यामुळे, म्हणून आयर्लंड यशस्वी झाला, नुसते सगळ्यांनी मरणी मरून नाही. तशी सिद्धता आज हिंदुस्थानात कोणाची आहे? क्रांतिकारकांचे मार्ग बरे की वाईट, आयर्लंड तसे वाचू शकले म्हणून आम्हालाही तसे समरतांडव केलेच पाहिजे किंवा करता येईल की काय, याची चर्चा या लेखात प्रस्तुत नाही, तो प्रश्न स्वतंत्र आहे. पण तरीही इतके स्पष्टच आहे की, क्रांतिवादी किंवा शांतिवादी अशा कोणत्याही हिंदी पक्षाची, अशा हुतात्म्यांच्या नुसत्या मरणी मेल्याने उत्पन्न होणाच्या क्षणिक क्षोभाचा भीषण असा चटका विपक्षास बसेल अशी कोणतीही कृती किंवा क्लृप्ती करण्याची किंवा योजण्याची छाती नाही, सिद्धताही नाही. तोवर अशा नुसत्या राष्ट्रक्षोभाच्या क्षणिक उत्तेजनाची निशा उपभोगण्यासाठी हे एकाहून एक वीर नुसते मरणी का मारावे? जो क्षोभ विपक्षास लवलेशही चटका न देता आपल्या स्वतःसच जाळीत सुटतो तो काय कामाचा? जो क्षोभ एकदा राष्ट्रीय रडारडीचे अश्रू गाळताच विझून जातो, त्यासाठी हे इतके शूर वीर देशभक्त हालहाल करून मातीच्या मोलाने, अन्न अन्न करीत बळेच मारविणे हा अगदी आत्मघातकी वेडेपणा आहे. त्यापेक्षा परकी सत्ता या देशभक्तांचे असे छळ करती, त्यांना स्वीकारोक्ती (Confessions) करिता मारहाण करुन लुळे-पांगळे करती, त्यांना अशी बळाने उपाशी मारती, तर त्याचा दोष अधिक निरुत्तरपणे तिच्यावर पडून जगात आणि स्वजनांत झाला, त्याहूनही अधिकच क्षोभ उत्पन्न होऊ शकता. हिंदूवीर सतीन बाबू असे अन्न सोडून आपण होऊन मरणी न मरता सतीन बाबूंसारखे आणखी दहाजण जरी पत्वाखालीच्या सत्याग्रहात किंवा तशा कोणत्या शत्रूची प्रत्यक्ष हानी करणाऱ्या

लढ्यात मरते तर त्याचे दुःख नव्हते!

कारण विपक्षासही त्याच मानाने किंवा बऱ्याच मानाने तशीच हानी पोचत राहती. पण अशा भलत्याच आग्रहापायी, या अडाणी आत्मनाशक त्राग्यापायी, विपक्षाची हानी मुळीच न होता आपलीच मात्र शतपट हानी होते; नव्हे विपक्षाचे डाव आपणच असले अडाणी पेच मारू गेल्याने सुकर करून देतो!

अहो, कोर्टात खटले होऊन दोन चार वर्षे शिक्षा होत्या; त्या शिक्षा भोगून ते देशसेवेस आणि परसत्तेच्या छातीवर पुन्हा नाचावयास मोकळे होते; पण ज्यांना शत्रू फाशी देऊ शकत नाही अशा दहा-वीस आरोपितांना अन्नत्यागाची फाशी आपण होऊनच देतो. हजारो रुपये व्यय करून नवे कडक निर्बंध कर करून, वशिले लावून लावून, ज्या देशभक्तांना फाशी व्हावी म्हणून ही परसत्ता धडपडते तरीही ते सुटून किंवा दहा वर्षेच बंदी होऊन तिच्या छातीवर जिवंत नाचत पुन्हा झुंजण्यास परत येताना पाहून ती परसत्ता हिरमुसली होती -तीच परसत्ता त्या देशभक्तांना एक दोन महिन्यांत असे एकामागून एक पटापट अन्न सोडून मरताना पाहून मनातल्या मनात टाळ्या पिटून निस्संशय असेच म्हणत नसेल कशावरून की -ठीक! ठीक! औषधावाचून खोकला गेला. माझा एक केसही वाकडा न करता एक कट्टर शत्रू अनायासे मरणी मेला!

ज्या वेळी अंदमानात भाई परमानंद, नानी गोपाळ, भाई पृथ्वीसिंग, भाई सोहनसिंग इत्यादी अनेक देशभक्तांनी असाच प्राणपणाने अन्नत्याग केला, तेव्हा बॅ. सावरकरांनी त्या पद्धतीचा हानिकारक आत्मघातकी परिणाम राजबंदीच्या मनावर वारंवार ठसविण्याचा अत्यंत निग्रही प्रयत्न केला, म्हणून त्यातील काही तरी देशभक्त अन्नत्यागापासून परावृत्त होऊन, सुटून, आज पुन्हा देशाची उत्कट सेवा करीत आहेत ते सर्व प्रकरण माझी जन्मठेप ह्या पुस्तकात वाचकांनी अवश्य वाचावे. नाही तर ते लोक मरणी मरत विपक्षाचे बळ वाढविते, तर त्यांची नावे देखील इकडे कोणास कळती ना! पेलाभर दुधासाठी, पौंडभर तेल गाळण्यासाठी, एखाद्या वृत्तपत्रासाठी, एका खुर्ची-टेबलासाठी कामाचे संप करा, अधिकाऱ्यांशी भांडा, अधिकाऱ्यांना सळो की पळो करा, वेळेवर अन्नत्यागही मर्यादित अवधीपर्यंत करा! पण प्राणत्याग? आणि तोही आपणच उपाशी मरत आणि अशा सापेक्षतः यःकश्चित मागणीसाठी? आणि विपक्षाचा केसही वाकडा न करता? आणि भगतसिंग, दत्त, सतीनबाबू अशा पाच पन्नास धुरंधर देशवीरांनी? छट्! हा कसला अपायकारक त्रागा! अडाणी पेच! शत्रूची दैणावैरण बंद करावयाची की आपल्याच दलाची? शत्रूस उपासमार करावयास लावते, त्यास दे माय धरणी ठाय करते, त्याची शक्ती लुळी पांगळी होईल असे पेच मारते, तेच खरे युद्धाचे धोरण- मग त्यापायी आपल्याही पक्षास जी अपरिहार्य हानी सोसावी लागेल ती सोसूच सोसू. पण विपक्षाचा केसही वाकडा न होता आपला प्राण देऊन उलट विपक्षाचे कार्य सुकर करून देणारे हे कसले भिकारी फकिर त्राग्याचे धोरण! वीरहो, ते सोडून द्या! तत्काळ अन्नभक्षण करा! दुप्पट खा, आणि विपक्षाची दुप्पट हानी करीत वैध मार्गाने दुप्पट झुंजा.

हुतात्मा जतींन्द्राचा अपवाद वंदनीय आहे, प्रशंसनीय आहे- पण तो अपवाद आहे. सर्वांना तो मुळीच अनुकरणीय नाही! शिवाजी बंदीत पडला तेव्हा त्याने अनशन करून आपले प्राण सोडले नाहीत, तर तो औरंगजेबाच्या छातीवर लाथ मारून निसटून गेला! परिस्थिती पाहून योग्य तो फरक करा! पण मूळ रणनीती मात्र तीच ठेवा!

श्रद्धानंद: ५ मे १९२९

* * *

## बालमुकुंद आणि लज्जावती

महाराज पृथ्वीराजानंतर हिंदुसाम्राज्य-भंगामुळे जणू संतप्त झालेल्या दिल्लीच्या सिंहासनाला रक्ताची तहान वारंवार लागत असते. त्या सिंहासनाला जो जो कोणी पाय लावू पाहातो, त्याला त्याला रक्त सांडावे नि सांडवावे लागत आहे. बंगालच्या फाळणीनंतर राष्ट्रभक्तीच्या प्रचंड वावटळीत कलकत्याची राजधानी जेव्हा हेलकावे खाऊ लागली तेव्हा दिल्लीला राजधानी आणली गेली. लॉर्ड हार्डिंग्ज हे त्या वेळी गव्हर्नर जनरल होते. राजप्रतिनिधी या नात्याने दिल्ली राजधानी करून दिल्लीच्या सिंहासनाकडे जाण्यासाठी त्यांनी मोठ्या थाटामाटात- मोठमोठ्या राजेमहाराजांना अथवा जगातील उर्वरित नराधिपतींनाही हेवा वाटावा अशा राजवैभवसंपन्न देखाव्यात- दिल्लीप्रवेशाचा समारंभ करविला. दिल्लीच्या राजमार्गातून राजवैभवयुक्त थाटामाटाने परंतु अंतःकरणातील असुरक्षिततेच्या बोचणीमुळे आवश्यक झालेल्या सैनिक पोलिसांच्या संरक्षणात लॉर्ड हार्डिंग्ज दिल्लीत मिरवत होते. सहस्त्रावधी गोरे नि काळे सैनिक आपापल्या तरवारी, रायफल्स नि बेयोनेटे वातावरणात चकाकवीत त्या मिरवणुकीत इंग्रजी साम्राज्याचे जयघोष करीत आणि त्याच्या दराऱ्याचे प्रदर्शन करीत चालले होते. राजेरजवाड्यांच्या हत्तीवरील अंबाऱ्यांतून राजेमहाराजे व्हाइसरायच्या अंबारीमागे मिरवत होते.

दिल्लीच्या राजमार्गातून राजसिंहासनाकडे अशी ती प्रचंड मिरवणूक जात असता, अकस्मात आकाशातून वज्र पडावे त्याप्रमाणे कडकडाट झाला नि एक भयंकर बॉम्ब अगदी टिपून, हत्तीवरील अंबारीत गर्वोन्मत्तपणे बसलेले गव्हर्नर जनरल व्हाइसराय लॉर्ड हार्डिंग्ज यांच्या वरच येऊन पडला! त्या धडक्यासरशी लॉर्ड हार्डिंग्ज रक्ताच्या थारोळ्यात लोळू लागला. माहूत ठार झाला. तक्षकाने अत्यंत सुरक्षित स्थळी बसलेल्या परिक्षिताला जसा आकस्मात कडकडून दंश केला, तसाच कोण्या तरी भारतीय क्रांतिकारकाने बॉम्ब फेकून सूड घेतला! जिकडे तिकडे बॉम्ब! बॉम्ब म्हणून आरडा-ओरड झाली. पळापळ झाली. मिरवणूक उधळली गेली! सिंहासनारोहणाचा समारंभ रहित झाला!!

हे भयंकर कृत्य कोणी केले असावे याविषयी चोहोकडे तर्कवितर्क सुरू झाले. सरकारी गुप्तचर विभागाला अत्यंत महत्वाचे काम मिळाले नि बॉम्ब फेकणारा नि त्याचे साथीदार यांचा शोध मोठ्या निकराने सुरू झाला.

गुप्त आक्रमक कोणत्या तरी एखाद्याच स्थली असतात. एखाद्या ठिकाणातूनच दबा धरून ते आक्रमण करतात. असले एखादे रक्त सांडवासांडवीचे भयप्रद कृत्य करण्याचे नि दडी मारण्याचे कोठले तरी एकच स्थान असूनही हे गुप्त क्रांतिकारक कोठे असतील नि कोठे नसतील याविषयी मोह पडून परकीय अधिकाऱ्यांची मने अत्यंत त्रस्त नि भयग्रस्त होतात. ते त्यांना दशदिशा शोधू लागतात. साप साप म्हणून ते जिडके तिकडे भुई झोडपू लागतात.

तसेच या दिल्ली-बॉम्बपकरणीही झाले. सरकारी अधिकाऱ्यांना अपराधी न सापडणे ते दुष्कीर्ती करणारे नि असुरक्षिततेचे कारण होऊन बसत असते. खरा अपराधी अशा संशयग्रस्त मनःस्थितीत सापडतोच असे नाही. कधी कधी संशयाच्या अतिरेकाने अनेक अनपराधी देखील त्या संशयी शोधाला बळी पडतात. या बॉम्बच्या प्रकरणात अनेक तरुण पकडले गेले नि शिक्षापात्र ठरले.

आजच्या आपल्या कथेचा नायकही त्यापैकीच एक होता. या तरुणाचे नाव बालमुकुंद. पंजाबचे प्रख्यात देशभक्त भाई परमानंद यांचा हा चुलत भाऊ. भाईजींचे घराणेच हुतात्मतेचे घराणे झालेले आहे. औरंगजेबाच्या क्रूर धर्मवेडाला बळी पडून, भाईजींचे पूर्वपुरुष महान हुतात्मा मतिदास हे करवतीने डोक्यापासून खालपर्यंत एखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणे प्रत्यक्ष कापले गेले. या वीरात्म्याचा हा वंश, भाईजीने अंदमान भोगले आहे हे सर्वश्रुत आहेच. त्यांच्या या बालमुकुंद नामक चुलतभावाला वर वर्णन केलेल्या बॉम्बच्या फेकीच्या अपराधाचे संबंधात फाशीची शिक्षा झाली! बॉम्ब, अगदी तरुण असलेल्या त्या क्रांतिकारकानेच फेकलेला होता. तो पकडला जाण्याच्या एका वर्षापूर्वीच एका अनुपन सुंदर कुमारीशी त्याचा विवाह झाला होता. त्या कुमारीचे माहेरचे नाव रामरखी होते. विवाहानंतर सासरी तिचे नाव लज्जावती ठेवले गेले. तो पकडला गेल्यावर काय काय झाले याविषयीचे वर्णन देवी लज्जावतीने स्वतः जितके सांगितलेले उपलब्ध आहे तितके तिच्याच शब्दांत देत आहोत. लज्जावती म्हणते-

उन्हाळ्याचे दिवस होते. ते बंदीत होते- मी घरी होते. सहा महिन्यापर्यंत मी एका भाग्यदायी घटकेची वाट पहात होते. लोक मला सांगत, तू घाबरी होऊ नकोस, ते सुटतील नि घरी येतील. मी म्हणत होते, तो सुदिन केव्हा येणार? ही दुर्दैवाची रात्र

केव्हा संपणार? माझा भाग्यरवी पुनः उदयाचलावर केव्हा येणार? ती शुभ वेळ केव्हा दिसेल?

मी दिल्ली कधी नि कशाला पाहाणार! परंतु त्यांना दिल्लीस ठेवले होते. खटला तेथे चालला होता. मी तेथे पोहोचले. पाहिले, बंदीची कोठी फार भयानक आहे! त्या अगदी लहान नि कुंद खोलीत त्यांना (तिच्या त्या तरुण वीरपतीला) श्रावण-भाद्रपदाच्या (आपल्या इकडे ज्येष्ठात जसा उन्हाळा असतो तसाच तिकडे श्रावण-भाद्रपदात असतो.) अत्यंत उष्णतेच्या काळात दिवस काढावे लागत. मी विचारले, काय, निजायला चारपाई (खाट वा बाज) मिळते का?

सांगू लागले, कशी वेडी आहेस! येथे चारपाईचे काय काम?
मी म्हणाले, तर मग निजता कशावर?
ते म्हणाले, एक कांबळी जमिनीवर टाकून निजून राहातो.
मी घरी परत आले. रात्री मंडळी मोकळ्या छतावर वा गच्चीवर चारपाई टाकून निजली. मी घरातील तळाच्या (खोलीत) कोठीत शिरले. एक कांबळी भुईवर आंथरली नि त्यावर निजले. चोहो बाजूंनी डासांची भुणभूण सुरू झाली. कानाच्या आजूबाजूला घुमू लागले. मूर्ख, असल्या कोठीत का कोठे झोप येत असते? असे म्हणत मला ते डास वेडावीत आहेत असे वाटू लागले! मी उठून बसले. एका खिडकीतून चंद्रकिरणे आत येत होती. मी डोकावून चंद्रदर्शन घेतले नि त्याला विचारले, काय चमकनेवाला! तू त्यांच्या कोठीतही चमकतोस का? अशाच प्रकारे जागत नि या कुशीवरून त्या कुशीवर होत होत ते कशी रात्र काढतात हे तू पाहिलेस का?

चंद्रम्याकडे वारंवार पाहून सुद्धा उत्तर मिळाले नाही. रात्रभर डासांनी अंग खाऊन घेतले. अंगावर गांधी आल्या. दुसऱ्या दिवशी अशाच प्रकारे मी निजले नि डासांनी हल्ला चढविला. इतक्यात माझी मैत्रीण आली व म्हणू लागली, काय मरायला निघालीस का? मी म्हणाले, मी कशाने मरेन? ती म्हणाली, ही चिन्हे तर मरणाचीच आहेत! मी म्हणाले, काय, याप्रमाणे जे निजतात- मैत्रीण मध्येच म्हणाली, हो! हो! मरतात तर काय? माझे डोळे भरून आले. अश्रू गळू लागले. मैत्रीण स्तब्ध झाली आणि आपल्यालाच दोषू लागली. मी म्हटले, कोणाचा काही दोष नाही. माझे भाग्य फुटले आहे, ते बंदीत जसे निजतात, काय... त्याप्रमाणे मी नको निजू?

मला पुन्हा त्यांच्या भेटीची अनुमती मिळाली. पुन्हा मी दिल्लीत गेले. या वेळी मी विचारले तेव्हा ते म्हणाले, मला एकच वेळ खायला मिळते. मी विचारले, रोटी कशी असते? त्यांनी रोटीचा एक तुकडा मला दिला. मी तुकडा घेऊन परत आले. त्यात गहू होते, चणे होते नि आणखीही काही पदार्थ मिसळलेले होते. मीही घरी तशाच प्रकारची भेसळ बनविली नि ती दळून त्याची रोटी खाणे सुरू केले.

असे कित्येक महिने गेले. अंती एक दिवस मी आपल्या कोठीत बसले असता बाहेरून रडण्याचा ध्वनी ऐकू आला. माझे हृदय धडधडू लागले, डोक्याला घाम आला; पण जीव मुठीत धरून बाहेर आले नि पाहाते तो त्यांचे नाव घेऊन फाशीची शिक्षा, फाशीची शिक्षा झाली!! हे शब्द ऐकू आले.

त्यांचे अंतिम दर्शन घेण्यासाठी मी पुन्हा दिल्लीला गेले. ज्या बंदीत तरुणाचे तारुण्य नष्ट होते, सुकुमार नि मृदू अंतःकरणे करवतली जातात त्या बंदीत पोचले, दर्शन घेतले. अंतःकरण सांगत होते काही बोलून घ्यावे! ओठ सांगत होते, आम्हांस अडवून धरण्याचे सामर्थ्य नाही- इतक्यात त्यांचे ओठ हलले.

ते म्हणाले, प्राणप्रिये! जो प्राणी जन्माला आला त्याला एकना एक दिवस जावेच लागणार! कोणी कोणाला सोबत होऊ शकत नाही! तू आपल्याला भाग्यवती समज की मी देशहिताकरिता आपली स्वतःची आहुती देत आहे!!!

माझ्या कानाने हे शब्द ऐकले नाहीत तोच डोळे अश्रू ढाळू लागले. डोळ्याचे अश्रू थांबेनात... त्या अश्रूंमुळे त्यांचे मनसोक्त मुखावलोकन देखील मला करता येईना! पुष्कळ प्रयत्न केला; परंतु अश्रूंनी यथेच्छ दर्शन करू दिले नाही!

दुसऱ्या दिवशी हवनसामग्री एकत्र केली गेली. लोक बोलू लागले की त्यांच्या अंत्येष्टिसंस्कार आज होईल. मी म्हटले, फार सुंदर संधी आली. आता मी त्यांना जाऊन मिळेन. परंतु थोड्याच वेळात ऐकले, त्यांचे प्रेत अधिकारी देत नाहीत!

मग काय झाले, मी पुढे सांगू शकत नाही. आज पंधरा दिवस मी व्रतस्थ आहे. आता घटिका भरत आली... आता माझे मनोरथ पूर्ण होणार!

इतके म्हणून देवी लज्जावती चूप झाली. देवीने अन्नाचा कण किंवा पाण्याचा थेंब तोंडात घातला नाही. याप्रमाणे अठरा दिवस गेले. एक्या स्थलावर आसनस्थ होऊन ज्या मूर्तीवर तिचे ध्यान आकर्षण झालेले होते त्या ध्यानात निमग्न होऊन स्थिर होती. तिने तपस्या पूर्ण केली. अंतिम दिवशी सूर्यबिंब पूर्ण तेजाने प्रकाशत होते. लोकांनी आपापल्या कार्याला आरंभ केला, देवी आपल्या आसनस्थ स्थानावरून उठली. स्वतः स्वच्छ पाणी आणले... स्नान केले. स्वच्छ वस्त्र परिधान केले आणि ध्यानस्थानी अंग टाकले. म्हणाली, प्रिया, फार दिवस आपण माझी परिक्षा पाहिलीत. आज तर आपला सापडता हात सोडणार नाही... आता विभक्त नाही राहू शकणार! इतके म्हणून तिने आपले प्राण खेचून घेऊन देहत्याग केला, इच्छापूर्वक देह सोडला!!! साध्वी लज्जावतीने देशभक्त हुतात्मा पती बालमुकुंदाशी एकरूप होण्यासाठी परलोकाचे देवद्वार स्वेच्छाबलाचे उघडून स्वर्गी प्रवेश केला! याला म्हणतात सती जाणे!

धन्य ती साध्वी, धन्य तो स्वार्थत्यागी हुतात्मा, आणि ती हिंदू जाती त्रिवार धन्य, की जी अशा दिव्य नि अलौकिक मनुष्यरत्नांना जन्म देते!

श्रद्धानंद: १८ मे १९२९

## आंध्रप्रांतीय भारतवीर श्रीराम राजू

दुर्दैवी कालात काही सद्‌गुण निंदिले जातात. स्वातंत्र्यकाळातील गुणांना पारतंत्र्यकालात अपराधाचे स्वरूप येते. तेव्हा परिस्थितीच्या शासनकक्षेत फिरत राहाणाऱ्या आम्हा कूपमंडूकांना या स्वातंत्र्यवीरांची कृत्ये विपर्यस्त स्वरूपात दिसावी हे स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्य आहे. असे असले, तरीही कधी कधी परिस्थितीच्या नैर्बंधिक (कायद्‌याच्या) दडपणाखाली चेपले जाणारे मन त्या दाबाखालून निसटले नि निरपेक्ष वस्तुमूल्य दाखवणाऱ्या गुणवत्तेच्या पवित्र वातावरणात काही काळ का होईना, संचार करू लागते. मनाला शिक्षा कोण करणार नि कशी करणार? ज्याचे मन असते त्यालासुद्धा ते आवरता येत नाही. त्याला झुकांडी देऊन वा बलात्काराने खाली दडपून टाकून मन स्वतः मोकळे होते आणि त्याला दडपू पाहाणाऱ्या दुर्बल प्रयत्नास जणू वाकुल्या दाखवितच उंच उंच पवित्र वातावरणात उडून जाते.

आमचेही असेच झाले. श्रीराम राजूचे चरित्र कोठेसे वाचावयास मिळाले आणि मनाने भरारी मारण्याला आपल्या कल्पनेचे पंख विस्फारले. त्याला आम्ही म्हणालो, अरे! श्रीराम राजू बंडखोर, सांप्रतच्या राजसत्तेने बनवलेल्या निर्बंधाप्रमाणे तो अपराधी नि या अहिंसायुगाच्या प्रवर्तनकाली त्याला अत्याचारी म्हणातात. अर्वाचीन महात्मे त्याला वीरवृत्त पण दिशाभूल झालेल्या वेडापीर समजतात आणि राजसत्तेचे न्यायाधीश कोणी त्याच्यासारख्याला धरून दिले वा धरून आणले तर प्राणदंडनीय ठरवतात. अशा या अपराधी, अत्याचारी, वेडापीर नि दंडनीय श्रीराम राजूला तू डोक्यावर काय घेऊ पाहातोस?

## तो अपराधी नाही

पण! क्षणापुरतीच का होईना, त्या स्वतंत्र वातावरणातील कसलीशी उडवती नि चढवती झुळूक लागून उंच भराऱ्या मारण्यास उद्‌युक्त झालेले मन आम्हाला वेडावीत म्हणू लागले- अरे वेड्‌या! श्रीराम राजू जितका नि जसा बंडखोर तितकाच नि तसाच इंग्लंडच्या हातातून अमेरिका हिसकावून घेणारा जॉर्ज वाशिंग्टन-अथवा इंग्लिशांच्या हातून आर्यलंड स्वतंत्र करू पाहाणारा डी व्हॅलेरा-प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाच्या मानगुटीस बसून त्याला फासावर पाहू निघालेला क्रॉमवेल हेही बंडखोरच! मग त्यांची स्तुतितोत्रे गातोस-त्यांना स्वातंत्र्यवीर म्हणतोस आणि श्रीराम राजूमध्येच

तुला बंडखोरी दिसते? पारतंत्र्यसुलभ दासवृत्तीच्या नैर्बंधिक भयासाठी का तू त्याला बंडखोर ठरवणार? तू वाटल्यास त्याच्या श्रेष्ठतेकडे डोळे उघडून पाहू नकोस. असाच भ्याड राहा. पण तुझ्या भ्याडपणाला झाकून त्याला बंडखोर का म्हणतोस? तो बंडखोरही नाही नि जागतिक गुणग्राहकत्वाच्या निकषाने तो अपराधीही ठरू शकत नाही.

आता तू त्याला अत्याचारी म्हणतोस? पण यात तू स्वतः अत्याचारी ठरतोस. रावण, कंस, कौरव, मोगल-मुसलमान आदिक दुसऱ्याला लुबडणारे-लुटणारे हे जेव्हा दुसऱ्याचा जीव घेतात वा जीव द्यावयास उद्युक्त होतात तेव्हा त्यास अत्याचारी म्हणतात; ते अत्याचारी असतात. पण अत्याचाऱ्यांना त्या हिंसक नि परस्वापहारी अपराध्यांना लोककल्याणासाठी अपरिहार्य नि आवश्यक म्हणून प्राणदंड देणाऱ्या श्रीराम-श्रीकृष्ण-श्रीशिवरायादी लोककल्याणेच्छाप्रेरित लहानमोठ्या लोक-कल्याणकर्त्यांना अत्याचारी ठरवणे म्हणजे शब्दाचा अर्थ न कळणारा मूर्ख मी आहे असे म्हणून घेणे आहे. हे तुझे अहिंसापुराण नि अत्याचारशास्त्र तुझ्या त्या सडक्या मौर्ख्यातच कोंडून ठेव आणि सत्ताबली न्यायाधीश, साधले तर अशांना प्राणदंड देतात, म्हणून ते अन्यायी नि अपराधी म्हणावयाचे तर मग यशस्वी जॉर्ज वॉशिंग्टन वा डी व्हॅलेराही अपयशी झाले असते तर अपराधी ठरवले गेले असते, म्हणून त्यांना तू आता मानावयाला नको होते. पण तू त्यांना तसे म्हणू शकत नाहीस. तेव्हा श्रीराम राजूलाही जास्त यश मिळाले नाही वा यश मिळत नाही म्हणूनच केवळ अपराधी ठरविणारा तू न्यायप्रिय सत्यभक्त नव्हेस -केवळ एक नेभळा, भित्रा, पौरुषहीन पण धूर्त नि भोंदू आहेस!

असे म्हणत ते माझे मन मला लाथाडीत नि हिणवीत उंच उडून गेले. त्याच्या निरीक्षणकृत्यातील विचारपरंपरेने वर्णित श्रीराम राजूचे वर्णनात्मक चरित्र आम्ही वाचकांपुढे मांडीत आहोत. अर्थात त्यांनी केलेली कृती इतरांनी करावी की करू नये हा मुद्दा अगदी निराळा आहे. येथे केवळ त्यांचे चरित्रच कथन केले आहे. तेव्हा त्याच्या अनुकरणाचा प्रश्नच उद्भवत नाही.

## परंपरा तीच

भारतमातेच्या कुसवा धन्य करणारे वीरात्मे या भारतवर्षात सर्व प्रांतांमधून जन्म घेऊन या अनंत संकटमग्न दुर्दैवी हिंदू जातीची सेवा करीत असतात. ही एवढी एकच

गोष्ट भावी कल्याणाच्या निश्चित आशेचा स्फूर्तिदायी किरण निराशेने निस्तेज झालेल्या अशा नेत्रांत आल्हादाचे तेज चमकवू लागते. आज आम्ही अशाच एका वीर पुरुषाचे- जो अद्याप आपणामधून स्मृतिसृष्टीच्या पडद्याआड मृत्युच्या द्वाराने निघून जाऊ शकला नाही- अशा धन्य वीराचे चरित्र देणार आहोत. श्रीरामाने जगातील रावणी अत्याचार रक्ताच्या महानदीत बुडवून टाकला. पांडवांनी कौरवी अत्याचाराला मृत्युच्या जबड्यात भिरकावून दिले; महाराणा प्रतापाने इस्लामी सत्तेला, निराशेच्या भयंकर वणव्यात स्वतः होरपळून जात असताही, एक नाही दोन नाही सतत एकवीस वर्षे सिंहपराक्रमाने धडाका दिल्या नि मरणातही नतमस्तक न होता हिंदू जातीच्या गौरवाचा यशोध्वज स्वातंत्र्याकांक्षेच्या उंच आकाशात फडकत ठेवला; श्रीशिवरायाने त्या मोगली रावणसत्तेला धूळ चारीत हिंदुपदपादशाहीचा विजयप्रसाद बांधला; श्रीसंभाजीरायाने त्या हिंदुवंशाचे स्वातंत्र्य प्रासादाला आपल्या तेजस्वी नि पौरुषसंपन्न उष्ण रक्ताने उदित सूर्याचे लालभडक, चमकते तेज चढविले. छत्रपती राजारामाने एकवीस वर्षांचा प्राण देताघेता युद्धयज्ञ करून तो स्वराज्य प्रासाद अभंग ठरविला. बाजीराव, नानासाहेब, भाउसाहेब, माधवराव, नाना फडणीस, शिंदे-वीर- थोडक्यात अखिल महाराष्ट्रवीरांनी त्या स्वराज्याला साम्राज्यपदाचे वैभव मिळवून दिले, दुर्दैवाचे फेऱ्यात सापडून त्या कोसळल्या मंदिराला पुन्हा उभवू पाहाणाऱ्या या भारतभूमीला पुन्हा प्रतापगिरीच्या भाग्यासनावर प्रस्थापित करण्याकरिता झगडत-लढत-मरत राहणाऱ्या नानासाहेब, लक्ष्मीबाई, तात्या टोपे, वासुदेव बळवंत आदिक वीरपुंगवांनी या जळत्या मारत्या कार्यक्षेत्रात आत्महुती दिल्या. आंध्र प्रांतीय भारतवीर श्रीराम राजू हा पुरुषही त्याच अखंड भारतीय वीरपरंपरेतील एक निःसीम भक्तमणी आहे.

## बाळपण नि शिक्षण

या भारतभक्ताचा जन्म आंध्र प्रांतात एका सन्मान्य क्षत्रिय घराण्यात मगल्लू गावी झाला. हे गाव पश्चिम गोदावरी जिल्ह्यात आहे. ज्या वीर पुरुषांनी जगातील मोठमोठ्या क्रांत्या घडवून आणल्या, मोठमोठाली साम्राज्ये स्थापिली, आपापले देशांना पारतंत्र्याच्या घोर नरकातून उद्धरुन स्वातंत्र्याच्या स्वर्गाचे धनी बनविले अशा पुष्कळ महापराक्रमी थोर पुरुषांप्रमाणेच हा आपला श्रीराम आधुनिक दृष्टीच्या विद्येने अलंकृत (?) झालेला नाही. निरनिराळ्या स्थली शिक्षण घेत घेत हा पुरुष कसा तरी पाचवीपर्यंत विद्या शिकला. याला गायनकला चांगलीच अवगत असून तो होतकरू कवीत गणला जात होता. त्या सुमारासच याच्या अंगातील भावी महनीय

गुणांचे बीज स्पष्ट दृग्गोचर होऊ लागले. या गुण चिन्हांवरून तो एक वेडाच्या थराला पोचला जाणारा मूर्ख आहे, अशी परीक्षा महात्मा गांधीजीनी केली होती. स्वतः गांधीच म्हणतात. (I mistook them (the signs of greatness) for signs of stupidity bordering on madness.) -माझी त्या वेळी केलेली परीक्षा चुकली. थोर नि असामान्य कर्तृत्वशाली पुरुषांच्या लहानपणीच त्यांच्या महत्तेचे प्रतिबिंब त्याच्या प्रत्येक कृतीत नि हालचालीत दृग्गोचर होते. गांधीजींनी त्याला त्याच्या हातून होणाऱ्या शिक्षणाच्या हयगयीकरिता पुष्कळ टोमणे मारले- निंदिले. श्रीरामनी खरी विद्या काय आहे नि हे शिक्षण कसे निरुपयुक्त आहे, यावर गांधीपुढे बरेच विवरण केले पण ही शिक्षण-गीता गांधीजींना कळली नाही. मी संन्यास घेईन नि मी माझ्या देशबांधवांचा उद्धार करीन ही त्याची तपवाणी गांधींच्या कानी त्यांनी पुष्कळ वेळा घातली. गांधीजी म्हणतात, हाय हाय! त्या शब्दांची महत्ता त्या वेळी मला किंचितही कळली नाही!

पुढे आपला श्रीराम हा नरसापूरला शिकण्यास गेला. तेथे गेल्यावर त्याला ज्योतिष-शास्त्र, हस्तसामुद्रिक नि अश्वरोहण कला (घोड्यावर बसणे) या गोष्टीची गोडी लागली. त्याचे लहानपणाविषयी याहून विशेष काही माहिती नाही.

## संन्यासी श्रीराम

१९१७ चे आरंभी त्यांनी संन्यास घेतला नि १९१८ मध्ये आंध्रप्रांतातील एजन्सी भागात सांबारी डोंगरात ते तपस्या करू लागले. तपस्येनंतर डोंगरात त्यांनी आपले निवासस्थान केले. तेथील लोकांत त्यांचेविषयी फार पूज्यबुद्धी वाढली आणि स्वाभाविक नि स्वयंस्फूर्तीने ते लोक श्रीरामाच्या भजनी लागले. दूध नि फळे हा नि इतकाच त्यांचा आहार होता. १९२० चे सुमारास ते नाशिकच्या यात्रेला पायी गेले.

अनत्याचारी असहयोगाचे चळवळीविषयी त्यांना आदर नव्हता; इतकेच नव्हे तर, त्यांच्या उक्तीवरून नि कृतीवरून ते संन्यासी झाले होते तरी क्षात्रवृत्तीचाच अवलंब त्यांनी केला. गांधीच्या एकंदर कार्यक्रमात ब्रिटिश न्यायालये नि दारूचे गुत्ते यांचेवरील बहिष्कार मात्र त्यांना आवडले. गोदावरी नि विजगापट्टण जिल्ह्यात त्यांनी दारूबंदीची चळवळ हाती घेतली. त्या पुरुषाचे निर्मल नि उदात्त चारित्र्य नि त्याची आकर्षक भक्तिशीलता यांच्या योगे तटस्थ जनतेची मने त्यांचेकडे पूर्णपणे आकर्षित झाली होती. त्यांचा शब्द तेथील लोकांना वेदवाक्य होऊन बसला. श्रीरामच्या, हृदयांना हालविणाऱ्या वक्तृत्वाने त्या लोकांची सरळ मने आज्ञापालनाला आतुर

करून सोडली. इंग्लिश न्यायालयात पाय ठेवू नका नि दारूला शिवूही नका हा त्यांचा आदेश होता. त्यांची ही हाक सर्व प्रदेशात वणव्यासारखी पसरली. त्या एजन्सी प्रदेशात एकही मनुष्य असा राहिला नाही की, ज्याने श्रीरामचा शब्द झेलला नाही. त्या प्रदेशातील जनतेत ऐक्य, नवीन विचारक्रांतीच्या युगाचा प्रादुर्भाव झाला. लोकांनी दारू टाकली- न्यायालये ओस पडली. गावोगाव पंचायती स्थापन झाल्या नि त्यात सर्वांचे न्यायनिवाडे होऊ लागले. त्याला स्वदेशी फार आवडे नि त्याकरिता आपल्या सैनिकांना खादीचे स्वदेशी गणवेष त्याने दिले होते. श्रीरामाच्या सैनिकांना गणवेषाकरिता खाकी खादी पुरविण्याबद्दल श्री. रल्लापल्ली कसन्ना नावाच्या एका गृहस्थावर दावाही करण्यात आला होता. स्वतःच्या देवालयातच निवासस्थान बनवून श्रीराम आपले तपानुष्ठान करी. प्रत्यही त्याच्या दर्शनासाठी खूप गर्दी होई. श्रीरामच्या स्फूर्तिदायी नि उद्दीपक उपदेशांनी त्यांची मने मंत्रमुग्ध होत. श्रीरामच्या आध्यात्मिक उपदेशाला देशभक्तीचे अनुपान योजलेले असे. त्याच्या उपदेशामृताचे पान लोक मोठ्या आतुरतेने करीत. पंचवीस वर्षे वयाचा हा ज्वलंत देशभक्त संन्यासी आपल्या ओजस्वी वाणीने तेथील अशिक्षित समजल्या जाणाऱ्या कोया जातीच्या लोकांवर काय परिणाम घडवून आणीत असावा बरे? आमचे सुशिक्षितचे सुशिक्षण त्यांना भावनाहिन, निःसत्व नि म्हणून कर्मशून्य बनवीत असते. परंतु हे अशिक्षित परंतु पौरुषसंपन्न लोक भावनाबलानñ युक्त असतात. केवळ त्यांच्या अंतःकरणाला जागविणाराच पाहिजे. ही मंडळी चेतणे कठीण असते. पण एकदा ते तापले, कर्मशक्तीच्या तेजाने त्यांच्यात एकदा खळबळ उडाली की, मग त्यांना हात लावणाराचा हात भाजून निघाल्यावाचून राहाणार नाही. हिंदुस्थानवर केवळ पाशवी बलाच्या जोरावर राज्य करू पाहाणाऱ्या सत्ताधारी पक्षाला या गोष्टीने अस्वस्थ केले. लागलीच हा पाहा क्रांतिकारी- भयंकर राज्यद्रोही नि साम्राज्याचा शत्रू श्रीराम येथे प्रकट झाला आहे. तो नष्ट झालाच पाहिजे. अशी घोषणा झाली आणि लागलीच जानेवारी १९२२ मध्ये राजू फितूर फैलावीत आहे अशी बोंब उठली. आणि त्याच्या असहयोगी-पणाचा पुकारा झाला. पूर्व गोदावरी जिल्ह्याचा पोलीस सुपरिंटेंडेंट येथे धावत गेला. त्याने काय पाहिले? श्रीराम आपल्या अनुष्ठानात मग्न आहे. विजगापट्टण जिल्ह्यातील नृसिंहपट्टण येथे सहा आठवडे श्रीरामला दृष्टिबद्ध कारावासात (Interned) ठेवले नि नंतर सोडून दिले. तरीही त्याचे मागचा पोलिसी ससेमिरा सुटला नाही. श्रीरामने तेथील डेप्युटी कलेक्टर फझलुल्ला याला हा पोलिसी त्रास चुकविण्याचा अर्ज केला. पुढे दोघांची गाठ झाली असे म्हणतात. त्या डेप्युटी कलेक्टराने मद्रास सरकारला श्रीरामला एकतीस बिघे भूमीचा तुकडा देऊन शेती करण्याकरिता पुष्कळ सुलभता करून देण्याकरिता लिहून पाठविले नि मद्रास

सरकारने खरोखरी ती देणगी सम्मतही केली आणि त्या देशभक्ताला एक शेतकरी बनवण्याचा प्रयत्न झाला.

## रीजन्सीतील असंतोष

पण! सर्व हिंदुस्थान ब्रिटिश सत्तापक्षाचे हातून सोडवून स्वतंत्र करण्याच्या महत्वाकांक्षेच्या प्रखर अग्निज्वालेने भडकणारे होमकुंड श्रीरामाच्या देशभक्त अंतःकरणात पेटलेले होते. अर्थात श्वानवृत्तिहीन मनुष्यप्राण्यांना लांगूलचालन करण्यास लावणारा तीस बिघे भूमीचा तुकडा या महदाकांक्षी वीरवृत्त पुरुषाला कसा वश करू शकणार? त्याने गीता वाचली होती. त्याला स्वधर्म कळला होता. त्या प्रदेशातील वस्तुस्थिती त्याला अनुकूल होती नि तिचे त्यास फार साहय झाले. त्याने ती वस्तुस्थिती आपल्या भारतमातेच्या हितकार्यी लावून घेण्यात कमी केले नाही. त्याने गुडेम तालुका आपल्या कार्याचे क्षेत्र बनविले. त्या रीजन्सीमध्ये इतर स्थलांप्रमाणे सरकारी कारभार नाही; तेथे जबरदस्ती कारभार असतो. तेथे संताल परगण्यात तेच नाव आहे. त्या परगण्यात डायरच सत्ता चालवित होते. त्या अरण्यातील संताळादी लोकांचे सर्व हक्क सरकारने छिनावले होते. त्यांना स्वयंपाक करण्यास लाकडेसुद्धा वापरता येईनात. पूर्वीप्रमाणे त्यांच्या गाईना चारा चारता येईना. या नि इतर अशाच अत्यंत अन्याय्य गोष्टीमुळे त्या रीजन्सीत भयंकर असंतोष माजला होता.

## लोकसंग्रह

श्रीरामला क्रांतीचे बीज पेरण्याला ही उत्कृष्ट भूमी मिळाली. त्यांनी उत्कृष्ट अनुयायी नि समर्थ कार्यकर्ते मिळविले. लोकांत स्वराज्याची तीव्रतर इच्छेची जळती ज्योत पेटली. श्रीराम राजूंनी त्यांच्या सामान्य आकांक्षांना एकदा महत्वाकांक्षेचे पेटते स्वरुप दिले. श्रीराम राजूंवर तेथील लोकांची अत्यंत निष्ठा होती. आणि ते प्राणपणाने त्यांच्या नेतृत्वाखाली स्वराज्यार्थ जीव देतघेते प्रयत्न करण्यास एका पायावर सिद्ध होते.

## स्वराज्यसंपादनाचा मार्ग

तो जेथे जेथे जाई तेथे ब्रिटिश साम्राज्यसत्तेचे पोलिस आपल्या जिवाच्या भयाने शस्त्रास्त्रे, बंदुका नि दारूगोळा-तेथेच सोडून पळून जात. एका अनत्याचारी

असहयोगीने तू स्वराज्य जे मिळणार ते काय मार्गानी? असे विचारताच तो म्हणाला, या साम्राज्यशाहीशी युद्ध केल्यावाचून स्वराज्य कधीही मिळणे शक्य नाही. त्याला त्या अनत्याचारी स्वराज्य-संपादकाने विचारले, हे शक्य आहे काय? अर्थात शक्य आहे! मजजवळ माणसांची वाण नाही. केवळ दारूगोळाच काय तो मिळणे कठीण भासते.

## चिमुकला कैसर

साम्राज्यशाहीने गुडाममधला चिमुकला कैसर अशा नामभिधानाने त्याचा उल्लेख करण्याचा उपक्रम केला होता. वीस वर्षाचा तरुण अफाट साम्राज्याच्या सत्तापक्षाला आव्हान देतो!! त्या तरुणाने अमुक स्थली अमुक वेळी मी घाला घालणार! म्हणून प्रसिद्ध करावे नि तो घाला आला असता तेथील ब्रिटिश सिंहाच्या आयाळाचे केस होरपळले जावेत. कोया लोक हे त्याचे सैन्य, धनुष्यबाण ही त्याची शस्त्रे, पर्वताच्या गुहा-दऱ्या हे त्याचे रणक्षेत्र, खेडापाड्यांतील एकनिष्ठ, स्वदेशप्रेमी नि श्रद्धाळू लोकांची प्रेमाने दिलेली शिदोरी हाच त्याच धान्यसंग्रह, अशा प्रकारच्या सिद्धतेने, आधुनिक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असलेल्या साम्राज्यसत्तेच्या विपक्षाशी श्रीराम झगडत होता. हा विषम झगडा होता आणि तरीही हा धाडसी वीर आपल्या दैवी साहसाच्या नि निस्सीम प्रेमनिष्ठ असणाऱ्या अनुयायांच्या बळावर युद्धाचे डाव खेळत होता.

## ब्रिटिश सिंहाशी धडाका

अत्यंत कुशल सेनापती शत्रूला हानिकर नि स्वपक्षाला अनुकूल असे युद्ध क्षेत्र निवडील त्याचप्रमाणे या स्वराज्यसंपादनोत्सुक श्रीरामाने केले. त्याने ब्रिटिश सिंहाला सहा धडाका दिल्या नि प्रत्येक धडकेत ब्रिटिश सेना तुकडीला किंचाळावयास लावले. तिला धूळ चारली. त्या प्रांतातील सेनाबल पुरेसे होईना म्हणून मलबारहून सैनिक तुकड्या आणाव्या लागल्या. आणि आसामहूनही निवडक सैन्य आणावे लागले. पेडवसल गावाच्या चकमकीत इंग्लिश सैनिकांचे दोन युरोपियन अधिकारी ठार झाले नि इतर बरेच घायाळ झाले. शेवटच्या सातव्या नि आठव्या चकमकीत श्रीरामावर अचानक घाले घालून त्याला मोठ्या शर्थीने या आक्रमकांचे हातून लढत, झगडत निसटून जावे लागले आणि त्या एका शूर, धाडसी, सैन्यचालनाकुशल राष्ट्रप्रेमी तरुण संन्याशी वीराला या विषम झगड्यातून निराशेच्या अंधकारात विलुप्त व्हावे लागले. तरीही त्याच्या या स्वदेशप्रेमी स्वार्थत्यागाच्या दिव्य उदाहरणाने कोणाचे मनात सादर कौतुकाने प्रेमाश्रू उभे राहाणार नाहीत?

श्रीराम!! तुझ्या अंतःकरणाच्या कळकळीने आपल्या मायभूमीच्या उद्धारार्थ तू आपल्या सर्वस्वाची आहुती देत प्रयत्नांची पराकाष्ठा केलीस! तुझी तू शर्थ केलीस! इतकेच नव्हे तर तू आपल्या दिव्य स्वार्थत्यागाच्या दिप्तीमान उदाहरणाने आम्हा दुबळ्यांना हिणविलेस! श्रीराम!! तू देवाच्या मांडीवर कृतज्ञतेच्या कुरवाळण्याने सुखी होण्यापूर्वी आम्हा हिंदू जनांचे हाताने ही मायभूमी स्वतंत्र झालेली पाहाण्याचे समाधान तुला लाभो!! स्वतंत्र हिंदुस्थानातील भावी इतिहासकारांनी तुला विसरू नये. म्हणून, हे देशवीर श्रीराम तुझ्या पवित्र नि स्फूर्तिदायक स्मृतिचा हा धागा, या लेखनाने घट्ट वळून ठेवीत आहोत! तुझे नाव चिरस्मरणीय होवो!

श्रद्धानंद: २८ मे १९२९

* * *

## देशवीर विष्णू गणेश पिंगळे

तळेगावच्या शाळेस शंभर वर्षे झाली. मनुष्यास शंभर वर्षे झाली तर आपण १०० वर्षे भरली असे म्हणतो. कारण, मनुष्याचे सामान्य आयुष्य तरी आजवर शंभराच्यावर गेलेले नाही. परंतु संस्थांचे आयुष्य अनेक शतकांचे असू शकते. म्हणूनच संस्थेला शंभर वर्षे झाली म्हणजे ती गोष्ट आगामी निकट अंताची दुःखसुचक घटना होत नसून तिच्या भावी भरभराटीची आनंददायी हमीही होऊ शकते. आणि म्हणूनच आपण तो शतवार्षिक वाढदिवस अशा पूर्ण आनंदाने साजरा करतो. तळेगावच्या एका लहान शाळेच्या शतवार्षिक वाढदिवसाच्या लहानशा घटनेत आम्हा सर्वांनाच कौतुक वाटण्यासारखी पहिली गोष्ट म्हणजे ती शाळा १८२९ सनात उघडली गेली. इंग्रज-सत्तेतील अगदी पहिल्या अशा ज्या फार थोड्या नवीन परधर्माच्या संस्था अजून तग धरून आहेत. त्यात ही शाळाही गणली पाहिजे. परंतु नुसते दीर्घ काळ जगणे ही जरी कौतुकाची गोष्ट असली तरी ती तेवढ्यामुळे आदरणीय महत्वाची होऊ शकत नाही. काकोऽपि जीवती चिराय बलिंच भुङ्क्ते! पण तळेगावच्या शाळेविषयी अशा आदरणीय महत्वाचीही एक घटना संलग्न झालेली आहे आणि म्हणून तिची स्मृती आपण सर्वांनी बाळगली पाहिजे. ती घटना म्हणजे ही होय की, देशवीर विष्णू गणेश पिंगळे ह्या शाळेतील विद्यार्थी होते. पुढे ते विशीचे आतच महाराष्ट्रातील १९०९-१० च्या अभिनव भारतीय क्रांतिकारक वातावरणात वाढले, नंतर अमेरिकेत गेले. तेथे अभिनव भारताच्या इंग्लंडमधील शाखेच्या श्री. हरदयाळप्रभृती कार्यकर्त्यांनी काढलेल्या गदर (बंड) संस्थेत शिरले. ती वेळ सन १९१४ च्या जर्मन महायुद्धाची होती. या संधीचा लाभ घेऊन आपल्या स्वदेशास स्वतंत्र करण्यासाठी, यशस्वी नसला तरी, एक निकराचा प्रयत्न म्हणून तरी, एक उदाहरणीय प्रयोग म्हणून तरी, अमेरिकेतील क्रांतिकारकांच्या झुंडी जेव्हा चलो भाई! मातृभूमिको मुक्त करनेको चलो! अशा अक्षरशः गर्जना करीत बाष्पनौकात चढल्या तेव्हा त्या क्रांतिकारकांत देशवीर पिंगळे हेही स्वदेशास परत फिरले. जर्मन रणतरीतून शस्त्रास्त्रे हिंदुस्थानास पाठवून मागोमाग हे शेकडो क्रांतिकारक चीन, सिंगापूर, ब्रह्मदेश इत्यादी भागातील ब्रिटिश सैन्यातील भारतीय सैनिकांस भडकावित आणि बंडास चेतवीत हिंदुस्थानात घुसले. कोमागाटा मारू प्रकरणाप्रमाणे इंग्रज सैन्याशी बंदरावर उतरताच उघड लढाई देऊन मारत मरत आपली वाट काढून देशभर पसरले. काही गुप्तपणे बिनधोक प्रवेशू शकले, त्यात देशवीर पिंगळे होते. पंजाबमध्ये सैन्य बिथरवून अनेक इंग्रज अधिकाऱ्यांना मारून शस्त्रास्त्रार्थ लागणाऱ्या निधीसाठी दरवडे घालून, या लोकांनी मोठा धुमाकूळ मांडला. देशवीर पिंगळेही, त्यांचे बहुतेक साथीदार

पंजाबातील शूर शिखांतच असल्याने, तिकडेच त्या धुमाकुळीत गुंगून गेले. शेवटी लाहोरचा खटला झाला त्यात जे क्रांतिकारक सापडले. त्या सर्वांत वयाने अगदी तरुण आणि साहसाने अगदी अग्रगण्य असे दोन क्रांतिकारक होते. एक करतारसिंग आणि दुसरे पिंगळे! त्यांनी आपण क्रांतिकारक असल्याचे स्वतःच सांगितले. ब्रिटिशांची सत्ता आणि न्यायालये यांचा अधिकारच त्यांनी नाकारला आणि अक्षरशः हसत हसत ते फासावर चढले. त्यास पाहिलेले सरकारी अधिकारीही त्यांचे नाव निघताच माना डोलावतात. असा हा देशवीर-- A real hero पंचविशीच्या आत स्वदेशस्वातंत्र्यार्थ फासावर चढला! केवढी दुर्दैवाची गोष्ट की, त्याचे नावही सुशिक्षित महाराष्ट्रात हजारात एकास माहित नाही!

इतिहाससंशोधक राजवाडे यांचे तर काय, पण अगदी अलिकडील प्रो. पोतदार-आपट्यांपर्यंतच्या मंडळीची नावे ज्यांच्या तोंडी आहेत- त्यांच्या कार्याचा गौरव होत आहे, तो ठीकच आहे; पण इतिहासाचे केवळ संशोधन करणाऱ्यांचा होतो तितका तरी गौरव इतिहास घडवून आणणाऱ्या या देशवीरांचा व्हावयास नको काय? शिवाजीच्या काळचा इतिहास अशाच अनेक धाडसी तरुणांनी आणि देशवीरांनी उत्पन्न केला नाही काय? आणि आजच्या इतिहासाची घडण करण्यात, या देशासाठी होणाऱ्या प्राणदानाच्या, मारीत मारीत मरणाऱ्या देशवीरत्वाच्या भट्टीतील अग्निही एक जाज्ज्वल्य घटक होत आहे हे कोणास नाकारता येणार आहे काय? तसे असते तर रौलॅट रिपोर्ट प्रसिद्ध करण्याची आवश्यकता स्वतः इंग्रजांनाही भासती ना!

आमच्या शिवकालीन किंवा परकीय आयर्लंड, इटली प्रभृति देशांच्या अतिसाहात ज्या ज्या वीरांनी या पिंगळे, कान्हेरे, करतारसिंग, कन्हय्या अत्यादिकांसारखीच किंवा काही उदाहरणात त्यांच्याहून कमी स्वार्थनिरपेक्ष देशभक्ती दाखविली आणि स्वातंत्र्यार्थ झुंज घेतली, त्यांचे वर्णनाने आणि स्तुतीने महाराष्ट्र-वाङ्मय नुसते फुरफुरून जाते. पण तशीच साहसी कृत्ये करणाऱ्या प्रस्तुतच्या कोण्या देशवीराचे किंवा सशस्त्र क्रांतिकारकाचे नाव काढताच ते भीतीने थरथरू लागते. त्यांना अहो जाहो सुद्धा कोणी करीत नाही. अरे जारे म्हणतात!

पण आमच्या शिवकालीन आणि राजारामीय पिढीत जे काही देशभक्त जहागिरी-इनामावरच झुंजत, त्यांच्याही देशभक्तीचा यथार्थ गौरव आणि योग्य कौतुक करणारे हे आजकालचे शिष्ट लेखक आणि वाचिवीर यांच्या पिढीत जे देशस्वातंत्र्यार्थ झुंजताना फाशीवाचून दुसऱ्या इतर कोणत्याही जहागिरीचे आमिष डोळ्यापुढे धरीत

नाहीत, अशा जाज्ज्वल्य देशवीरांनाही देशवीर म्हणावयास सिद्ध नसतात. त्यांच्यावर एक अक्षरही लिहिणे म्हणजे असभ्यपणा होय असे समजतात. हा त्या इंडियन पिनल कोडाचा प्रभाव आहे. जर कोडात शिवाजी, बाजी, तानाजी यांचीही स्मृती करणे दंड्य अपराध गणला जाता तर या शिवकालीन कालालाही यांच्या भीतीच्या काळोखातच तोंड खुपसून राहावे लागते आणि मराठी वाङ्मयात तशीच एकेरी उल्लेखिलेली संभावना होती की, जशी त्या वासुदेव बळवंतांची होते! त्या जाज्ज्वल्य देशवीराचे एक चरित्र अलीकडेच प्रसिद्ध झाले आहे तेच पाहा! त्यात न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांना कित्येक ठिकाणी सन्मानार्थ बहुवचनी उल्लेखिले आहे. सार्वजनिक काकांनाही अहो जाहो म्हटले आहे, ते ठीकच आहे, तेही देशभक्त आणि त्यागी देशसेवकच होते; पण वासुदेव बळवंत फडक्यांना त्या प्रत्यक्ष त्यांच्या चरित्रातच येथून तेथून एकेरी अरे-तुरेने संबोधले आहे. देशभक्तीत नि देशसेवेसाठी केलेल्या त्यागात फडके त्यांच्या पिढीत इतके कमी प्रतीचे ठरले! कारण त्यांनी देशहितार्थ आयुष्याच्या संध्याकाळी शिळोप्याची वेळ किंवा पगाराच्या एकलक्षांश तेवढाच त्याग करण्याचा सभ्यपणा न करता आयुष्याचे आयुष्य आणि सर्वस्वचे सर्वस्व त्या देशासाठी त्यागाचे वेदीवर बळी देण्याचा हलकटपणा केला, म्हणून त्यांना दीडदमडीच्या खर्डेघाशांनी देखील अरे तुरे करावी!! वासुदेव बळवंतांचे साहस अयशस्वी ठरले, पण यश हेच जर अहोजाहोचे एकमात्र गमक असेल तर मात्र माझे काहीच म्हणणे नाही. शिवाजी महाराजांचे तरी काय? अफजुल-खानाच्या कैचीत ते सापडले तिथे म्हणजे केवळ योगायोग होता, जर का त्या पकडीत महाराजच मरते तर ह्याच जात्यावरच्या ओव्या गाणाऱ्या बाया त्या सगळ्या डावाला मूर्खपणाची पराकाष्ठा म्हणत्या-म्हणल्या, आपण होऊन गाढवासारखा अफझुल्ल्याच्या तंबूत गेला! तीच गोष्ट शाहिस्त्याच्या बंगल्यातील, दिल्लीच्या पेटाऱ्यातील! जर घडले त्याच्या उलट घडते तर हेच शिवकालीन आजचे भाट, केवळ यशाचे भोपे, शिवाजी-तानाजींनाही माथेफिरू, अत्याचारी, पोरकट, अदूरदृष्टी म्हणून भुंकत सुटते! कारण यांना पराक्रमाची पारख नाही. ते केवळ यशाचे मिंधे आहेत. त्यांना हेतूची आणि त्यागाची आणि उत्कटतेची ओळख नाही. हे केवळ जिकडे घुगऱ्या तिकडे उदो उदो करणार आहेत; नाही तर शिवकालीन किंवा परदेशातील प्रस्तुत काळच्या वैयक्तिक पराक्रमाच्या तोडीस तोड देणारे पराक्रम आणि तेही क्वचित् एक रती अधिकच निर्भेळ अशा जाज्ज्वल्य देशभक्तीने उत्स्फूर्त झालेले- यांच्या ह्या स्वतःच्या पिढीत यांच्या डोळ्यासमोर घडत असताना यांना असले देशवीरत्व, ते अजून अयशस्वी होत आहे, म्हणूनच काय ते हायकोर्ट- जज्जपणापेक्षा किंवा वकीलपणापेक्षा सापेक्षतः असभ्य आणि हलकटपणाचे वाटते ना! दुलर्क्षार्ह भासते ना! आणि तेच गुण केवळ

यशस्वी झाले म्हणून शिवकालीन पढीत वर्णनीय ठरले ना! यश! ह्यांना एक सैनिक पडला न पडला की, लढाई जिंकली गेली पाहिजे! बीज टाकले की त्याचा आंबा होऊन, पाडास लागून- अगदी अढीत पिकून यांच्या ओठाशी आला पाहिजे. नाहीतर ते बीज व्यर्थ गेले, तो सैनिक माथेफिरूसारखा व्यर्थ मेला!

स्वकालीन देशवीरांविषयीच्या ह्या भित्र्या अनास्थेचे ढोंगी समर्थन कुणी असेही करतील, की आजच्या क्रांतिकारकांची चरित्रे लिहिली, त्यांच्या हेतुची का होईना, पण स्तुती केली तर इतर तरुण मंडळीही त्यांचा क्रांतिकारक मार्ग चोखाळू लागतील आणि त्यायोगे स्वदेशावर मोठे अरिष्ट कोसळेल. हिंदुस्थानच्या सध्याच्या विमल कीर्तीला मोठा कलंक लागेल! पण मग हीच गोष्ट शिवकालीन क्रांतिकारकांच्या नावावर रचलेल्या ज्या पैशापासरी कादंबऱ्या, नाटके, पोवाडे आणि रडगाणी, सूड! सूड!! सूड!!! म्हणून उसन्या नाटकी अवसानाने भरमसाट बरळत सुटत आहेत त्यांना नाही का लागू पडत? अफजुलखानाचा पोवाडा ऐकताच जसे कोणी लगेच लोहाराचे दुकानातून वाघनखे घडवून घेण्यासाठी घुसतोच असे नाही, किंवा दिसेल त्या मुसलमानास शाहिस्तेखान म्हणून त्याची बोटे कापण्यास धावतोच असे नाही, तसेच पिंगळे, चाफेकर, अमरसिंह, कान्हेरे इत्यादींची चरित्रे वाचताना प्रत्येक जण बॉम्ब करू धावलाच पाहिजे असेही नाही. निदान हिंदुस्थानातील या 'नैष्कर्म्यसिद्धि परमां' प्राप्त झालेल्या जीवन्मृत पिढीत तसा अघोर संभव कल्पिणे म्हणजे त्या पिढीचा घोर अपमान करणे होय. न्यायमूर्ती रानडे किंवा नामदार गोखले यांचे मार्ग ज्यांस पसंत नाहीत, तेही त्यांस महान् देशभक्त समजून अहो जाहो लिहितातच, की नाही? मग त्या बिचाऱ्या वासुदेव बळवंत, कान्हेरे, चाफेकरांनाच, त्यांच्या मार्गाविषयी मतभेद असला तरीही, अगदी अरे तुरे म्हणून धिक्कारलेच पाहिजे, असे का? निदान शिवकालीन लेखकांच्या विणीस तरी ते शोभत नाही. नाहीतर, दिल्ली-विजापूर सरकारच्या दरबारातील एखाद्या धर्मनिष्ठ न्यायाधीशाची किंवा त्यांच्या दरबारातील एखाद्या जयसिंगासारख्या नामदाराची स्तुती तरी त्यांनी बाजी, येसाजी, तानाजीसारख्या बंडखोर पोरांहून अधिक करीत जावे. म्हणजे त्यांचे वर्तन निदान विसंगत तरी दिसणार नाही.

विसंगतपणाचा दंड देशवीर पिंगळे यांच्या स्मृतीला जरी आजवर भोगावा लागला तरी तळेगावच्या शाळेच्या शतवार्षिक समारंभाच्या निमित्ताने त्यांची आठवण महाराष्ट्रास किंचित् का होईना पण झाली हेच त्या उत्सवाचे आम्ही एक मोठे महत्व समजतो. उदाहरणार्थ, या उत्सवप्रित्यर्थ, केसरीत काही दिवसांपूर्वी एक सुरेख लेख

आला होता. त्यात शाळेतील संस्मरणीय विद्यार्थ्यांत पिंगळ्यांचा उल्लेख आला होता, इतकेच नव्हे तर माथेफिरू, अत्याचारी, आततायी, वेडगळ इत्यादी शेलक्या पदव्यांनी आजवर अशा क्रांतिकारकांस संबोधण्याचा केसरीप्रभृति वृत्तपत्रांचा आजवरचा जो प्रघात होता, तो न अनुसरता त्या देशवीरांच्या योग्यतेस निदान कमीपणा तरी येणार नाही अशा गौरवपर भाषेत त्यांचा आणि त्यांच्या कार्याचा संदर्भ सूचित केलेला होता, ही गोष्ट महाराष्ट्राच्या त्या मुखपत्राला उजाळा देणारी झाली यात शंका नाही.

देशवीर पिंगळे यांजविषयी केसरीकार म्हणतात की, त्यांनी परदेशातून परत येऊन राज्यक्रांती करण्याच्या हेतूने यथाशक्ती उद्योग करून त्यात आपल्या प्राणांची आहुती देऊन देशाभिमाना-प्रित्यर्थ स्वार्थत्यागाची कड पोचविली! असा विद्यार्थी ज्या तळेगावच्या शाळेत उत्पन्न झाला तिच्यासारख्या शाळा काढण्यात इंग्रजांचा एक प्रमुख पण अप्रकट असा हा हेतू होता की, त्यातील शिक्षणामुळे हिंदू लोकांची हिंदु धर्मावरील निष्ठा नष्ट होऊन ते आपोआपच ख्रिश्चन धर्माकडे झुकतील. त्या हेतूविषयी एल्फिस्टनसाहेबांचे जे उद्गार केसरीकारांनी प्रसिद्ध केले आहेत ते आजही महत्वाचे वाटतातच; पण वीस वर्षापूर्वी अत्यंत महत्वाचे वाटले असते, कारण, त्या वेळी अगदी जहालातील जहाल देशभक्तही इंग्रजांनी शिक्षण दिले ते मात्र आपल्यावर परम उपकार केले, म्हणून मानीत असत. रेल्वे, तारा, शांतता आणि शिक्षण हे इंग्लिश राज्याचे बुद्धिपुरस्सर केलेले उपकार आहेत आणि त्याविषयी आपण त्यांचे कृतज्ञच राहिले पाहिजे अशी सर्वांची ठाम समजूत होती. पुढे हळूहळू त्यातील इतर गोष्टी उप्रकाराच्या टिपणीतून गळाल्या; पण इंग्रजी शिक्षण काही गळेना. महाराष्ट्रात हे नवीन शिक्षण चालू करणाऱ्या कारखान्यातील प्रमुख माउंट स्टुअर्ट एल्फिस्टन यांचे उद्गार केसरीने जे दिले आहेत ते या प्रश्नाचा निकाल लावतातच. साहेब म्हणतात, I am convinced that the conversion of the Native must infallibly result from the diffusion of knowledge among them! परंतु या विषयी इंग्रजी पद्धतीच्या शिक्षणाचा जो मुख्य पुरस्कर्ता मेकॉले तो काय म्हणतो हेही लोकांच्या ध्यानात असणे फार महत्वाचे आहे. कारण मेकॉलेच्याच यत्नांनी महाराष्ट्रातच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानभर ही शिक्षणपद्धती चालू झाली. पालर्मेंटातील भाषणातून मेकॉलेनी ह्या गुप्त हेतूचा पत्ता लागू दिला नाही. तेथे त्यांनी केलेली ती प्रसिद्ध घोषणा की, ह्या शिक्षणापायी जागृत होऊन ज्या दिवशी भारत आपले जूं फेकून देईल, तो दिवस इंग्लंडच्या इतिहासात सुवर्णक्षरांनी मुद्रित होईल. हिलाच आपले बहुतेक पुढारी शिक्षणात इंग्रजांचा, निदान मेकॉले महाशयांचा तरी, एकमेव

आणि म्हणूनच उदात्ततर हेतू समजत. म्हणूनच इंग्रजी शिक्षणाच्या प्रभावाने झालेली राष्ट्रीय जागृती अनुभवणारे बहुतेक देशभक्त मनःपूर्वक इंग्रजांस उद्धरकर्ते मानीत.

इतरांची गोष्ट राहोच, पण जहालातील जे पंडित शामजी कृष्णवर्मा ते देखील हा इंग्रजांचा हेतुपूर्वक उपकारच मानीत आणि मेकॉले यांची पालर्मेंटीय भाषणे पुरावे म्हणून पुढे मांडीत. दे. भ. सावरकर जेव्हा प्रथम इंग्लंडमध्ये गेले. तेव्हा त्यास पंडितजींच्या या उपकराच्या आभासास हटविण्यासाठी सरासरी दोन महिने वादविवाद करावा लागला. दे. भ. सावरकरांनी कॉलेजमध्ये असताना मेकॉलेची पत्रे वाचिली. त्यात त्यांस मेकॉलेचे त्याच्या जावयास धाडलेले अंतःस्थ पत्र उपलब्ध झाले. त्यात मेकॉले स्पष्टपणे म्हणतात की, माझी निश्चिती आहे की, मी चालू केलेल्या शिक्षणपद्धतीप्रमाणे शिक्षित झालेले Hindoos, हे हिंदू बाबू लोक, हिंदूच्या वेडगळ धर्मापासून च्युत होऊन ख्रिश्चनिटीचा अवलंब आपण होऊन करू लागतील! हा इष्ट परिणाम तुम्हा आम्हासमोर घडूही लागला आहे. ह्या पत्रावरून मेकॉलेच्या पोटातील हेतू एल्फिस्टनच्या हेतूप्रमाणेच होता हे स्पष्ट होते. ब्रिटिशांचे उपक्रम ह्या उपरोधिक नावाची अनेक व्याख्याने दे. भ. सावरकरांनी सार्वजनिक सभांतून त्या वेळी दिली होती. त्यात त्यांनी हे पत्र महाराष्ट्रात प्रथमच उघडकीस आणले आणि नंतर इंग्लंडमध्ये त्याच अर्थाच्या Are we obliged to the British rule? या व्याख्यानातून ते तेथी हिंदी लोकांस परिचित केले. नंतर ते सत्वावन सालचे स्वातंत्र्ययुद्ध या पुस्तकात प्रथमतः प्रकाशित होऊन सर्वत्र प्रसिद्धी पावले.

ह्या मेकॉलेच्या पत्राविषयी एक स्मरणीय गोष्ट विषयानुरोधानेच सांगण्यासारखी आहे की, प्रसिद्ध अभिनव भारतीय क्रांतिकारक पुढारी अय्यर हे सावरकरांच्या Are we obliged to the British rule? या नवीन व्याख्यानास ऐकूनच क्रांतिकारक बनले आणि अभिनव भारतात शिरले, असे ते स्वतः सांगत असत. निदान हिंदी लोकांना पाश्चात्य शिक्षण दिले हा तरी ब्रिटिशांचा मोठा उपकार असल्याने त्यांच्याशी आपण कृतज्ञ म्हणजेच साम्राज्यनिष्ठ असले पाहिजे. अशी त्यांची त्या काळाप्रमाणे प्रामाणिक समजूत होती. सावरकरांनी व्याख्यानात रेल्वे इत्यादी प्रकरणी जो इंग्रजांचा आपलपोटेपणा होता तोच शिक्षणाचे बुडाशी होता हे सिद्ध करताना अनेक पुरावे दिले; त्यात मेकॉलेचे हे पत्रही होते. ते सारे पुरावे वाचून सावरकर म्हणत, नव्या पाश्चात्य शिक्षणापासून आमचा पुष्कळ लाभही झाला हे खरे! पण ते तो देणाराचा उपकार म्हणून नव्हे तर अपकार म्हणून. शत्रू तरवार घेऊन मला

मारावयास आला; योगायोगाने त्याचे हातून ती तरवार निसटली आणि माझ्या उपयोगी पडली! आता तिचाच वार मी त्यावर करू लागताच तो म्हणतो ही तरवार मी तुला दिली, माझे उपकार मान नि मला सोड! त्याला जे उत्तर तेच इंग्रजी शिक्षणाने आम्हांस झालेल्या लाभांस उपकार माना म्हणणाऱ्या इंग्रजांसही दिले पाहिजे की, उपकार देवाचे, योगायोगाचे! तू अपकार म्हणूनच हे कार्य हाती घेतलेस! ही विचारपरंपरा एकून श्री. अय्यर यांच्या मनावरील आंग्लनिष्ठेचे भ्रमपटल निरस्त झाले आणि क्रांतकारक विचारांची बीजे त्यात झपाट्याने रुजू लागली.

तळेगावच्या शाळेच्या चालकांना आमची अशी सूचना आहे की, त्यांनी त्या शाळेत देशवीर पिंगळे ह्यांच्या नावाचा एक पितळी स्मृतिफलक लावावा किंवा त्यांचे तैलचित्र तीत ठेवावे. पिंगळे याचेच नव्हे तर महाराष्ट्रात सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धानंतर झालेल्या देशवीरांच्या-जे जे देशासाठी प्राणत्याग करते झाले त्यांच्या-सर्वांच्या जन्मग्रामी किंवा शाळेत किंवा वसतिगृहात कुठे तरी असा एक छानदार आणि ठळक असा स्मृतिफलक लाविला जावा. वासुदेव बळवंत आणि कामास आलेले त्यांचे इतर साथीदार-चाफेकर बंधू, रानडे, कान्हेरे, कर्वे, देशपांडे, पिंगळे इत्यादींची तैलचित्रे, सन्मानपूर्वक, त्यांच्याशी संलग्न झालेल्या निश्चित स्थानांचा पत्ता काढून, प्रकटपणे लावण्यात यावी आणि या सर्वांची चरित्रे परिश्रमपूर्वक माहिती मिळवून ऐतिहासिक प्रमाणांच्या कसोटीने लिहिली जावी. बंगालमधील क्रांतिकारक देशवीरांची चरित्रेच प्रसिद्ध होतात असे नसून जतींद्रनाथ मुकर्जींसारख्या सशस्त्र क्रांतिकारक देशवीरांचे स्मृतिदिन बंगालभर पाळण्यात येतात. मुकर्जी अंक, मुकर्जी दिन, मुकर्जी सप्ताह असा प्रांतभर उत्सव मानण्यात येतो. कारण, त्यांचे मार्ग इतराहून भिन्न असले तरीही ते देशास्तव झुंजत पडले. पंजाबात मोठ्या समारंभाने हुतात्मा धिंगराचे तैलचित्राचे गेल्या महिन्यातच उद्घाटन करण्यात आले; मग महाराष्ट्रासच भयाची आणि संकटाची एवढी हुडहुडी का भरावी? इंग्रज सरकारच्या दृष्टीनेही यात काही वावगे नाही. कारण, पूर्वी फाशी गेलेल्या राजद्रोह्यांची शिरे वेशीवर लटकाविणे हाही सत्ताधीश दंडच समजत. कारण, त्यायोगे इतर तरुणांस अशा चळवळीच्या भयंकर परिणामाची कल्पना येऊन त्यास उलटा धाक बसावा. आता शिरे नाहीत तर निदान त्यांची चित्रे आणि नावे जरी वेशीवर लटकली, तरी लोकांवर तोच परिणाम होणार आणि इंग्रजाविरुद्ध सशस्त्र बंड केले, तर असा भयंकर प्राणदंड द्यावा लागतो. अशी इतरास धडकी भरेल. त्यायोगे उगीच गंमत म्हणून राज्यक्रांतीतील स्वातंत्र्य मरा, मारा, सूड इत्यादी शब्दांनी भरलेली वायफळ बडबडीची करमणूक करण्याचे व्यसन लागलेल्या अनेक निःशस्त्रसंप्रदायी

वाचिवीरांस त्या व्यसनाचा चटकाही कसा असतो याची कल्पना येऊन ते त्या आगीशी खेळेनासे होतील आणि ज्यांना तो चटकाच चटका लावून सोडील असा कोणी निपजणे, शिवाजी न जन्मलेल्या प्रांतात शक्य असो वा नसो, पण या शिवाजीच्या महाराष्ट्रात शक्यच नाही. कारण एका शिवाजीने त्याचे पोट भरून फुगून गेले आहे.

श्रद्धानंद: २८ सप्टेंबर १९२९

* * *

## स्वातंत्र्य कवि गोविंद

नाशिकचे प्रसिद्ध स्वातंत्र्य कवि गोविंद यांस निवर्तून ५ वर्षे होऊन गेली. तथापि त्यांच्या कवितेचा आदर महाराष्ट्रात दिवसानुंदिवस अधिकाधिक वाढतच चाललेला आहे. इतकी थोडी कविता लिहून इतकी मोठी प्रसिद्धी आणि इतक्या थोड्या शब्दांचे भांडवलावर इतकी चिरंतन कीर्ती संपादण्याचे भाग्य फारच थोड्या कवींच्या वाट्यास आले असेल.

या आश्चर्यकारक घटनेचे विश्लेषण करू लागले असता जी महत्वाची तीन चार कारणे दृग्गोचर होतात तीही अर्थपूर्णच असल्यामुळे त्यांचा सूत्रमय उल्लेख प्रारंभीच करण्यासारखा आहे.

गोविंदांच्या कवितेविषयी महाराष्ट्रीयच काय पण ज्या ज्या परप्रांतीय सहृदय भारतीयांचे कानी ती कविता पडली किंवा पडते त्या त्या भारतीयांसही चटका लागून रहात आला आणि लागून रहातो याचे एक प्रमुख कारण अर्थातच त्या कवितेचे मूळ स्वाभाविक सौंदर्य आणि अंगचे अमोल गुण हे होय. शकुंतलेच्या पोटी भारतीय प्रथम सम्राट भरत जरी आले नसते, दुष्यंतासारख्यांनी जरी तिचे पाणीग्रहण केले नसते, महाभारतासारख्या राष्ट्रीय इतिहासाची आनुषंगिकता जरी तिला लाभली नसती आणि कालिदासाच्या हातून ज्या अत्युत्कृष्ट सुवर्ण संस्करणांत तिच्या सौंदर्याच्या कवितेची दुसरी अमर आवृत्ती प्रसिद्ध झाली तशी झाली नसती तरीही त्या शकुंतलेची रूपगीती मूळच्या वल्कली बांधणीत देखील ज्याच्या ज्याच्या दृष्टीस पडती त्यास मोहून "अयमधिक मनोज्ञा वल्कलीनाचि तन्वी" असे म्हणावयास लावती.

गोविंदांच्या कवितेच्या अंगच्या अनमोल गुणास अधिकच आकर्षक करणारे दुसरे कारण म्हटले म्हणजे तिचा समयज्ञ संदेश होय. त्या वेळी राष्ट्राच्या मनास जी एक महान आकांक्षा झुरणी लावीत होती, जे एक भय, जी एक उत्कट प्रतिक्षा, जो धुमसता राग, जो आकसबाज निरुपाय, आणि जी विफल तरीही अदम्य आशा त्या राष्ट्रीय मनांत खळबळ उडवून देत होती त्या सर्वांचा निमूढ नि अव्यक्त हेतू गोविंदकविची वाणी सर्वाधी व्यक्त करती झाली. मोठे मोठे लोकधुरंधर देखील ज्याविषयी म्हणत "वदवे न आम्हा जे वाचे जे घरी नाचे मनात सकलांचे" त्या

मंगल विधानाच्या रहस्याचा दिव्य उच्चार गोविंदकविच्या वाणीने केला आणि तोही अगदी जेव्हां त्या ऐकण्यासाठी कळत न कळत शेकडो आत्मे तळमळत होते तेव्हा! तसल्या कविता स्वातंत्र्य, शस्त्र, अस्त्र इत्यादी शब्दावडंबरांनी फुगवून आजही आपणही कित्येकजण करतो. पण आज त्यास केवळ त्यामुळे काही वैशिष्ट्य येत नाही. पण गोविंदाचे काळी तो एकेक शब्द एकेका मंत्रासारखा, एकेका शास्त्रीय शोधासारखा, अद्भुत, अघोर आणि तरीही आकर्षक झाला. कारण तो इतर कोणीही सांगू शकत नव्हता. जे इतर सर्व सांगत होते ते ऐकण्यास त्या सांगणाऱ्यासुद्धा सर्वांना कंटाळा आला होता. इतक्यात त्या तळमळणाऱ्या राष्ट्रीय आत्म्याची स्फूर्ति गोविंदांच्या वाणीतून अकस्मात एखाद्या आकाशवाणीसारखी गर्जून उठली "देवा घे हाती तलवार, रे हो संगरा तयार" आणि ती ऐकताच ते ऐकणारे श्रोते भयाने थरकापत पण अनावर औत्सुक्याने ठाईचे ठाई थांबत. लोकांचे थवे जसे अकस्मात झालेल्या आकाशवाणीस ऐकितात तसा सारा महाराष्ट्राच्या महाराष्ट्र राष्ट्रीय कवितेच्या त्या नव्या अवताराची ती तेजस्वी ललकार ऐकताच मंत्रमुग्ध होऊन गेला. कोणी त्या गर्जनेस उत्स्फूर्त म्हटले कोणी उत्भ्रांत! पण आपल्या ज्या भावना व्यक्त होण्यासाठी हृदयात कालवाकालव करून सोडीत होत्या त्याचेच हे पडसाद आहेत हे चटकन ओळखून गेला प्रत्येकजण. कारण विपक्षीय सत्तादेखील जे "कोणी बोलेल की काय" अशी सभय प्रतीक्षा करीत होती तेच ते बोल आहेत म्हणून तत्काल समजली, चमकली आणि त्या टीचटीचभर पदास एखाद्या भैरवी-मंत्रासारखे भीषण लेखून जप्त करती झाली. गोविंदांच्या कवितेचे किंवा तिने हा जो महान प्रासंगिक संदेश दिला, राष्ट्रीय-आत्म्याच्या तळमळीस जी अकस्मात वाचा फोडली, काही तरी हवे आहे अशा गोंधळलेल्या राष्ट्रीय मनात काय हवे ते पटकन अगदी रणशृंगाच्या खणखणाटासारख्या चार दणदणीत ललकाऱ्यांत सांगून टाकले. त्यांचे खंडन किंवा मंडन करण्याचा हा प्रसंग नसून जे झाले, जे घडले त्याची कारणमीमांसा कोणची याचेच काय ते येथे दिग्दर्शन करणे आहे.

ते दिग्दर्शन करताना हेही सांगणे अपरिहार्यच आहे की गोविंदाच्या कवितेस जे राष्ट्रीय महत्व प्राप्त झाले, त्याचे तिसरे आणि वरील दोन्ही कारणांहून एका अर्थी अधिक महत्वाचे कारण म्हटले म्हणजे त्या कवितेच्या पारदर्शक प्रतिमेतून ज्याचे प्रखर तेज झळाळत होते ते "अभिनव भारत" होय. रणशृंगांचे निनाद स्वभावतःच उत्क्षोभक असतात. त्यातही रणांगणात अगदी वेळेवर एखाद्या साध्या शिंगाड्याने जरी ते फुंकले तरी ते त्या प्रासंगिक उचिततेने अधिकच उत्क्षोभक आणि उद्दीपक होते. परंतु जर ते स्वतः सेनापतीनेच प्रलयंकर उत्साहाने वाजविले तर त्याचे ते

निनाद उभी सैन्येच्या सैन्ये मृत्युच्याही दाढेस उपटण्यास संबंद्ध करून टाकतात. गोविंदाची प्रतिभा एकतूर्य होती. पण त्या तूर्यातून जे राष्ट्राचे रक्त उचंबळून सोडणारे स्वातंत्र्यनिनाद निघाले ते मात्र अभिनव भारताच्या वादळी फुंकराचे केवळ प्रतिनिधि होते.

अभिनव भारताचे गोविंद हे मुख्य वाद्य नसते, तर त्याचे ते गीत क्वचित नुसत्या उपेक्षेच्या कसरीने देखील थोडक्याच कालात नष्टप्राय केले असते. तथापि कालगतीच्या उपेक्षेची कसर तर काय पण इंग्लिश सत्तेच्या जप्तीची कृत्यादेखील त्यास गिळंकृत करू शकली नाही. कारण जेथे जेथे अभिनव भारताचा सभासद होता तेथे तेथे, कैंब्रीजपासून तो कोकणपर्यंत, गोविंद गीताचे गुप्त पाठ करण्यात एक एक पुजारी गुंग होता. त्या त्या घरातील स्त्रिया, वृद्ध, मुले, त्यांच्या कक्षेतील स्त्रिया, वृद्ध आणि मुले अशा परंपरेने महाराष्ट्रभर आणि महाराष्ट्राबाहेर "कोठे काळा काळा राम रे करितो बंड गुलाम, ऐका ऐका दिलदार आपण मौज एक मजेदार" ही पदे गुणगुणली जाता हृदया हृदयातून "रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले" हा प्रश्न गर्जत राहिला- रहात आहे. तो शब्द अभिनव भारताचा अधिकृत निनाद नसता, जर ती गाणी कोण्या एकलकोंड्या किंवा एकांड्या कवीची तान किंवा तळमळ असती तर त्यास हे इतके महत्व, न त्याचे स्वपक्षीय मित्र देते, न विपक्षीय शत्रू.

परंतु गोविंदाच्या कवितेचे खरे भाग्य याहूनही एकाअधिक आश्चर्यकारक योगायोगात प्रकट झाले. ती कविता त्यातील तेजस्वी संदेश कृतीत आणून दाखविणाऱ्या वीरात्म्याच्या हाती पडली किंबहुना ती त्यांच्यासाठीच रचली गेली. ती कृतीची कविता होती. बालिश बहुबायकांत बडबडणाऱ्या बैठकीतच काय ती गाईली गेली नाही तर त्या गीतांतील सत्याचे प्रयोग प्रत्यक्ष रणकृतीत संपन्न करून दाखविणाऱ्यांच्या हातातून ती आचरली गेली. बंदीशाळेतील एकलकोंडीच्या अकलकोडीतल्या अंधेराच्या निबिडतेत, फाशीच्या दोलावरील आंदोलनात, रक्तप्रातांत, हातघाईत, प्राणांच्या बलिदानांत त्या कवितेतील चरणा चरणांचे भयंकर रूपांतर होत असताही, तीतील अर्थ अधोर मूर्तिमत्व पावत असतांही, तीतील तिचा त्याग न करणाऱ्या वीरांनी तिला चरितार्थ केली. भवानी तलवार इतर कोणाही शूराचे हाती आपले तेज प्रकट करतीलच, पण ती शिवाजीच्या हातीच पडल्याने इतिहासात तिचे नाव राहून गेले. गाद्यागिरद्यावर लोळतांना कारागृहाचे भय काय त्याला (म्हणजे दुसऱ्या कोणाला) हे पद कोणीही म्हणेल, पण अभिनव भारतीय वीरात्म्यांच्या आणि हुतात्म्यांच्या कंठातून फाशीच्या दोरांवर आणि शृखलांच्या तालावर जेव्हा-

भूमंगलाल भगवान् नयाला,
संस्थापिप्याला शुभ रम्य काला,
धीरेंद्र धैर्ये जगि जो निघाला,
कारागृहाचे भय काय त्याला.
हे आव्हान दिले गेले आणि:-
कंस कंदना रघुनंदना समान मज साचे
वेड लागले स्वातंत्र्याचे दास्य मोचनाचे

ही करुण क्रूर चरणे गात गात फाशीच्या स्थंडिलाच्या पायऱ्या चढल्या जाऊ लागल्या. तेव्हा ती गोविंदांची कविता न राहता ती हुतात्मतेच्या वीर निश्वासितांचे थोरपण पावली. ती कविता न राहता भविष्यवाणी झाली. ती केवळ कल्पनाच न रहाता चरितार्थता पावली. गोविंदांच्या प्रतिभेच्या ध्वनी लेखांतील (फोनोग्राफमधील) सिंह गर्जना प्रत्यक्ष सिंहगर्जना झाली, गोविदाची कविता मूळचीच समिधा होती आणि विरात्म्यानी पेटविलेल्या यज्ञाग्नीत पडल्यामुळे तर ती प्रत्यक्ष अग्निच झाली. तीतील शब्दनशब्द आधी करून मग सांगणाऱ्या वीर कंठातून गर्जून उठले की-

धर्मार्थ देह वदलो, ठरले नितांत,
ते बोल फोल नच, बालिश बायकांत
विश्वाचिया अखिल मंगल कारणार्थ
हा स्वार्थ जाळुनि आम्ही ठरलो कृतार्थ

गोविंदाच्या कवितेस महाराष्ट्र वाङ्मयांत विशिष्ट महत्व प्राप्त झाले त्याची ही वरील कारणे प्रमुख होत. तरीही पाचवी एक गोष्टही तिच्या विषयीचे कौतुक आणि मनोवेधकपणा वाढविण्यास कारणीभूत होणारी आहे. ती पाचवी गोष्ट म्हणजे त्या कवीची स्वतःचीच गोष्ट होय. ज्या अत्यंत करुणाजनक स्थितीतून त्यांच्या प्रतिभेचा उगम झाला आणि ज्या पंगू पायांनी गोविंद ह्या कीर्तीशिखरावर चढला त्याच्याकडे लक्ष जाताच त्या कवितेचे कौतुक करावे तितके थोडेच वाटू लागते, हा नाशिकच्या तिळभांडेश्वराच्या आळीतील एका भांडी घासणाऱ्या मोलकरणीचा पंगू मुलगा, हा “पांगळा” स्वातंत्र्य कवी गोविंद म्हणून गाजावा. गोविंद जर एखादा पंत असता तर “पंतांची कविता” म्हणून ती इतकी कौतुकास्पद न वाटती की जितकी ती “पांगळ्याची कविता” म्हणून आज वाटत आहे.

गोविंद कवीच्या कवितेविषयी महाराष्ट्रास एक जे कारूण कौतुक वाटते ते त्या कवीच्या ह्या वैयक्तिक चरित्राचाही असा अंशिक परिणाम असल्याने तिच्याविषयीच्या चर्चेतल्या चरित्राचेही ज्ञान विशेषेकरुन अवश्य आहे. यास्तवच त्या स्वातंत्र्य कवीच्या वर्षश्राद्धाच्या निमित्ताने त्याची समग्र नसली तरी यथासाध्य ती ती कविता तरी ज्या एक संकलित आवृतीत छापण्याचा निश्चय स्मारक मंडळाने केलेला आहे, त्या आवृत्तीच्या प्रारंभी त्या कवीचे यथाज्ञात चरित्र असणेही अवश्य आहे. एतदर्थच गोविंदांच्या परिचित मंडळीपैकी कित्येकांच्या व्यक्ती स्मृति गोळा करून आणि त्याची परस्पर छाननी करून गोविंदाचे एक अल्प चरित्र श्रद्धानंदातून भागशः प्रथम प्रसिद्ध करण्याचे ठरविले आहे. तेच चरित्र, तदनंतरही जर काही माहिती उपलब्ध झाली तर तिचा आणि इतर चर्चेचा यथा योग्य विचार करून पुढे त्या गोविंद गीतांच्या आवृत्तीस जोडण्यांत यावे, असा सध्यांचा विचार आहे.

"श्रद्धानंदा"च्या वाचकांस सुद्धा, त्यांस वचन दिलेल्या एकाद्या कल्पित कथेइतकेच ते मनोरंजन वाटूनही एकाद्या इतिहासाइतकेच उपदेशकही होईल. घटित हे कल्पिताइतके मनोरंजक असूनही प्रत्यक्ष जीवनास एखाद्या रसायनाप्रमाणे पुष्टिदायक आणि प्रगतीकारक होऊ शकते.

२

कवि गोविदाच्या चरित्राची माहिती एकत्र करतांना ज्यांनी ज्यांनी त्या विषयी, चरित्राविषयी आणि काव्याविषयी काही लिखाण लिहिले आहे, त्यांची आम्ही जी जमवाजमव केली त्यात जोग नावाच्या नाशिकच्या एका मर्मज्ञ अध्यापकांचाही निबंध आम्हास मिळाला त्यात ते म्हणतात कोणत्याही कवीचा सांगोपांग अभ्यास होण्यास त्याची सर्व कृती जशी उपलब्ध पाहिजे तशीच किंबहुना अधिकच त्याविषयीची सारी चरित्रविषयक माहिती उपलब्ध हवी. पुष्कळ वेळा व्यावहारिक अनुभवावरुन भावना उद्दीपित होतात. विचार सुचतात नि काव्यात रुपांतर पावतात. अशा वेळी हे काव्य किंवा वाङ्मय स्वतंत्ररित्या किंवा अन्य वस्तु निरपेक्षतेने वाचण्यास त्यामधील अर्धे अधिक स्वारस्य नाहीसे होते. कै. ना. वा. टिळकांची "पाखरा येशील का परतून" ही कविता बालकवी नगर सोडून जातांना त्यांना उद्देशून लिहिली आहे. हे जोपर्यंत कळलेले नसते तोपर्यंत ती मधील गोडी समजत नाही असे म्हटल्यास वावगे होणार नाही. सुप्रसिद्ध असलेले "सागरा प्राण तळमळला" हे पद्य कुठे कसे लिहिलेले आहे हे न समजल्यास ते गाणेच होऊ शकणार नाही. हीच स्थिती प्रस्तुत कवीविषयी आहे.

गोविंद कवीची कविता समजण्यास तर इतर कवीहूनही त्यांच्या चरित्राची माहिती अधिकच आवश्यक आहे. इतर कविंचे काव्यातील काही कविता त्यांचे चरित्र माहित नसल्यामुळे चांगल्याशा समजत नाहीत. पण गोविंद कविचे धोरण माहित नसेल तर त्यांच्या उभ्या काव्याचेच चित्र अस्पष्ट आणि प्रमाणहीन होऊन जाईल. त्यांचे चरित्र हे त्यांच्या काही कवितांचीच काय ती पृष्ठभूमी होती, असे नसून त्यांच्या उभ्या काव्यचित्राचीच ती पृष्ठभूमी आहे. त्या चित्राचे यथार्थ समालोचन आणि उचित मूल्य ती पृष्ठभूमी वगळून करताच येणारे नाही. काही कवितांचे स्वारस्थ तर त्या वाचून ध्यानात येणेच अशक्य आहे. उदा. त्यांची अगदी शेवटची मृत्युशय्येवरची ती "सुंदर मी होणार ग" ही कविता पाहा. त्या सुंदर शब्दांतील अंतःकरणास पीळ पाळणारी खोच, कवीच्या पंगुपणाची ती केविलवाणी मूर्ती ज्यांना दिसली नाही, भासली नाही, त्यांच्या मनाला कशी झोंबणार?

त्यांच्या काव्याचे यथार्थ महत्व समजण्यास ज्या त्यांच्या चरित्राचे ज्ञान इतके महत्वाचे आहे ते चरित्र दुर्दैवाने त्या आवश्यकते इतकेच दुर्मिळ झालेले आहे. प्रो. जोग म्हणतात, "कवीच्या चरित्राविषयी उदासीन राहण्याचा आणि या प्रकरणी पिण्डेष्वनास्था खलु भौतिकेषु हे कविवचन एखाद्या श्रुतीवचनाप्रमाणे पाळण्याचा आमचा पुरातन संप्रदायच आहे. या प्रकरणी पाश्चात्यांचे अनुकरण न करण्याचा बाणेदारपणा आम्ही पूर्णपणे दाखवीत आलो आहोत". या सर्वसाधारण अनावस्थेच्या भरीस, गोविंद कवींचे चरित्र विशेषतः दुर्मिळ होण्यास दुसरे कारण जे झाले ते म्हणजे त्यांच्यावर आलेला राजकीय आरोप आणि झालेला सरकारी रोष. काही दिवस तर त्यांचा आमचा परिचय होता हे सांगावयाचीही बहुतेकांना लाज किंवा भीती वाटत असे. ती भीती वाटण्याचे आता फारसे कारण उरले नाही. तरीही अजूनही ती माहिती सांगण्यास पुष्कळ जण दचकतात कारण मागची भीती नसली तरी तिची स्मृति अजूनही त्यांस दचकाविते. तिसरे कारण म्हणजे कवीने स्वतःविषयी काही माहिती लिहून ठेविली नाही. एकदा मात्र अगदी आसन्नमरण स्थितीत मित्रांच्या आग्रहावरून आत्मचरित्र सांगण्यास त्यांनी कंबर कसली होती असे आमच्यासमोर पडलेल्या एका चिठोऱ्यावरुन दिसते. त्या आत्मचरित्राचा आरंभ "मला पूर्वीची माहिती फारच थोडी आठवते" या अशुभ वाक्यापासून होऊन, मध्यंतरी दहा-पाच वाक्ये उलटतात तोच "आता सध्या पूरे" या अर्थाच्या कागदाच्या उरलेल्या निराश कोरेपणात त्या एकाच्छेदकी आत्मचरित्राचा शेवट झाला आहे.

विरोधाभास वाटेल परंतु आम्हांस हे सांगितल्यावाचून रहावतच नाही, इतके सगळे जरी खरे आहे तरी गोविंदांच्या चरित्राच्या दुर्मिळतेचे मुख्य कारण म्हणजे त्यांच्या जीवनास चरित्र असे फारसे कधी नव्हतेच हे होय, इतक्या अडचणी असताही काही थोडे बहुत चरित्र आता उपलब्ध होत आहे ते सर्वस्वी गोविंदांचे उत्कट अभिमानी, उत्कट सहकारी, उत्कट स्नेही श्री. महाबळ यांच्या सतत परिश्रमाचे फळ आहे. आधीच महाबळ त्यातही अस्थिवैद्य मग महाबळांनाही गोविंदाच्या मृत्युनंतर त्यांच्या भग्न चरित्राचा अस्थिपंजर नीटनेटका करवून उभारण्यात तितकेच यश आले की, त्यांच्या भौतिक पंगुपणाचा अस्थिपंजर नीट करण्यात जितके गोविंदांच्या अस्तित्वकाळी आले. जे थोडेसे चरित्र गोविंदांच्या अस्तित्वास होते, ते समजल्यावाचून याचे काव्य समजणे कठीण आहे, हे जसे खरे आहे तसेच हेही खरे आहे की, काव्यात जरी उभ्या राष्ट्राच्या रोमहर्षक उलाढालीचे रणदुंदुभिसारखे निनादत होते तरी गोविंद कविंच्या आयुष्यक्रमांत, त्यांच्या चरित्रात उलाढाल अशी काही झालीच नाही. पूर्वीचे तमासगिरी थाटाचे ते रेशमी तंग जाकीट काढल्यानंतर नुसता सदरा आला, ती जरीची कानशिलावर तिरपी ठेवलेली टोपी विटत विटत अगदी काळी पडल्यानंतर एक साधी टोपी आरुढली. बस्स. गोविदाच्या जीवन क्रमांत ही काय ती उलाढाल. नाटकगृहात रंगभूमीच्या ओट्यावर आज पानपतचा मुकाबला होतो. तर उद्या पानपताचा मोबदला. युगायुगांचे सामने, झुंजी, उत्थाने, पतने, पण त्या रोमहर्षक धुमाळीचा पडदा बाजूस सरतांच ओटा पुनः ओट्यासारखाच! निश्चल आणि उघडा आणि ओस दिसतो. त्यांचे चरित्र म्हणजे इतकेच. अमक्या दिवशी बांधला. हा असाच रहात आला. अमक्या दिवशी पडेल किंवा पडला. तशीच गोविंदाच्या स्वतःच्या चरित्राची स्थिती होती. जे काही फारसे घडलेच नाही, त्यास गोविंदाचे चरित्र असे म्हणतात. त्यांच्या आयुष्यांत भासले ते त्यांचे नसून त्याच्या शुभ्र आणि स्थिर अशा जीवन नाटकांत पडलेली ती त्यांच्या राष्ट्रातील अभिनव भारतीय प्रचंड खळबळीची आणि चळवळीची केवळ प्रतिबिंबे होत. त्या प्रतिबिंबाच्या समुच्चयालाच गोविंद कवीचे काव्य असे म्हणतात.

## गोविंदांची पूर्वपीठिका

स्वतःचे फारसे चरित्र नसणाऱ्या या गोविंद कवीच्या चरित्राचीही लेखाचा शिष्टाचार पाळण्यापुरती तरी पूर्वपीठिका सांगता यावी हे श्री. महाबळ यांचेच उपकार होत. कारण त्यांनी कवीची वृद्ध, निर्धन आणि बापडी मातुश्री श्रीमती आनंदीबाई यांचेकडून त्यांना सांगता येईल तितकी तरी माहिती एकत्र केली आहे. महाबळ लिहितात, नगर

जिल्ह्यातील दरे गांवचे हे मूळचे राहणारे म्हणूनच नाशिकला ते कुटुंब दरेकर या नावाने प्रसिद्ध झाले. गोविंदांचे आजोबा नाशिक येथे उपाध्यायांचे घरी नामावळी नेण्या-आणण्याचे काम करीत.

महाबळ स्वतः नाशिककरच असल्याने नामावळी हे काय प्रकरण आहे त्याची सर्व जगास आपणाप्रमाणेच उपजत माहिती आहे असे समजतात हे ठीकच आहे. पण नाशिकेतरास या शब्दांतील ही अगदी अस्सल मख्खी केकावलीतील पत्रावळी शब्दाइतकीच परिचित असण्याचा संभव. एतदर्थ त्यास नामावळी म्हणजे काय हे संक्षेपाने सांगितले पाहिजे. एक कळकट गुडघी पंचा नेसलेला, उघड्या थुलथुलीत अंगावरील उपरण्याचा काखेखालून खांद्यावर टाकलेला पदर पुन्हा पुन्हा निसरताना पुन्हा पुन्हा खांद्यावर फेकीत मोठमोठ्याने-तुमचे नाव काय शेटजी? रावसाहेब, तुमचे नाव? म्हणून ओरडत धावत्या घोड्याच्या टांग्याच्या प्रमाणे सारखा धावत सुटलेला, आणि मधूनमधून तुमचे नाव काय हे विचारण्याच्या ठिकाणी पाटणेकर पाटणेकर ते तेच आम्ही. आमच्या घराकडे हाकतो ये टांगेवाल्या म्हणून आपले नावची उजळणीही मोठमोठ्याने म्हणणारा कोणीतरी एक भटजी डोळ्यापुढे आणावा. नंतर त्याच्या काखेत त्या काखेच्या घामाने भिजलेल्या, कातड्याच्या लाल पुठ्ठ्याच्या, त्या सोवळ्या वहीकडे पहा. नंतर त्या भयाने तो टांगा स्टेशनपासून अर्ध्या मैलावर गाठून ती चामड्याची प्रचंड वही उघडून त्यातील टिपणावरून प्रवाशांच्या सातपिढ्यांचा उद्धार नावनिशीवार चालविला असता दुसऱ्या बाजूस त्याच्या पडलेल्या प्रतिबिंबाप्रमाणेच असणाऱ्या इतर भटांस तेही तशी नावे वाचित असता त्यांच्याही सातपिढ्यांचा उद्धार प्राकृत भाषेत करीत असतांना त्याचे ते दुहेरी वाक्याटण क्षणभर एका शेवटी आपल्या बापापासून तो बापाच्या बापाच्या बापापर्यंतच्या पिढ्यांनी, त्यांच्या बायकांनी, त्यांच्या मुलांनी या क्षेत्री कधी, कुठे, किती दिवस, प्रवेश, निवास, निर्भवन केले ते सविस्तर वर्णन मूळ सहयानिशी नोंदविले असलेल्या त्या वहीस पाहून तो प्रवासी- “शेटजी” नि “रावसाहेब” आश्चर्यचकित होऊन आ वासून चुपचाप त्या भटाचेच घरात भरलेल्या थैलीनिशी शिरतात आणि रिकाम्या थैलिनिशी बाहेर पडतात. त्या वहीस नामावली म्हणत. ह्या नामावली इतीहासात केव्हा केव्हा मोठी महत्वाची कामगिरी बजावत. बाजीराव पेशव्यांच्या आईस श्रीमंत राधाबाईस, लिहिता येत होते हा शोध त्रिंबकेश्वराच्या एका अशाच अत्यंत जुनाट आणि तरीही अगदी अन्यावधी “नामावळी”त त्या बाईची, स्वतःचीच स्वाक्षरी निघाल्यामुळे लागला. बाळाजी विश्वनाथाचे बंधू पोत्यात घालून बाळाजीपंत देशावर येण्याचे आधी बुडविले गेले या दंतकथेस शंकास्पद करण्यासही

अशाच एका नाशिक त्रिंबकच्या नामावळीतील त्या बंधूची बाळाजीपंत देशावर आल्यानंतरची स्वाक्षरी कारणीभूत झाली असे ऐकिवात आहे.

अशा ह्या नामावळी पेशव्यांच्याही आधीपासून आरंभत आजपर्यंतच्या नावास पोटात साठवीत पूर्वकालच्या गलेलठ्ठ भटजीसही न उचलता येण्या-सारख्या अजस्त्र आणि असंख्य भागात विभागलेल्या असतात हे सांगणे नकोच. म्हणूनच त्यांना उचलून नेण्यास मोठाल्या वृत्तीच्या उपाध्यायास एक एक गडी ठेवावा लागतो. अशा नामावळीच्या संचास वाहून नेण्या-आणण्याचे कार्य गोविंद कवीचे आजोबा करीत असत. हे समारोपक वाक्य ह्या नामावळीच्या विषयांतरास विषयसंबद्ध करणाऱ्या दोऱ्यासारखे उपयोगी पडेल, अशा आशेने पुन्हा लिहित आहे.

गोविंदाच्या आजोबासंबंधी याहून अधिक माहिती देणे किंवा त्या विषयार्थ अधिक जागा अडविणे हे विषयसंबंद्धतेच्याच नव्हे तर विषयांतराच्या शक्तिबाहेरचे असल्याकारणाने आता गोविदांच्या वडिलांविषयीच्या उपलब्ध माहितीकडे वळणे भागच पडते. परंतु "गोविंदांचे वडील नाशिकला गवंडी काम करीत असत" या एका वाक्यापलिकडे व्यायामाचार्य महाबळासारख्या कसरत कुशल आणि उत्साही वृत्तसंग्राहकाची उडी पडलेली नाही तेथे आमच्यासारख्या परोपजीवी ऐदी चरित्र लेखकाचा काय पाड. तथापि गोविंदाचे वडील दिवसभर गवंडी काम केल्यानंतर उरलेल्या वेळात पोथ्या पुराणे वाचीत आणि भजने करीत ही त्यांचा स्वभाव दर्शविणारी माहिती त्यांच्याविषयी उपलब्ध झालेली आहे ही त्यातले त्यात समाधानाची गोष्ट आहे.

वडिलांच्या या व्यासंगाचा आणि देवलासी भजन लोलुपतेचाच परिणाम वंशपरंपरेच्या तत्वाप्रमाणेच-गोविंदाच्या बुद्धि विकासात आणि गीती-काव्य-भर लुब्धतेत उमटला असावा.

पित्याच्या अर्ध्यामुर्ध्या उल्लेखानंतर लगेच गोविंदाच्या मातेचाही उल्लेख करणे अवश्य होते कारण माता ही पित्याची अर्धांगी होय. परंतु गोविदाच्या पित्यापेक्षा त्यांच्या मातेचा आणि आपला सहवास या चरित्र काळात पुढे पुष्कळ दिवस होणार आहे. गोविंदाच्या चरित्रात गोविंदाचा ग्रंथ आटोपल्यावरही त्यांच्या त्या वृद्ध आणि करुणामयी मातेचा ग्रंथ उरणार आहे. आपल्या एकुलत्या एक मुलाचा मृत्यु आपल्या डोळ्यादेखत होऊन त्याच्या चरित्राच्या माहितीचा लवलेश तरी सांगा, असे विनवीत

आणि आपण मोलाने घरोघरची भांडी घासीत असता, “हीच त्या स्वातंत्र्यकवी गोविदाची आई बरे का”, असे एकमेकास दाखवून पूज्य भावाने आपणाला वंदीत, कृतज्ञ लोकांच्या झुंडी आपल्या दरिद्री दारात तिष्ठत उभ्या राहिलेल्या पहाण्याचे दुर्भागी सौभाग्य या मातेच्या वाटेस येणार आहे. एतदर्थ सध्या तिचे नाव आनंदीबाई होते इतकेच सांगणे पुरे आहे.

## गोविदाची जन्मतिथी

देवलसी त्रिंबक गवंडी हा पिता आणि मोलकाम करणारी आनंदी ही माता ह्या माता-पित्यांचे संयुक्त उल्लेखाचे च्छेदक ओलांडताच वरील लेखक अर्थातच जन्मतिथीच्या उंबरठ्यावर येऊन उभा राहतो. आपल्या सुदैवाने आणि ऐतिहासिक संशोधकांच्या अत्यंत कठोर दुर्दैवाने गोविंदाची जन्मतिथी अगदी अचूकपणे शके १७९५ माघ महिन्यात कृष्णपक्षाची अष्टमी हीच असल्याचे आढळते. इतकेच नव्हे तर त्याचे जन्मटिपणाची कुंडली सापडलीही आहे असे प्रो. जोगांचे निबंधावरून दिसते. ऐतिहासिक संशोधकांचे पूर्ण दुर्दैव म्हणून जे आम्ही वर म्हटले ते हेच. कारण जर प्रत्येक महत्वाच्या पुरुषांच्या जन्मतिथी त्यांच्या मूळ टिपणीसह अशा सापडल्या आणि त्याहूनही दुःखाची गोष्ट की त्या मुळी हरवेनाश्या झाल्या तर ऐतिहासिक संशोधनाच्या वर्गाच्या वर्गाचे अस्तित्वच लुप्त होण्याचे संकट ह्या जगावर ओढवल्यावाचून कसे राहिल? जर शिवाजीची जन्मतिथी प्रथम लुप्त झाली नसती तर आज भारतेतिहास संशोधन मंडळाच्या भवनातील एक कागदांच्या ढिगांने अत्यंत शोभायमान आणि वाद-विवादाने भरलेले दालन ओस पडले नसते काय? अनेक जन्मतिथीचे पक्ष घेऊन आपले तर्क चातुर्य प्रदर्शित करण्याची संधी न मिळाल्यामुळे कित्येक विद्वान बेकार झाले असते. अहो, इतिहासातील बुद्धजन्मापासून तो शिराळ-शेटीच्या मृत्युपर्यंतचे सर्व कागदपत्र जर मुळी न हरवता जसेच्या तसे राखलेले असते, तर राजवाड्यांसारख्या संशोधकाचार्यास आपण नित्याचे अंतरलो असतो. आजही गोविंद कवीच्या जन्मतिथीच्या टिपणाचा कागद जर कोणी फाडून टाकेल तर त्याचे इतिहास संशोधन मंडळावर केवढे उपकार होतील. आम्हा चरित्रलेखकांच्या तर्कशक्तीसही केवढी चालना मिळेल.

## गोविदाची कुंडली

जन्म टिपणाचे नाव घेताच कुंडली पुढे दत्त म्हणून उभी राहते. प्रोफेसर जोगांनी गोविंदाच्या चरित्रातील ती उणीवही मोठ्या साहसाने भरून काढली आहे. गोविंदाच्या आय स्थानी केतू आहे. ह्याचे फल म्हणजे संपत्तीचा पूर्ण अभाव असे शास्त्र सांगते. धनस्थानी रवि आला तरी त्याच बरोबर शनिही आहे. त्याचे शास्त्रोक्त फल-संपत्ती कष्टाने मिळाली आहे. व्यय स्थानी चंद्र आहे, त्याचे फल म्हणजे सरळ आणि उदार हाताने व्यय सारखा होत आहे. भाग्य स्थानी गुरू आहे, अर्थात भाग्य बलवत्तर आहे. ह्या प्रमाणे प्रोफेसर जोगांच्या निबंधात उद्धृत असलेल्या कुंडलीवरून वर्तविली जाणारी शास्त्रोक्त पृथक फलश्रुती आहे. ती पृथक वाक्ये संकलीत करून वाचता, अशी फलश्रुती निष्पन्न होते की, ज्या संपत्तीचा पूर्ण अभाव आहे ती संपत्ती कष्टाने मिळाली आणि ह्या मुळीच नसलेल्या संपत्तीचा व्यय गोविंद कवि अगदी सढळ आणि उदार हस्ताने करीत असत अशा कवीचे भाग्य थोर असणारच. अशा या फलज्योतिष्याचा आडाखा किती अगम्य, अचूक आणि सुसंगत आहे. या गोविंदाच्या कुंडलीभविष्यामुळे गणित जोतिषाविषयी आणि फल ज्योतिषाविषयी ज्यांच्या अज्ञानाइतकाच आत्मविश्वासू अविश्वासही अजिंक्य आहे, त्या आम्हांसारख्यासही क्षणभर कौतुक वाटून कुंडली जोतिषाचा हटकून हसू आणण्याचा एकतरी उपयोग आहेच आहे असे सावनतशीर्ष मानणे भाग पडते. लाफिंग गॅस (हास्यवायु) इतके तरी कुंडली जोतिष आदरणीय वंदनीय आहे.

## ३

## गोविंदाची जात

येथवर आम्ही गोविंदाच्या जातीसंबधी उल्लेख केला नाही, कारण तो विषय थोडा भानगडीचा आहे. वर्णांवरून जी जात ठरते त्या ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या स्थिरटंकीय (कायम ठशाच्या) जन्मजात जातीपैकी गोविंद कोणाच्या जातीचे होते हे सांगणे बरेच धोक्याचे आहे. कारण ते ब्राह्मण नव्हते हे सिद्धच आहे. त्यास क्षत्रिय म्हणावे तर ए अरेरे कलावाद्यंतयोः स्थितिः म्हणून ललकारीत काशीचे ब्राह्मण आमच्यावर तुटून पडतील. बरे या सुत्रान्वये त्यास शूद्र म्हणावे तर कोल्हापूरचे ब्राह्मणेतर मतभेदाच्या या एका शब्दासाठी हे चरित्रचे चरित्र भटाळलेले समजून त्यावर वेदोक्त बहिष्कार घालतील. आता जन्मजात वर्णाची भानगड सोडून धंद्यावर ठरणारी प्रत्यक्ष जात सांगावी तर गोविंदाचे आजोबा उपाध्यायाच्या पोथ्या उचलण्याचा धंदा करीत आणि ह्या कामास करणाऱ्या वर्गाचे स्वतंत्र जाती वाचक नाव तर आम्हास अजून कळलेले नाही. म्हणून उपब्राह्मण या नवीन शब्दाने ती जात आम्ही सध्यापुरती तरी संबोधितो. उप म्हणजे सन्निध, उपब्राह्मण म्हणजे ब्राह्मणासन्निध (पोथ्या घेऊन) असलेला. तेव्हा धंद्यावरून ठरणारी गोविंदाच्या आजोबाची जात उपब्राह्मण होती. वडिलांची गवंडी होती, आणि त्याची स्वतःची उत्तर आयुष्यात तरी गोंधळी होती. कारण ते पुढे पोवाडे रचीत. डफ तबला वाजवीत.

पण गोविंदाच्या जातीविषयी चातुर्वर्ण्य आणि व्यवसायिक वर्ण ह्या दोन्ही प्रकाराचा असा दुहेरी निर्णय पडल्यामुळेच की काय त्याची जात ठरविण्याचे एक तिसरेच गमक इतिहास संशोधकास अवलंबावे लागले. ते म्हणजे म्युनिसिपालटीतील नोंद. नाशिक म्युनिसिपालटीतील लिखाणात गोविंदाच्या मृत्युनोंदीत जात वंजारी म्हणून दिली आहे. ही वस्तुस्थिती स्मरुन गोविंद हा स्वातंत्र्यकवि वंजारी होता हे ऐकताच, आनुवंशिकतेचे पुजारी चिडून जाऊन म्युनिसिपालटीलाच खोटी ठरवू लागले. म्हणून प्रो. जोग त्यास हडसून खडसून सांगतात की, ते वंजारी असले म्हणून त्यांना प्रतिभादेवीने काही झिडकारिले नव्हते. सरस्वतीच्या साम्राज्यात जातिभेद मुळीच नाही. (हे खरे असेल तर ते साम्राज्य म्लेंच्छदेशीयच असले पाहिजे. ते आर्यावर्तात असूच शकत नाही. कारण चातुर्वण्यै व्यवस्थानेव यस्मिन् देशे न विद्यते. तं म्लेंच्छदेशं जानीयात् आर्यावर्तः ततःपरं अति स्मृति. बर्न्स शेतकरी होता. शेक्सपियर खाटीक होता. पण त्याचा जन्म त्याच्या काव्य निर्मितीच्या आड आला नाही.

इतक्या वेळेपर्यंत भाष्यकाराच्या परंपरेच्या गौरवार्थ शब्द विडंबनाने विस्तारलेल्या बऱ्याच शेकडो वाक्याचा मतितार्थ आता एकाच वाक्यात सांगून सूत्रकाराच्याही परंपरेचा गौरव करणे उचित असल्याने गोविंद कवीची जात वंजारी, वडिलांचे नाव त्रिंबक गंवडी, आईचे नाव आनंदीबाई, जन्मस्थान नाशिक, जन्म तिथि शके १७९५ माघ कृष्ण ८ ही होय असा पुनः उल्लेख करू या आणि आता गोविंदाचे बालपण कसे गेले ते पाहू या.

त्याचे वडील, गोविंद कवी अगदी लहान असतानाच वारले. त्याचे घरी मूळचेच दारिद्र्य त्यात घरधनी वारला. मूल लहान, पण अशा स्थितीतही त्याच्या मायाळू आणि प्रेमळ आईने घरोघर दळणकांडण, भांडी घासणे इत्यादी घरकामे करून त्याच्या मिळणाऱ्या मोलावर आपला चरितार्थ चालविला. आनंदीबाईने गोविंदाला सहा सात वर्षाचा असता शाळेत घातले. प्रो. जोग म्हणतात, तो काळ इ.स. १८८० चा होता. त्या काळात कामकरी वर्गात शिक्षणाची रुची नसे. अशा वेळी त्या निर्धन आणि अनाथ बाईने आपल्या मुलाला शाळेत घातले हे कौतुकास्पद आहे. गोविदांच्या बाल्यापासून त्याच्या कुटुंबाचे दिवस ब्राह्मणांच्या सहवासात गेल्याने त्याच्या मुलाबरोबर हे मूलही सहजच शाळेत जाऊ लागले असावे. पण दुसरी इयत्ता जेमतेम येते न येते तोच ह्या मुलाला एक घातक आजार झाला. त्यात योग्य उपचार करण्यास त्या अनाथ बाईपाशी पैसा नसल्याने म्हणा किंवा दुसऱ्या काही योगायोगाने म्हणा पण त्या मुलाच्या उभ्या आयुष्याचे मातेरे करण्याचा प्रसंग त्याच्यावर एकाएकी गुदरला.

त्या मुलाचे पाय गुडघ्यापासून अधू झाले. दोन्ही पायाचा गुडघ्यापासूनचा भाग उकिडवे बसताना जसा मांडीस चिकटतो तसा नित्याचा चिकटून बसला. तो जन्मभर तसा राहिला. बसताना उकिडवे बसल्यासारखे त्यांना बसावे लागे. निजताना आंखडलेल्या त्या पायांनी उकिडवेच अंथरूणावर पडावे तसे निजावे लागे.अर्थात चालतानाही दोन हात पुढे ठेवून त्या जोरावर बेडकासारख्या उड्या घेत पुढे जावे लागे. आनंदीबाईचा नवरा वारला तेव्हा तिला हे एकुलते एक मूल होते. स्वरूपाने ते नाकी डोळी बरेच नीटस असे. दुडदुड धावत शाळेतून येई, तिला केवढे कौतुक होई. वाटे लौकरच माझा हा मुलगा मोठा होऊन माझ्या कष्टाचा भार कमी करील. त्याचे लग्न करीन आणि त्याच्या मांडत्या संसाराचे नादात माझ्या मोडलेल्या संसाराचा खटटूपणा पार विसरून जाईन. असे वाटते न वाटते तो ते जन्माचे पांगळे झाले.

एकुलता एक गोविंद जन्माचा पांगळा झाला ही कल्पना, ही बातमी, जेव्हा तिला स्पष्टपणे कळली, त्या क्षणी त्या आईला तिच्या एकुलत्या एक मुलाचा जन्म मातीस मिळालेला पाहून काय वाटले असेल? तरीही आईला जितके वाईट वाटावयाचे असेल तितके तिला एकदम वाईट वाटून गेले असेल. कारण तिला त्या पांगळ्या मुलाच्या जन्माची सारी दुर्दशा तेव्हाच कळू शकली. पण मुलाला मात्र त्याच्या पंगूपणाचे दुःख तेव्हाच्या तेव्हा सारे अनुभवता आले नाही. कारण त्या वेळी तो सरासरी आठ वर्षाचा असावा. त्या दुःखाची तीव्रता त्याला चढत्या वयाप्रमाणे सारख्या वाढत्या प्रमाणात भासणारी होती. बालवयात धावता, खेळता, उड्या मारता येत नाहीत, मुले पांगळा म्हणून हसतात तितक्याच पुरते ते दैहिक पंगुपणाचे दुःख जाणवते. पण तारुण्यामध्ये आईने घरोघरीची भांडी घासून आपले पोट भरावे, इतर माता नऊ महिने आपल्या मुलाचा भार वाहातात, आपल्या आईला आपला गर्भभार असा जन्मभर वाहवा लागावा, या लज्जेचे आणि यौवनाच्या उद्यानांत फुलाफुलातील मध पीत फुलापाखराच्या आणि भुग्यांच्या झुंडी अतस्ततः गुंजत सलील फिरत असता जन्मभर एखाद्या पंख तुटलेल्या भुंग्यासारखे आपण मात्र अतृप्त भावनांच्या पीडा सोशीत मातीत पडलेलो आहो, ह्या मानसिक पंगुपणाचे तीव्रतर दुःख भोगावे लागले. प्रौढवयात उच्चतम आकांक्षांनी बाहु स्फुरत असता, आपल्या शब्दाने चेतून वीरावर वीर कार्यक्षेत्रात पुढे घुसत असता आपण मात्र बांगड्या भरल्यासारखे या रहात्या घराच्या उंबरठ्याला चिंध्याचे गाठोडे पडावे तसे पडून राहावे, परकी इंग्रज पोलिसांनी आपल्याला धिक्काराने म्हणावे की, जाऊ द्या त्या पांगळ्याला त्याला काय धरा. बेडूक ते! टराव गरजेल आणखी काय करणार? आणि ती तुच्छ उत्तरे आपण ऐकावी, ह्या आकांक्षाभंगाच्या आत्मिक पंगुपणाचे तीव्र दुःख त्यास अनुभवावे लागले.

गोविंदाच्या वाढत्या वयाबरोबर त्या पंगुपणाच्या पीडादायक कळा अशा ज्या सारख्या वाढत गेल्या, त्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत. ती त्या पंगुपणाची मरणाचे वेळी उठलेली शेवटची मानसिक कळ तर इतकी तीव्र होती की तिची, त्या मृत्यूची किंकाळी मरणाच्या ह्या तटावरून थेट त्या तटावर ऐकू जावी.

सुंदर मी होणार हो, मरणाने जगणार।<br>
व्यंग देह हा याने कामुक काम कसे पुरणार हो! हो!<br>
पुरले नच ते पुढती पुरवून आणणार शतवार हो! हो!<br>
सुंदर मी होणार।

असे अवघ्या आठव्या वर्षीच गोविंदाचे पाय गेले. पुढे जेव्हा त्या पांगळ्या गोविंदाची ती पंगु कविता सरस्वतीच्या कृपेने, कीर्तीचा गिरी लंघून गेली आणि त्या बाठ्या पांगळ्याच्या स्फूर्तीने राष्ट्रवीर उठून उभे राहिले तेव्हा अभिनव भारतातील आवडत्या स्वातंत्र्य कवीशी या "आबां" शी थट्टेने बोलताना म्हणे "आबाना का पाय नाहीत? तर त्यांनी स्वातंत्र्य स्फूर्तीला चालता यावे म्हणून आपले पाय तिला वाहून टाकले. आबांचे पाय गेले म्हणून राष्ट्रवीरास पाय फुटले." त्या वीर किशोरांच्या त्या विनोदात पुष्कळ तथ्य होते.

## गोविंदाची पहिली कविता

गोविंदाच्या आठव्या वर्षी त्याच्या उभ्या जन्माचे मातेरे करणाऱ्या पंगुपणाचे घटने नंतर त्याच्या चरित्रांवर अनुपलब्धतेचा जो पडदा पडतो तो एकदम त्याच्या उभ्या आयुष्याचे सार्थक करणाऱ्या घटनेची नांदी होउन त्याच्या अठरावे वर्षाचे जवळपास उघडतो. कारण ह्या वर्षी या कवीची त्याला आठवत असलेली पहिली कविता रचिली गेली. तो वरून पांगळा होऊन, शाळा सुटून घरी बसल्यानंतर तमासगीरांचे संगतीत पडला होता. ते स्वतःच्या त्या दीड पानी आत्मवृतात म्हणतात "मी त्या वेळी शाहिरांच्या एका मठीत जात असे. तेथे लावण्या एकत असे नि म्हणत असे. तेथे एकदा एक नाच्या पोऱ्या आला. तो एक लावणी म्हणत असे. तिच्यावर एक तोड रचावी असे तेथे तेथील लोक म्हणू लागले. तोड म्हणजे तिच्या सारखी (किंवा तिला उत्तर देणारी) एक लावणी करणे. त्याचे म्हणणे ऐकले त्यावेळी थंडीचे दिवस होते. म्हणून दुसऱ्या दिवशी सकाळी मी चुलीजवळ पाणी तापवीत शेकत बसलो असता आपण तशी लावणी करावी अशी मला इच्छा झाली. मी लागलीच गुणगुण करू लागलो. अर्ध्या एक तासात पहिली दोन चरणे जुळली पुढे त्या साऱ्या दिवसात २-४ कडवी पुरी केली. ही माझी पहिली कविता. पुढे लावणी दुसरे दिवशी शाहिरास दाखविली. त्यानी ती पसंत करून तमाशात बसविली. एक महिन्यात तिचा साऱ्या गावात फैलाव झाला. पुढे आणखी दोन चार लावण्या केल्या. त्या काही आठवत नाहीत.

गोविंद कवीने स्वतःची पहिली कविता म्हणून जी सांगितली ती लावणी अशी:-

चाल:-----------(भारता तार या काली)

हौशिने करा मशि गेंद गेंद, घडवा हो बाजुबंद ..धृ..

बाजुबंद पायात साखळ्या,

मूद राखडी नथ पाटल्या,

ठुशी सरी आणीक बुगड्या,

बिल्लोरी भरा मशिं छंद छंद, घडवा हो बाजुबंद. . ..हौशिने..१..

गोविंदाची आणि कवितेची अशी पहिली भेट होताच हा जो तिने कामिनीच्या स्वभावास साजेलसा दागिनेच दागिने करून देण्याचा छंद धरिला तो पुरविण्यात गोविंदानेही कसूर केली नाही, बिल्लोरीच नव्हे नाना कुसरीचे सुवर्ण छंद भरले. हौशीने बाजू बंद घडविले. त्या लावण्यवतीस या लावण्याचे एका दमात सांगता आले नाहीत इतके सुंदर अलंकार त्यांनी हळू हळू तिला घातले आणि तिची ही अगदी पहिली हौस पुरविली.

नुसती नामावळी असली तरीही ही नादमधुर लावणी गोविंदाची पहिली कविता शोभते खरीच. ती ऐकत असता नाना सुंदर अलंकारांची रूपे चक्षूसमोरून मंजुळपणे रूणझुणत झटपट जातात. घडलेले विकाऊ सोन्यामोत्याचे दागिने संमिश्र मांडून सोनाराच्या दारापुढे ठेवलेल्या काचेच्या स्वच्छ कपाटासारखी ती मनोहर भासते.

“यापुढे मला वाचनाचा नाद लागला. पदे म्हणणाऱ्या मंडळीचा आणि माझा स्नेह जमला तेव्हा मी एक नाटक लिहिले होते. त्याचे नाव मन्मथ प्रभाव. पुढे ते मला काही आवडले नाही, म्हणून फाडून टाकले. ह्यातील दोन तीन पदे खालील प्रमाणेः-

**नांदी-- (भोलानाथ दिगंबर) दीपचंदी**

**पद्मधवपादपद्म मिलिंदा।।**

**सेवी मनुज मिलिंदा।।**

**सेवी मनुज मिलिंदा ।।धृ।।**

**ध्यानी सुमना, रूपी नयना।।**

**नामस्मरणी भजनी रसना।।**

**तेवी श्रवणा नामश्रवणा।।**

**योजी प्रभूच्या कामी।।**

**अर्चन विधीच्या घ्राणे गंधा।।**

**सेवी मनुज मिलिंदा।।**

**(एका स्त्रीचे वर्णन)**

**“ही शुशुभा शुभांगना।।**

**स्मरस्त्री रंभा ती सांबाची गंगा अंबा।।**

**मानसि वारे चंचल लंबा।।धृ।।**

**रजनीरमणा सौंदर्याने कुरंग शिशुना निज नयनाने।**

**मंद मंद मातंग गतीने।।**

**लाजवील ही उरुने रंभा------”**

**पुढे काही आठवत नाही.”**

गोविंदाच्या त्या दीड पानी आत्मचरित्रातील वरील उताऱ्याच्या शेवटचे हे पुढे काही आठवत नाही किती गमतीचे आहे. स्मर सती रंभे सारख्या त्या शुभांगी अंबेला पाहून प्रत्यक्ष सांबाला देखील पुढे आठवले नाही. ही गोष्ट कुमारसंभव सांगतच आहे तेथे आमच्या कवीचा काय पाड?

## तमासगिरांच्या मठीतील गोविंद गुप्त होतो

कवितेचा हा प्रथम परिचय तिच्या लावण्याच्या लावणीत जो झाला, तो गोविंद कवीच्या मरणापावेतो पुन्हा काही सुटला नाही. त्याची आणि कवितेची तमाशाच्या मठीत जमलेली ती गट्टी वाढतच गेली. लावण्याच्या नादाने गोविंद, तबला वाजवावयास शिकले. तमाशांच्या नादानादाने नाटकांची रूची लागली. मध्यंतरी कुठे लग्नकार्यात निरवणुकीपुढे मिरवत नेतात त्या फुलमाळा आणि काचेचे किंवा रंगी कागदाचे चित्र विचित्र "बागा" करण्याची कलाही त्यांनी अवगत करून घेतली. हा धंदा बैठा आणि घरगुती असल्याने त्याच्यासारख्या पंगु मनुष्यास फार उपयुक्त होता. ते त्याच्यावर हळूहळू पोटापुरते मिळवू लागले.ह्यातून त्याच्या त्या मठीतील हालचालीची किंवा साथी सोबत्याची काही माहिती मिळत नाही. वास्तविक पाहता ती त्यांची पहिली लावणी तिथून ऐकू येताच गोविंद या तमासगिरांच्या मठीतून जो गुप्त होतो तो एकदम तिळ-भांडेश्वराच्या गल्लीतच प्रकटतो.

ती तिळभांडेश्वराची गल्ली आज एक नाशिक नगरातील क्षेत्र-वैशिष्टय झालेली आहे. पण त्या वेळेस ती म्हणजे त्या नगरातील एक अगदी टाकाऊ अडवळणी केरकचऱ्याचा बोळ होता. महाराष्ट्रातील कोणीही प्रागतिक देशभक्त नाशिकला येताच आज त्या आड गल्लीतील पोट गल्लीतल्या त्या धोंडभट विश्वामित्राच्या घरातील अगदी अरुंद आणि अंधेऱ्या खोलीत पहावयास जातो. पंचवटीतील रामांच्या दर्शनामागोमाग नाशिकचे वैशिष्ठ्य म्हणून जे स्थान पहावयाचे ते ती खोली होय असे आज समजतो- आणि उद्या उभे हिंदुस्थान तसे समजू लागेल कारण स्वातंत्र्यलक्ष्मीचे प्राप्त्यर्थ अगदी पहिल्यांतले पहिले अभिनव भारतीय भीषण अनुष्ठान अभिनव भारताच्या वीर पूजकांनी त्याच गुप्त गुंफेत चालविले होते. नाशिकच्या क्षेत्रमहात्म्यांत सीता गुंफेंच्या ऐतिहासिक पावित्र्याप्रमाणेच या स्वातंत्र्य गुंफेंचे ऐतिहासिक पावित्र्यही आज महाराष्ट्रीय यात्रिक मानीत आहेत, उद्या भारतीय यात्री मानणार आहे. पण त्या वेळी त्या गल्लीत आणि खोलीत फुकट रहावयास देखील कोणी नागरिक अगदी निरूपाय तरच मान्य होता इतकी ती गल्ली आणि ती खोली अरुंद अंधारी, आकुंचित होती आणि तेव्हांच आणि त्याच अरुंद अंधाऱ्या आकुंचित खोलीत, त्या सुविशाल, भव्य, दिव्य अशा जीवन ध्येयाचे दर्शन गोविंदास घडले आणि गोविंदाचे जीवन अमूलात पालटून गेले. या गल्लीत त्याची आई श्री. धोंडोपंत विश्वामित्र या भिक्षुक गृहस्थाच्या घरी आश्रयार्थ राहून आजूबाजूच्या ब्राह्मण कुटुंबातील भांडी घासणे, दळण कांडण इत्यादी कामे करी आणि गोविंद

अर्थात "आबा पांगळे" आपला कागदाच कातर कामाचा धंदा करीत. गल्लीतील ब्राह्मण तरुणांच्या संगतीत नाटकांचा छंद त्यास लागून मागे दिलेल्या त्यांच्या नाटकी पदाची रचना याच वेळी झाली. तेथे लौकरच त्या गल्लीतील नावाजलेल्या खोडकर पोराटोरांचे ते धुरीण बनले. आणि तो लौकीक सांभाळून वयाचे सत्तावीस-अठ्ठावीस वर्षापर्यंत तिथेच चहा-चिवडा झोडीत, तबला बडवीत, येत्या जात्यांच्या टारगट खोड्या करीत, पण केव्हा केव्हा लहर आलीच तर आजाऱ्यांची शुश्रृषा, असहायास सहाय्य, वर्तमान पत्रे वाचणे, इत्यादी कार्ये करीत. अशा उपयुक्त उनाडपणांत अग्रेसरत्व मिळवित, तेथे आबा पांगळे वास्तव्य करीत होते. इतक्यात त्यांच्याच जीवनात नव्हे तर त्या गल्लीच्याच भागात वर उल्लेखिलेली रम्यादभूत पालट करणारी घटना घडून आली, कारण त्या अंधार गल्लीच्या कोंदट क्षितीजावर एक लहानसा तारा उदय पावला.

आणि त्याच्या वर्धमान तेजाच्या स्पर्शासरशी आबा पांगळ्या आणि त्या उपयुक्त उनाडांच्या टोळीने पेट घेऊन ती प्रथम एका तेजोमेघांत परिणामली- आणि लौकरच जिच्या तेजाने देशोदेशांचे डोळे दिपावे अशी एक सूर्यमालिका बनली. तो लहानसा तारा म्हणजे किशोर सावरकर होय. आणि ती सूर्यमाला म्हणजे आता ऐतिहासिक महत्व पावलेली ती अभिनव भारताची गुप्त संस्था होय.

सरासरी १८९८ च्या संधीस या गल्लीतील श्री. वर्तक यांचे घरी भगूरच्या सावरकरांची दोन मुले, विद्याभ्यासास्तव भाड्याची खोली घेऊन, त्यांच्या वडिलांनी ठेवली. लवकरच प्लेगचा पहिला कहर उसळला आणि त्यात मुलांचे वडील आणि चुलते बळी पडल्यामुळे पोरके झालेले ते कुंटुंब त्या आळीत श्री. दातार यांच्या घरोब्याचे योगे तिथेच स्थानिक झाले. त्यावेळी सावरकरांचे वय १४-१५ वर्षांचे होतो. त्याच कुमाराचे आगमनासरशी त्या आळीत आणि त्या मंडळीत एका अपूर्व चैतन्याचा संचार झाला. त्या कुमाराचे प्रेरणेने हिंदुस्थानाला स्वतंत्र करण्यासाठी यथाशक्ती झुंजून शेवटी सशस्त्र युद्धात आपण आपले प्राणदानही करण्यास कचरणार नाही अशा शपथा तेथील तरुणांनी आणि प्रौढांनीही घेउन एक गुप्तसंस्था आणि तिचीच मित्रमेळा नावाची एक प्रकट शाखा स्थापन केली. याच शाखेत प्रवेश करताना याच कुमाराच्या हस्ते गोविंदानेही ती भव्य भीषण शपथ घेतली की, हिंदुस्थानचे पूर्ण राजकीय स्वातंत्र्य हेच माझे अनन्य ध्येय असून त्या स्वतंत्र्यास्तव माझ्या सर्व शक्तीनिशी झुंजत मी माझ्या मातृभूमीचे स्थंडिलावर सशस्त्र युद्धात प्राणाचेही बलिदान करण्यास कचरणार नाही.

ही शपथ मित्र मंडळाचे गुप्त मंडळात प्रति वर्षी पुन्हा पुन्हा घ्यावी लागे. गोविंदही ती तशी घेत. पुढे त्या गुप्त मंडळाच्या शाखा महाराष्ट्रभर पसरून जेव्हा त्याचे संम्मीलित असे अभिनव भारत हे नामकरण करण्यात आले तेव्हा १९०६ वर्षाचे मेच्या संधीस महाराष्ट्रांत आलेल्या शेकडो तरुणांनी आणि प्रौढानी तीच भव्य भीषण शपथ एकाकंठाने घेतली. वीरयुक्त सावरकर एकेक शब्द सांगत होते आणि हातात तुळशीचेपत्र अक्षता आणि लाल फुले घेऊन ते शेकडो देशभक्त क्रांतिकारक एक कंठाने गंभीर स्वरांत उच्चारीत होते. त्यात गोविंद होते. शेवटी जेव्हा त्या दीक्षितांच्या शतकंठातून स्वातंत्र्यलक्ष्मीचा उत्स्फूर्त जयजयकार झाला तेव्हा त्यातील दृढांतील दृढप्रतिज्ञ स्वरांत गोविंदाचाही स्वर होता.

ही शपथ घेऊन गोविंद या गुप्तमंडळांत शिरताच त्यांच्या जीवनाची दिशा आमूलात पालटली. त्यांच्या जीवनाला एक भव्य दिव्य ध्येय लाभले. त्यांच्या जीवनाचा अर्थ त्यांना कळू लागला. त्यांनी आपल्या ज्या होत्या नव्हत्या त्या शक्ती कायावाचामने करून त्या महान कार्यार्थ वेचिण्यास आरंभ केला. आबा पांगळ्याचे रुपांतर स्वातंत्र्य कवी गोविंदांत होत चालले.

सावरकरांच्या सहवासाचे कक्षेत येताच ज्यांचे सुप्त सामर्थ्य, अंतर्हित शक्ती आणि अकृतार्थ जीवन एकाएकी विकास पावले, प्रकट झाले आमूलात पालटले आणि जे आपल्या घरी अन्यथा पावले असते त्याहून अनेक पटीने अधिक थोरपणे थोरपण पावले अधिकत्वेकरून कृतार्थ झाले, शकले असे हिंदुस्थानभर आणि हिंदुस्थानाबाहेर आज शेकडो कर्ते लोक झळकत आहेत पण त्या कोणाच्याही जीवनात सावरकरांच्या सहवासामुळे गोविंदाच्या जीवनाहून आधिक महनीय स्थित्यंतर झालेले नसेल.

## गोविंदाचे सावरकरांशी पहिले संभाषण

गोविंद वयाने सावरकरांपेक्षा तेरा चवदा वर्षांनी मोठे होते. सावरकरांच्या कविता त्यांच्या चवदा पंधराव्या वर्षीही पुण्याच्या काही पत्रांतून येत. त्यांच्या वयाच्या लहान मुलांत याविषयी फार आदर वाटे. पण त्यांच्याहून वयाने पुष्कळ मोठ्या असलेल्या अनेक जणांस त्यांचा सहाजिक मत्सर वाटे. अशा आबांच्या त्या टोळक्यांतील एक दोघांनी आबांच्या अभिमानाची ढाल आपल्या मत्सरास उपयोगी आहेसे पाहून आबासमोर नेहमी म्हणावे- हा सावरकरांचा मुलगा कविता करतो पण आबांच्या

पदांच्या पासंगालाही त्याचे ते भारूड टिकणार नाही. पण त्यांच्या या उनाड टीकेचा परिणाम कवितेचा किंचित परिचय असलेल्या त्यांच्या सद्‌वृत्त कवींवर अगदी निराळा झाला. त्यांना त्या किशोराची कविता आपल्यापेक्षा सरस आहे असे मनांतल्या मनात वाटू लागून त्यांचे कारण त्याच्यापाशी असलेल्या शब्दांचा भरणाच असावा असे त्यांस वाटले. तेव्हा त्याने काय काय पुस्तके वाचून ही शब्दसंपती आणि कला वाढविली ते विचारावे असे त्यांनी ठरविले. पण तो ती किल्ली आपणास सांगणार कशी? कारण त्याचा आपला व्यवसाय एक -भिक्षुकी भिक्षुक -तसाच कविः कवि दुष्टावा प्रकार होऊन तो ती पुस्तके आपणापासून अधिकच दूर नेऊन लपवून ठेवील अशी भिती त्यांना पडली. कारण त्यांच्या मंडळीतील त्याचा अनुभव तसाच होता. त्यांनी त्याच्या त्या टोळीतील एका सैनिकाकडून त्या किशोर कवीपाशी पुस्तके आहेत तरी कोणती तो अप्रत्यक्ष शोध करून पाहिला. पण त्या किशोराचे वाचन त्याच्या वयाचे मानानेच नव्हे पण एकंदर सरासरीनेही खरोखर दांडगे होते. तेव्हा त्या ढिगांतून कवितेची किल्ली असलेले तेवढेच पुस्तक निवडून ते सहज उचलण्याइतकी तरी त्या विषयीची माहिती त्या सैनिकास हवी ना. शेवटी एक दिवस त्यांच्या त्या घरांच्या उबऱ्यावर संध्याकाळी बसले असता त्यास सावरकरांनी एक नवीन पोवाडा रचिला आहे. आणि तो फारच उत्तम वठला आहे असे त्यांच्या मते अगदी निष्णात असलेल्या एका त्रयस्थ गृहस्थाचे तोंडून कळले. तेव्हा आबास अगदी रहावेना. ती कविता मागण्यास त्या किशोराकडे आपणच जावे असे ठरवून “आबा पांगळ्याची स्वारी मंडूकप्लुती घेत घेत शेजारीच असलेल्या त्या किशोराच्या खोलीत आली. पहातात तो सगळेच विपरीत. तो किशोर कवितेच्या किल्ल्या लपवून ठेवण्याचे ठिकाणी उलट त्या आबानीही वापराव्या म्हणून बळ करू लागला. आबानीही शब्दसंपत्तीचा प्रश्न काढताच त्या किशोरापाशी असलेला एक मराठी कोश आबापुढे केला? हीच ती आबाना वाटलेली ती कवितेच्या जादूची किल्ली. आबांना असे झाले की त्या कोशास केव्हा पळवीन. पण आपले पाठाचा हा महत्वाचा मंत्र असा दुसऱ्याच्या हाती कोण देणार अशा भयाने आबा ते पुस्तक मागावयास दचकत आहेत, तो सावरकरांनीच तो कोश त्यांनी न्यावा म्हणून आग्रह चालविला. मात्र पुष्कळ लोक पुस्तके बळकावून बसतात. तसे न करीता आठवणीने परत द्यावा असे सांगितले. आबांना आनंद झाला. त्या किशोर कवीविषयीच नव्हे तर त्या किशोराविषयीच त्यास आदर वाटू लागला. त्यांच्या या आज स्पष्ट आठवत असलेल्यापैकी सावरकरांविषयी झालेल्या पहिल्या ओळखीत आबांना सावरकरांविषयी वाटू लागलेला हा आदर पुन्हा केव्हाही मावळला नाही तर वाढत तो दोन चार वर्षांत पूज्य बुद्धीत आणि नंतर आजन्म भक्तीत परिणत झाला.

या प्रथमपरिचयानंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणे मित्र मेळ्यांत आबांचा प्रवेश होऊन त्यांच्या जीवनाचे आणि सावरकरांच्या जीवनाचे ऋणानुबंध एकाच उदात्त ध्येय वृत्तीच्या अखंडनीय ममत्व-रज्जूनी दृढतम झाले. तेव्हां आबांची उन्नती तीच सावरकरांची आणि सावरकरांची तीच आबांची-गोविंदाची असे होत गेले. इंग्रजी सातव्या इयत्तेत असता सावरकर एकदा तापाने आजारी होऊन घरीच राहिले. तो महिना त्यांच्या आवडत्या मोरोपंती भारत रामायणाचा अभ्यास करण्यात त्यांनी करमणूक म्हणून घालविला. तेव्हा त्यांच्या जवळ बसून गोविंदही मोरोपंत समजून घेत. मोरोपंती रामायणांपैकी निरोष्ट, दाम, मंत्र लघु इत्यादी प्रत्येक प्रकारच्या रामायणांतील आर्या सावरकरांस मुखोद्गत असत. त्या त्यांनी म्हणाव्या आणि आबांना त्यातील कवीची कामगिरी पाहून फार आनंद व्हावा. त्यांना पदे करिता येत. पण ती केवळ श्रुतिसुखदतेवर विसंबून, श्लोक करतांना श्रुतिसुखदतेचा नियम पुरेना. ते फार चुकत. तेव्हा मालागण आणि अक्षरगण यांची फोड सावरकरांपाशी त्यांनी शिकावी. नवे काही शिकावयाचे म्हणजे ते घोटाळून कंटाळत म्हणत-जाऊ दे ते. आम्ही कुठे कोणचा बंब वाजविणार आहोत हे शिकून. ते तुम्हाला ठीक आहे पण सावरकर त्यांना चुचकारून वारंवार उत्तेजन देत की छट् काही चिरंतन अशी राष्ट्रसेवा निदान वाङ्मयसेवेच्या साधने करुन तरी तुम्हीही करू शकाल. तुमच्यात शक्ती आहे. केवळ चिकाटी नाही. ही पहा तुमची कविता छान साधली आहे वा हा श्लोक तर अगदी वृतासुद्धा शुद्ध आणि सरळ झाला. म्हणजे आबा हसत नि म्हणत “हरबऱ्याच्या झाडावर तात्या मला नेहमी चढवीत असतो. पण तितके उंच देखील आम्हाला चढवत नाही.” विलायतेत असतांना देखील नव्हे अंदमानातूनही गोविंदाकडून काही तरी लिहवून घेण्यासाठी सावरकरांचा सारखा तगादा असे. चिकाटी धरा. तुम्ही कवीच नव्हे तर कादंबरीकार म्हणूनही अवश्य प्रख्यात होऊ शकाल. क्रांतीची ज्योत पेटवणारी कादंबरी ही बिनधोक आगपेटी असते. कारण ती निर्बंधात सहसा गवसत नाही. आणि म्हणूनच ग्रंथकाराना बिनधोक लिहिता येऊन वाचकांनाही बिनधोक वाचता येते आणि आपणास हवा तो धोका ती क्रांतीची आग बिनचूक भडकावीत सुटते.” बॅ. सावरकरांचे शेवटपर्यंत हे पालूपद होते. “आबा तुम्ही कादंबरीकार व्हा, कवि आहातच.” सावरकरांनी रुसो प्रभृतिचे उदाहरण द्यावे आबांनी होय म्हणावे, अभिनव भारत मालेत त्यांच्या कादंबरीचे स्थान निश्चित व्हावे, आरंभही करावा. पण एका दुसऱ्या प्रकरणाच्या जवळपासच त्या सर्व प्रकरणानी राम म्हणावा.

त्यांच्यासारख्या पंगु माणसाचाही क्रांतीच्या प्रगतीस अधिकाधिक उपयोग करून घेण्यास कादंबरी आणि कविता हेच दोन मार्ग आहेत. हे जाणून त्यास अवश्य असणारे बहुश्रुतत्व त्यांचे अंगी यावे म्हणून बॅ. सावरकरांनी त्यांच्या मागे वाचनाचा खुप तगादा लावला. मेळ्यातील प्रत्येक सभासदास काही तीस-चाळीस ठराविक पुस्तके वाचावीच लागत. त्यात भरणा क्रांतिकारक इतिहासाचा. ती गोविंदांनीही वाचली. दर आठवड्यास होणाऱ्या व्याख्यानात त्या पुस्तकांची आणि अनेक विषयांची होणारी चर्चा त्यांनी लक्षपूर्वक ऐकावी. इतिहासावरील बॅ. सावरककांच्या दांडग्या व्यासंगाचा उपयोग मित्र मेळ्यास आणि गोविंदास त्याच्या अनेक व्याख्यानांनी केवढा झाला हे गोविंदाची “रणावीच स्वातंत्र्य कोणा मिळाले” ही कवीताच सांगत आहे. या कवितेत त्यांनी उल्लेखिलेल्या राष्ट्रांची नावे आपल्या कुठल्याशा वर्तमानपत्राच्या एखाद्या च्छेदकांतील नामावळीवरुन उतरलेली नाहीत. त्यातील राष्ट्राच्या इतिहास साधक बाधकचर्चेसह त्यांनी स्वतः अध्ययन केलेला होता. निदान सावरकरांच्या व्याख्यानांतून सविस्तर ऐकिला होता. इतिहासच नव्हे तर मित्रमेळ्यासाठी दातार शास्त्रींच्या घरात असलेल्या पुस्तकालयांतील अनेक विषयाचे ग्रंथ आबांकडून सावरकरांचा ससेमिरा वाचवून घेई. मित्रमेळ्याच्या सभेत राजकारणाव्यतिरिक्त तात्विक, साहित्यिक, आर्थिक, अनेक विषयावर सदोदित उत्तमोत्तम व्याख्याने होत, चर्चा चालत. कालीदास आणि भवभूतीची तुलना शेक्सपीयरची नाटके, वेदांत, ताऱ्यांचे कौतुक इत्यादी अनेकविध विषयास ते विसीच्या आतील तरुण मंडळ अभ्यासित असे. आबा ते सगळं ऐकत. अगदी विचारपूर्वक ऐकत आणि त्यावर मार्मिक मते देत.

पण बोलण्याची मात्र मोठी पंचाईत. बॅ. सावरकर तर जो दिसेल त्यास हं, बोल म्हणून डवचणार, ढकलणार! त्यात आबावर तर त्यांचा पक्का कटाक्ष. आम्हास उभे राहून बोलावे लागते तुम्हाला बसून बोलण्याचा अधिकारी मान. स्वयंसिद्धच (कारण ते मूळचेच पंगू) शेवटी प्रत्येकाने बोललेच पाहिजे असा नियम केला. तेव्हा राजश्री कधी कधी बोलत थोडा वेळ. असे होता होता त्यास अध्यक्ष करण्याचा कट झाला तेव्हा कोण धांदल. संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून साहित्य. खुर्चीवर बसणाऱ्या पांगळ्याच्या अध्यक्षपणास शक्यतेपासून अडचण. पण त्यांचे नाही तर नाहीच ऐकले कोणी. धरून बसविले खुर्चीवर. आणि ते स्वतःला सभासदच समजत असता सर्व सभासदांनी “आबा पांगळे” यांसच अध्यक्ष मानून रीतसर अध्यक्षांचे आभार मानीपर्यंत सभा निर्विघ्नपणे पार पडली. पुढे पुढे ते एखादा विषय घेत. बोलतही बराच वेळ. आणि जेव्हा बोलत तेव्हा अगदी मार्मिकपणाने बोलत. पण मध्येच कुठे

तरी एखाद्या पतंग उडविणाराचे हातून सगळाच दोरा तुटून जावा नि पतंग धाडकन खाली यावा तसे त्यांचे अनुसंधान सुटून-अगदी गोंधळत "आता संपले अथेच. आता पुढे आठवत नाही आठवत तो सारा झाला सगळा गोंधळ." म्हणून मटकन- खाली नव्हते बसत! कारण ते उभेच रहालेले नसत- तोंड मिटून घेत.

बोलता येत नव्हेत, उठता येत नव्हते. मात्रा कळत नव्हत्या. पण आबांचे वजन मंडळीतील प्रत्येकावर अगदी पहिल्या प्रतिच्या पुढाऱ्यांसारखे पडे. त्यांचे मत मार्मिक आणि विचार पक्व म्हणून जो तो समजे. त्या संस्थेत इतर कोणत्याही संस्थेप्रमाणेच प्रौढ आणि तरुण, मागे ओढणारे आणि पुढे रेटणारे, मला करवत नाही तू केलेले बघवत नाही म्हणून जळफळणारे पक्षोपपक्ष मधून मधून होत. पण त्या सर्व प्रसंगी आबांचा पाठिंबा आणि विश्वास सावरकरांवर अढळ राहिलेला दिसे त्यांच्या पूर्वापार घरोब्याचे अनेक स्नेही त्यांच्यावर अनेकदा रुष्ट होत. पण आबांची सावरकरांवरील निष्ठा अचल असे.

सावरकरांच्या त्या कोषांतील आणि मोरोपंतांतील अनेक संस्कृत शब्द आबा टिपून ठेवीत. त्यांच्या कवितेत नवे संस्कृत शब्द बहुधा मार्मिकपणे पण केव्हा केव्हा केवळ शब्दसंपत्तीच्या अलंकारिक शोभेस्तव योजलेले आढळतील. त्यांच्या पदाच्या अर्थातून सावरकरांच्या विचारांचा, उच्चारांचा आणि शिकवणूकीचा सारखा प्रतिध्वनी उमटत होता. पण क्लुप्ती त्यांची! विचार सावरकरांचा प्रथम सावरकरांची शिवाजीची आरती. प्रतिध्वनी तानाजीची आरती सावरकरांचा सिंहगडचा पोवाडा आणि बाजीचा पोवाडा अत्यंत लोकप्रिय झाल्यावर आणि विलायतेस गेल्यावर नवा पोवाडा रचण्याचे काम आबांवर-गोविंदावर पडले आणि त्यांनी अफजुलखानाचा पोवाडा रचला तो पहा, चालीपासून तो अंतर्गत आत्म्यापर्यंत तो सावरकरांच्या पोवाड्याचे प्रतिबिंब आहे. - पण कसे तर सूर्यकिरणाचे प्रतिबिंब रत्नांतून परावर्तित व्हावे तसे. मूळ किरणाच्या तेजोरेखा शतगुर्णे शोभिवंत करून सोडणारे. सावरकरांच्या विलायतेतील कवितांच्या आणि ग्रंथांच्या इतकेच नव्हे तर बंदीगृहातून धाडलेल्या कमला, सप्तर्षी, गोमंतक इत्यादी काव्यांच्यापर्यंत हाच परस्पर संबंध दिसून येतो. नवीन विधेये, नवीन रचना नवीन स्फूर्ति सावरकरांच्या कवितेत उमटताच, प्रकटताच तिथे उठावदार आणि अनुकृत असतांही स्वतंत्र असे प्रतिबिंब, असे परावर्तन गोविदाच्या कवितेतून झळकू लागावे, तळपू लागावे.

गोविंदाच्या कवितेची प्रसिद्धीही सावरकरांच्या प्रसिद्धीबरोबरच वाढत गेली. सावरकर कॉलेजात पुण्यास गेले तेव्हा तेथील अनेक प्रांतातील भावी कर्त्या पुरुषांत त्यांनी गोविंदाची कविता गावी वाखाणावी. पुण्यास त्यांचे वजन वाढत चालले. टिळक-परांजप्यांपर्यंत त्या कवितेचीही वाखाणणी जाऊन नाशिकचे मेळे पुण्यास प्रभुत्वपणे मिरवीत आणि गोविंदांच्या पदांच्या तेजाने उभे पुणे थरारुन गेले, स्फुरण पावले. सावरकर मुंबईस येताच तेथील अभिनव भारताच्या शाखेतही आणि सावरकरांच्या शतावधी परिचित मंडळीतही ती कविता तशीच प्रख्याति पावत गेली. पुढे इंग्लंडमध्ये तर हिंदुस्थानांतील कर्त्या आणि होतकरू अशा सर्व प्रांताच्या हिंदी पुढाऱ्यात आणि तरुणात ती कविता सावरकरांच्या अमोघ प्रस्तावनेने आणि स्वाभिमान पुरस्काराने ग्रथित झाली. प्रसिद्ध ग्रंथकार पंडित जैसवाल, लाला हरदयाळ, पंडित शामजी, देशभक्त अय्यर यांनी ती पदे आणि त्यातील भावार्थ ऐकून बारबार मान डोलवावी. ऑक्सफर्ड, केंब्रीज इत्यादी विश्वविद्यालयातील हिंदी तरुण आणि अभिनवभारत संस्थेच्या पारीस वगैरे ठिकाणच्या शाखांतूनही “स्वातंत्र्य कवी” किंवा सावरकर सुचवित त्या पदवीप्रमाणे “स्वातंत्र्य काव्य कोकिळ” अशा अभिधेने ते हिंदी विद्वान मंडळ त्या स्वातंत्र्य कवि वीरांच्या छावणीत गोविंदास गौरवीत असे. सावरकरांनी नाशिकला पत्रे पाठवून गोविंद कवीस ती “स्वातंत्र्य कवि” ही पदवी जी प्रथम अर्पिली, ती त्या युरोपांतील भारतीय मंडळीच्याच वृत्तीने आणि अनुरोधाने होय.

अशा प्रकारे गोविंद हे स्वातंत्र्य कवी झाले. हा पंगुकवी महाराष्ट्रीय कीर्तिचाच नव्हे तर काही अंशी भारतीय किर्तीचा गिरीही लंघून गेला. सन १९१० चे संधीस त्यांने त्यांच्या तेजस्वी स्वातंत्र्य रणगीताने पटकाविलेले हे स्थान त्याच्या उतरार्धातील “मुरली”सारख्या तात्विक तरीही प्रेमळ गंभीर असूनही अत्यंत सुरस अशा गीताने आणि गतीने आमरण अढळ ठेविले, आणि त्याच स्वातंत्र्य कवीच्या शाब्दिक रणगीतास सार्थ कृतार्थ करणाऱ्या त्या अनेक स्वातंत्र्य वीरांच्या रणपराक्रमाची दैदिप्यमान प्रभावळ जोवर त्या स्थानी अशीच प्रकाशत राहील तोवर ते स्थानही तसेच प्रकाशित रहाणार आहे.

* * *

## देशभक्त पं. शामजी कृष्णवर्मा

Resistance to aggression is not only justifiable but imperative. Non-resistance hurts both altruism and egoism.

*-- Hurbert Spenser.*

सुप्रसिद्ध देशभक्त, स्वातंत्र्यवादाच्या आद्य पुरस्कर्त्यांतील एक अग्रगण्य पुढारी, निःशस्त्र प्रतिकाराचे प्रवर्तक आणि त्या निःशस्त्र प्रतिकाराचा स्वातंत्र्यसंपादनकार्यी त्यांच्या अनुभवास आलेला फोलपणा पाहाताच सशस्त्र क्रांतिकारकांच्या अभिनव-भारत-संस्थेशी संबद्ध झालेले एक अत्यंत प्रमुख पुढारी, ज्याचे नाव इंग्लंडच्या डोळ्यात एके काळी शल्यासारखे खुपत होते, ते विद्वान, धनिक समाजसुधारक आणि तत्ववेत्ते श्रीमान पंडित शामजी कृष्णवर्मा हे मार्च १९३० मध्ये स्विट्झलर्ंड येथे आपल्या वयाच्या ऐशीव्या वर्षाच्या जवळपास मृत्युमुखी पडले, हे एकून कोणाही सहृदय आणि कृतज्ञ भारतीय देशभक्तास वाईट वाटल्यावाचून राहणार नाही.

वाईट वाटते ते, ते मृत्युमुखी पडले याचे इतकेसे नाही, परंतु ज्या देशावर त्यांनी अपरंपार प्रेम केले, ज्याच्या स्वातंत्र्यासाठी स्वदेशशत्रूंनी सळो का पळो करून सोडल्यामुळे निर्भयपणे झोप घेता येईल अशी जागा या उभ्या जगात ज्यांना सापडली नाही; आणि परदेशी, परद्वारी जन्मभर ज्या देशाच्या आणि स्वजनांच्या आठवणीने झुरत ते मरणी मरून गेले त्या देशास ते पुनः डोळे भरून पाहू देखील शकले नाहीत. ते मरण्याचे आधी तो देश स्वतंत्र झाल्याची बातमी देखील ते ऐकू शकले नाहीत- इतकेच नव्हे-हाय! हाय! त्या देशास त्यांचा इतका विसर पडला की, त्यांच्या मृत्युविषयी कृतज्ञतेचा एक अश्रुबिंदूही गाळण्याची कोणास आठवण झाली नाही, आवश्यकता वाटली नाही याचे वाईट वाटते! दृष्टीआड ते सृष्टीआड ही या जगाची रीतच आहे. मंदिराच्या पायातील दगडांची कोणी विचारपूस करीत नाही- कळसाच्या दिखाऊ दगडाचे दर्शन घ्यावयास हजारोंची दाटी उडते! पण, ज्ञाता असतो, कृतज्ञ असतो, तो त्या कळसाची उंची ज्यांनी आपल्या देहास भूगव्हराच्या भयंकर खोलीत पुरून घेत घेत शक्य केली, त्यांच्या अज्ञात त्यागाची आठवण अधिक कृतज्ञतेने काढतो. शत्रूच्या तोफांवर प्रथम चाल करून त्यांची आग आपल्या जीवनाचे रक्त ओतून जे विझवून टाकतात ते रणात कामास आलेले सैनिक,

रणांगणातून उरून परत आलेल्या सैनिकांप्रमाणे, विजयोत्सवाच्या मिरवणुकीत मिरवत जाताना आढळत नाहीत. पण जे कृतज्ञ राष्ट्र आहे ते कोणीही जिवंत परत आलेल्या सैनिकांचा उभारते त्याहून अनेक पटनी सन्मानपूर्वक पुतळा जो उभारते ते त्या विजयाचे आधी आणि त्या विजयास्तव मरून गेलेल्या अज्ञात वीरांचाच होय, The unknown dead चाच होय!

पण ही गोष्ट कृतज्ञ राष्ट्राची, कृतज्ञ पिढीची आहे; आणि शामजी कृष्णवर्मा हे भारताच्या ह्या कृतघ्न पिढीत, ह्या दास्यहत, बुद्धिभ्रष्ट युगात जन्मले आणि मेले आहेत! म्हणून ज्यांच्यासाठी ते झुरत, झिजत मेले त्यांना आज त्यांची आठवण देखील, ओळख देखील उरलेली नाही! भारतीय क्रांतिकारकांच्या पुढाऱ्यांविषयी भारतीयांस पूर्ण विसर पडावा आणि साम्राज्यमत्त इंग्लंडच्या त्या कट्टर शत्रूस स्वजनांच्या सहानुभूतीचा देखील ओलावा मिळू नये अशीच इंग्लंडची कुटील राजनीती असते आणि हिंदुस्थानसारख्या ह्या आत्मविसराळू, दास्यहत लोकांत ती अशी सफलही होते.

नाही तर पंडित शामजी, श्रीमती कामाबाई, श्री. वीरेंद्रनाथ चटोपाध्याय, लाला हरदयाळ इत्यादी स्वदेशार्थ जन्मभर झिजत राहिलेल्या भारतीय क्रांतिकारक देशभक्तांची नावे आज येथल्या एका हंगामी प्रचारकाच्या इतकी तरी घरोघर स्मरली गेली असती. ती तशी स्मरली जात नाहीत म्हणून त्यात त्या देशभक्तांस काही एक कमीपणा येत नाही- त्यांना त्याची खंत वाटण्याचे काही कारण नाही. पण त्या कृतघ्नतेची आम्हाला मात्र लाजच वाटली पाहिजे!

पंडित शामजी यांचा जन्म कच्छचे एका वैश्य कुटुंबात झाला. त्यांनी लहानपणी शिक्षणासाठी घर सोडले आणि लोकांचे घरी अक्षरशः धोतरे बडवून, पाणक्याचे काम करून त्यावर जे मिळेल ते खाऊन विद्याभ्यास केला. त्यांच्या बुद्धिमत्तेमुळे त्यांची लवकरच आजूबाजूस एक अत्यंत होतकरू तरुण म्हणून ख्याती झाली. इतक्यात त्या वेळेस सर्व हिंदुस्थानभर वेदोक्त धर्माचा डंका पिटीत जाणाऱ्या श्रीमान स्वामी दयानंदाच्या भेटीचा योग शामजीस घडला. दयानंदांसारख्या सूक्ष्मदृष्टी आचार्यांच्या दृष्टीपातातून असला कृतियुवक निसटून जाणे शक्यच नव्हते. लवकरच पंडित शामजी हे आर्यसमाजातील स्वामी दयानंदांच्या अत्यंत विश्वासू आणि कर्त्या मंडळात गणले जाऊ लागले. पंडित शामजींचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्वही याच वेळेला वाढले. दयानंदजींच्या अनुरोधावरून पंडितजींनी अष्टाध्यायीचा अभ्यास केला.

दयानंदजींचा या आपल्या कर्त्या शिष्यावर इतका विश्वास बसत गेला की, ते मरतेवेळी आर्यसमाजाची आणि स्वामीजींच्या इतर सर्व कार्याची देखरेख करण्यासाठी त्यांनी जे विश्वस्त मंडळ (Trustees) नेमले त्यात पं. शामजींचेही नाव होते. त्यावेळी मोनिअर विल्यम यांनी ऑक्सफर्ड येथे एक संस्कृतज्ञ पंडित हवा म्हणून दयानंदांकडे मागणी केली तेव्हा त्यांनी शामजींसच तिकडे धाडले. पंडितजींनी इंग्लंडमध्ये जाऊन ऑक्सफर्डमध्ये बराच नावलौकीक मिळविला. तेथेच लेक्चरर या नात्याने अध्यापकत्वाचे काम केले. नंतर लेखनकला आणि लिपीही भारतीयांनी परक्यापासून स्वीकारली म्हणून मागे जो एक युरोपियन विद्वानांत वाद चालला होता त्यात पंडितजींनी भारतीयांच्या वतीने भाग घेऊन वेदांतील आधारांवरूनच वेदकाळी देखील भारतीयांना लेखनकला आणि लिपी यांचे ज्ञान होते हे सिद्ध केले. त्यांच्या या निबंधाचे युरोपीय विद्वानांत गौरवपूर्ण कौतुक होऊन जर्मनीने त्यास पंडित ही पदवी दिली; ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीने त्यास एम्. ए.ची उपाधी अर्पिली; निर्बंध-विद्यापीठानेही त्यास बॅरिस्टरची वस्त्रे दिली.

अशा रीतीने आपल्या विद्वत्तेची किर्ती विदेशांतही पसरवून बॅ. पंडित शामजी हे हिदुस्थानात परत आले. येताच उदेपूरच्या महाराजांनी त्यास आले दिवाण नेमिले. ते प्रधानपदाचे काम काही काळ केल्यानंतर त्यांनी बॅरिस्टरीही केली, पुढे काठेवाडच्या संस्थानातही ते दिवाणपद चालवीत होते. त्यांची पत्नी हीही मुंबईच्या एका धनिक घराण्यातील महिला असून फारच दयाळू, थोर मनाची आणि त्यांच्या अंगीकृत स्वदेशस्वातंत्र्याच्या कार्यी एकनिष्ठपणे त्यांस साहाय्य करणारी खरीखरी सहधर्मचारिणी होती. पंडितजींवर सरस्वतीप्रमाणेच लक्ष्मीचाही वरदहस्त असे. लाखो रुपयांची त्यांची मत्ता होती. हाती प्रधानपदाची सत्ता होती. पदरी कुठेही बृहस्पतीसारखा सन्मान पावावा अशी विद्वत्ता होती- पण पंडितजींच्या देशास स्वतंत्रता नव्हती. म्हणून ह्या सर्व वैयक्तिक अनुकूलतेतही पंडितजींच्या मनास असमाधान वाटू लागले. लोकमान्य टिळक यांच्यावर प्लेगचे गडबडीत १८९७ चे संधीस जो खटला झाला, त्यायोगे तर पंडितजींची आतल्या आत असलेली स्वदेशाविषयीची निष्क्रिय तळमळ त्यांना अगदीच असह्य होऊ लागली. स्वामी दयानंदांच्या अत्यंत जाज्ज्वल्य देशभक्तीचे तीर्थ पंडितजी प्यालेले होते.

दयानंद सरस्वती हे पहिले राष्ट्रवादी-- The First Nationalist होत, असे पंडितजी नेहमी म्हणत. पंडितजींच्या त्या राष्ट्रवादाचे स्वरूप त्याकाळी असलेल्या प्रकट राजकीय पंथांहून फारच पुढारलेले होते. लवकरच त्यांच्या काही वैयक्तिक

कार्यामुळेही त्यांस विलायतेस जाणे अवश्य झाले. तेव्हा हिंदुस्थानपेक्षा विलायतेच्या स्वतंत्र वातावरणात आपली ही अत्यंत प्रागतिक राजकीय मते आपल्यास अधिक प्रबळपणे प्रचारिता येतील असे वाटून त्यांनी ह्या राजकीय कार्यासाठी इंग्लंडमध्येच स्थायी होऊन राहण्याचा संकल्प केला. त्यावेळी प्रकट राजकारणात दादाभाई नवरोजी यांचा पक्ष -म्हणजे राष्ट्रीयसभा पक्ष- हा प्रमुख होता. दादाभाई नवरोजी हेही इंग्लंडमध्येच राहात तोवर प्रकटीकृत ध्येय म्हणजे देशाच्या राज्यकारभारात सुधारणा- आणि त्याही ब्रिटिश उदारता आणि भूतदया जागृत करूनच साधावयाच्या- हे असे, परंतु पंडितजींनी होमरूल हेच हिंदुस्थानचे ध्येय असले पाहिजे अशी घोषणा सर्वांच्या आधी करून त्यांचे, सिद्ध्यर्थ होमरूल सोसायटी आणि इंडियन सोशिऑलॉजिस्ट नावाचे पत्र काढले. इंग्लंडमध्ये या पत्रातील इंग्रजांवरील अत्यंत कडक टीकेमुळे आणि हिंदुस्थानला Home Rule म्हणजे ब्रिटिशांच्या साम्राज्यातील वसाहतीचे स्वराज्य हवे ह्या त्या वेळेस जवळजवळ बंडखोरीप्रमाणे वाटणाऱ्या मागणीमुळे इंग्रजांस पं. शामजींची भीती आणि द्वेष राष्ट्रपितामह दादाभाई नवरोजींहूनही अधिक वाटू लागला. टिळकांच्या चळवळीमुळे जसे गोखले बरे असे सरकारास वाटे तसेच शामजींच्या चळवळीमुळे दादाभाई बरे वाटू लागले. शामजींनी याच वेळी इंडिया हाऊस नावाचे वसतिगृह काढून त्यात स्वदेशभक्तीचे शिक्षण घेणारे आणि सरकारी नोकरी न करण्याची प्रतिज्ञा करणारे अशा हिंदी तरुणांची राहण्या-जेवण्याची स्वतः सोय केली. त्याचप्रमाणे हजारो रुपये बाजूस ठेवून हिंदुस्थानातून तिथे येणाऱ्या विद्यार्थ्यांकरिता आणि गृहस्थांकरिता शिष्यवृत्याही ठेविल्या. याच शिष्यवृत्त्यांपैकी शिवाजी फेलोशिप श्री. विनायकराव सावरकर यांस मिळाली आणि ते इंग्लंडमध्ये जाऊन पंडितजींच्या इंडिया हाऊसमध्ये राहिले. पंडितजींस बंगाली नि मराठी उत्तम येई. गोविंदांच्या आणि सावरकरांच्या राष्ट्रीय कविता त्यास फार आवडत. ह्या वेळच्या इतर पुढाऱ्यांच्या मानाने पंडितजींची मते किती पुढारलेली होती ह्याचे प्रत्यंतर देण्यास एवढी गोष्ट सांगणे पुरे की, त्यावेळी इंग्लंडमध्ये गांधीजी हे इंग्रजांचे राष्ट्रगीत भक्तिभावे गात फिरत आणि ब्रिटिशांना गांधीजी भक्तिपूर्वक राजे म्हणून म्हणताच शामजींच्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन ते सावरकरांच्या पोवाड्यातील चरण गर्जतः राजे! घरात शिरला चोर तया मी मानियला राजा!!

## होमरूल

श्री. सावरकर येईतो पंडितजींचे होमरूल हेच ध्येय असे. आणि निःशस्त्र प्रतिकार हाच मार्ग असे. सरकारी नोकऱ्या आपण करण्याचे नाकारताच सरकार अशक्य होईल आणि इंग्रज निघून जाईल हा त्यांचा त्या वेळचा मुख्य कार्यक्रम होता. बंगालमध्ये श्री.पालांची Passive Resistance म्हणजेच निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ निघून, सरकारी शाळा, सरकारी पदव्या, सरकारी नोकऱ्या, सरकारी कोटे यांवर बहिष्कार घालून शेवटी सरकारी पदव्या, सरकारी नोकऱ्या, सरकारी कोटे यांवर बहिष्कार घालून शेवटी सरकारी करही देण्याचे नाकारले असता विनारक्तपात वसाहतीचे स्वराज्यच काय, पण स्वातंत्र्यही मिळू शकेल अशी ग्वाही देण्यात येऊ लागली. हा कार्यक्रम आणि पंडितजींचा कार्यक्रम एकच होता. ह्याच कार्यक्रमात दहा-पाच तात्विक परिभाषेतील पण पोकळ अर्थाच्या अगडबंब शब्दांची भेसळ होऊन आज त्यास Non-Violent Non-Cooperation- अनत्याचारी असहयोग हे नाव पडले आहे. सरकारशी असहयोग करताच इंग्रज, हिंदुस्थान विनाशस्त्र प्रतिकाराने सोडतील ह्या निःशस्त्रप्रतिकाराच्या कार्यक्रमालाही त्यावेळची राष्ट्रीय सभा अत्यंत भयंकर समजत होती. परंतु शेवटी दादाभाई नवरोजींनीच कलकत्यास वसाहती स्वराज्य (होमरूल- Home Rule) हेच हिंदुस्थानचे ध्येय होय, असे जेव्हा घोषित केले तेव्हा त्या ध्येयासरशी ती राष्ट्रीय सभा नवीन पक्षाचीच अंकित झाली. राष्ट्रपितामह दादाभाई ह्यांनी जे साहस केले आणि त्या वेळच्या नेमस्त पक्षाला तितके पुढे जाणे जे भाग पडले, ते हिंदुस्थानातील लाल-बाल-पालांच्या चळवळीचा जितका परिणाम होता तितकाच पंडित शामजींच्या इंग्लंडमधील चळवळीचाही होता. कालमानाप्रमाणे लोकमान्य स्वतः होमरुलचा उच्चारही केसरीत करीत नसत. परंतु पंडित शामजींनी Home Rule संघ इंग्लंडमध्ये स्थापन करताच त्या संधीचा लाभ घेऊन हिंदुस्थानच्या चळवळीस तितके पुढे रेटण्यास लोकमान्यांनी क्षणाचाही विलंब होऊ दिला नाही; केसरीत पंडितजींच्या नव्या चळवळीवर लेख लिहून त्यांनी तीस लगेच उचलून धरले.

## अभिनव भारत

परंतु श्री. सावरकर हे इंडिया हाऊसमध्ये जाताच आणि ह्या अत्यंत पुरोगामी समजल्या जाणाऱ्या होमरूल संघासही मागे टाकणारी नि अगदी फिके पाडणारी क्रांतिकारक चळवळ चालू होताच पंडितजींच्या राजकीय मतांचा विकास झपाट्याने

होत गेला. सावरकरांच्या स्वातंत्र्य Absolute Political Independence चेच ते अभिमानी झाले. अर्थांत ते होमरूल नाव देखील त्यांनी बदलून टाकले. तीच स्थिती साधनांच्या प्रश्नाविषयीही झाली. १८५७ चे बंड हे काही मूर्ख आणि धर्मभोळ्या शिपायांचे बंड होते, त्यात राष्ट्रभक्तीचा किंवा स्वातंत्र्याचा गंधही नव्हता हे पंडितजींचे- त्या काळच्या सर्वच लोकांप्रमाणे सरकारी इतिहासाने न कळत अंगात टोचलेले- मत असल्यामुळे, सत्तावनच्या स्वातंत्र्यवीरांच्या स्मृतिचा प्रथमोत्सव प्रत्यक्ष इंडिया हाऊसमध्येच सावरकरांच्या अनुयायांनी केला ह्याचा पंडितजींस मोठाच विषाद वाटला; पण ते एक प्रामाणिक देशभक्त होते. सत्य कळल्यावरही, तुमचा कोटिक्रम निरुत्तर करणारा आहे खरा, पण तरीही मला असेच वाटते किंवा माझा अंतरात्मा मला असे सांगत नाही असे काही तरी बकणारे हट्टाग्रही नव्हते. किंवा अमक्याने म्हटले म्हणून जे मानले नाही ते जणू काय आपणच पहिल्याने म्हटले असे दाखवून मग मात्र तेच स्वतःचे म्हणून आचरणारे मिथ्याचारी नव्हते. त्यास लवकर निःशस्त्र प्रतिकाराने स्वातंत्र्य मिळू शकणार नाही असे स्पष्ट दिसू लागले. अभिनव भारताच्या धाडसी उठावणीमुळे इंग्लंडभर जी प्रचंड खळबळ माजली, अभिनव भारताची दहावीस मुले देखील सरकारास इतकी सळो का पळो करून सोडतात हे पाहून पंडितजींस त्यांच्या मार्गाविषयी जो अनुभवजन्य विश्वास आणि परिणामकारकता पटू लागली, त्यायोगे ते दोन वर्षांचे आतच अभिनव भारतीय आंदोलनाचे कट्टे पुरस्कर्ते बनले. इंग्रज लोक सावरकरांच्या चळवळीशी पंडितजींचे सहकार्य प्रकटपणे सुरू झाल्याचे पाहून अतिशय चिडले. पालर्मेंटमध्ये आणि वृत्तपत्रांतून धडाधड प्रश्न होऊ लागले की, शामजी कृष्णवर्मांस सरकार अशी भयंकर आणि अपराधी चळवळ करण्यास किती दिवस मोकळे सोडणार आहे. पण त्या चाणाक्ष पंडिताने त्या प्रश्नाचे उत्तर सरकारने देण्याचे आधीच देऊन टाकले. एके रात्री कोणास काही पत्ता नसताना पंडितजी पॅरिसला निघून गेले. त्यांचे पैसे त्यांच्या आधीच इंग्लिश बँकातून फ्रान्सातल्या बँकांत गेलेले होते. पंडितजींस प्रथम भारी विश्वास असे की, इंग्रजांनी हिंदुस्थानात काय वाटेल ती दडपशाही केली तरी इंग्लंडमध्ये ते उदार मताचेच (Liberalism) पुरस्कर्ते राहाणार आणि मॅझिनी आदी प्रकरणांप्रमाणे आपल्या देशभक्तीचे कौतुकच करून आपले व्यक्तिस्वातंत्र्य नुसत्या मतासाठी हिरावून घेणार नाहीत. पण ह्या उलट आलेल्या स्वतःविषयीच्याच अनुभवावरुंन पंडितजींचा इंग्रजांच्या चांगुलपणावरील विश्वास पार मावळला आणि अर्थातच त्या चांगुलपणावर, इंग्लिश माणुसकीवर अवलंबून असणारे नुसत्या असहयोगाचे अथवा निःशस्त्र प्रतिकाराचे फोलपण पाहून ते सशस्त्र क्रांतिवादाचे पुरस्कर्ते बनले. ते पॅरिसला गेल्यावर तर इंग्लंडमध्ये अभिनव भारताने सावरकरांच्या

नेतृत्वाखाली भयंकर धुमाकूळ मांडला. बॉम्बची विद्या ते तरुण शिकले. धिंगराने सर कर्झन वयलीचा भर लंडनमध्ये वध केला, तेव्हा तर इंग्लिशांची मानहानी आणि हिंदी देशवीरांच्या धैर्याचा आणि प्राणासही कस्पटाप्रमाणे मानणाऱ्या हुतात्मतेचा गौरव उभ्या युरोपभर गाजू लागला. पंडितजींनी या कार्यास गुप्तपणे अर्थसाहाय्य केले असल्याचा सर्वत्र बोभाटा होताच. त्यातही पंडितजींच्या पत्रातून धिंगरांचा गौरव केला गेला आणि त्यास उघडउघड हुतात्मा म्हणून गौरविण्यात आले, तेव्हा इंग्लंड चवताळून गेले. पण करणार काय? पक्षी पिंजऱ्यातून उडून गेलेला! इंग्लंडला त्यांनी परत यावे म्हणून त्यांस भुलविण्यात आले. भ्याड म्हणून चिडविण्यात आले. याविषयी गोष्ट निघाली म्हणजे आपल्या फ्रान्सच्या वाड्यात सुखरुपपणे बसत, आपली ती भव्य मान हलवीत आणि तो डौलदार भरभक्कम देह झुलवीत झुलवीत हसून ते म्हणत, इंग्रजांच्या हातावर तुरी देऊन एकदा पंडित शामजी जो निसटला तो आता पुन्हा असा का फसणार आहे! आता न गंगदत्तः पुनरेति कुपम्!

पंडितजींनी आपल्या देशाच्या दास्यमोचनार्थ स्वतःचे हजारो रुपये व्यय केले. इंडिया हाऊस, हजारो रुपयांच्या शिष्यवृत्या, क्रांतिकारक आंदोलनार्थ द्रव्यसाहाय्य, हे सर्व त्यांच्या उदारतेचे चिन्ह आहे. त्यावाचून त्यांना ज्याच्या तत्वपद्धतीचा अत्यंत अभिमान असे त्या स्पेन्सरच्या नावाने त्यांनी ऑक्सफर्डमध्ये शिष्यवृत्या स्थापण्यास आणि फ्रान्समध्ये सीन नदीच्या महापुरात नागावलेल्या फ्रेंच लोकांस साहाय्य म्हणूनही हजारो रुपये दान दिले. अशा दानी पुरुषासही कृपण म्हणण्याची जी एक टूम निघाली होती, ती त्यांच्या कृपणतेचे चिन्ह नसून त्यास कृपण म्हणणाऱ्यांच्या कृतघ्नपणाचे किंवा लबाडपणाचेच ते द्योतक होते. ज्याने हजारो रुपये देशकार्यार्थ दिले, त्यास त्याने लाखो दिले नाहीत म्हणून कृपण म्हणणे हे ज्याने लाखो रुपये दिले असतील किंवा देशसेवेत जे शामजींइतके कष्टले असतील त्यांस एक वेळ शोभेल. पण स्वतःला हवी होती तितकी भीक शामजींनी त्यांना घातली नाही म्हणूनच शामजींच्या नावाने बोटे मोडणारे जेव्हा शामजीस कृपण म्हणतात, तेव्हा ते स्वतःच्याच भिकारड्या हीनतेचे आणि हताश मत्सराचे प्रदर्शन करतात- पंडितजींच्या नव्हे. त्यास पैसाच हवा असता तर इंग्लंडमध्ये इंग्रजांचे पोवाडे गाऊन एखाद्या राजाचे विलासी ऐश्वर्य त्यांना सहज भोगता येते. पण प्रबळ देशशत्रूशी उघड विरोध करून, आपला जीव धोक्यात घालून वृद्धावस्थेतही ज्याने विदेशी दारोदार भटकत फिरत, केवळ आपल्या स्वदेशस्वातंत्र्यार्थ, ह्या हालअपेष्टा भोगल्या त्याच्या मनाचा हा मोठेपणा, हे आत्म्याचे औदार्य हे काय कार्पण्याचे लक्षण आहे? या औदार्याचे मूल्य पैशांनी का मोजता येणारे आणि येत असेल तर

त्या त्यांच्या देशस्वातंत्र्यार्थ भोगलेल्या कष्टाचे आणि केलेल्या सेवेचे मूल्य लाखो रुपयांहून अधिकच नाही काय? आणि म्हणूनच अशा देशनिर्वासितांमधील थोरांतील थोर पुरुषास कृपण म्हणणे म्हणजे कृतघ्नताच नाही काय?

रागारागाने इंग्लंडने पंडितजींची बॅरिस्टरची पदवी काढून घेतली, एम्.ए.ची पदवी छिनली, त्यांचा जीव घेतला जाईल अशा निनावी धमक्या त्यांस दिल्या गेल्या. आणि सगळ्यात भयंकर सूड म्हणजे पंडितजींस निरंतरच्या देशनिर्वासाची अप्रत्यक्ष शिक्षा भोगावयास लावली! महायुद्ध चालू झाल्यावर पंडितजींस फ्रान्समध्येही राहाणे धोक्याचे होऊन ते स्विट्झलर्ंडला गेले आणि तेथेच या थोर पुरुषांचा अंत झाला.

त्यांच्या देशशत्रूने त्यांना देशपारीची शिक्षा दिली आणि त्यांच्या देशानेही त्यांना स्मृतिपारीची शिक्षा दिली! त्यांनी केलेल्या सेवेची ह्या आम्ही, त्यांच्या कृतघ्न देशबंधूंनी, आठवण देखील काढली नाही, त्यांची एका शब्दानेही विचारपूस केली नाही. स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी प्रथम झुंजत आणि नंतर झुरत, हा थोर भारतीय निर्वासित जेव्हा स्विट्झलर्ंडमध्ये दुसऱ्याच्या दारी ८० व्या वर्षी वारला, तेव्हा ज्याच्या राष्ट्रीय मातृभाषेत त्याने ज्याचा निरोप घ्यावा असा स्वजन त्याच्याजवळ एकही नव्हता!!

पंडित शामजींचा देश जर आज स्वतंत्र झाला असता, तर त्यांचे मरण देखील त्यांस सुखावह झाले असते. तरी देखील ह्या पंचवीस वर्षांपूर्वी ब्रिटिश साम्राज्याचा पंडितजी धिक्कार करीत असता जे लोक I proudly declare my loyalty to British Empire म्हणून वल्गना करीत, त्या ब्रिटिशांकरिता बोअर आणि झुलू यांच्याशी लढत, तेच आज पंडित शामजींच्या त्याच भाषेत ब्रिटिश साम्राज्याचा धिक्कार करीत आहेत, आणि पंडितजींच्या स्वातंत्र्याच्या ध्वजाखाली झुंजत आहेत ही भारताची मानसिक क्रांती तरी त्यांनी यशस्वी झालेली पाहिलीच आहे. तीवरून तरी ती वास्तव क्रांतीही आज ना उद्या यशस्वी झाल्यावाचून राहाणार नाही अशा आशेने त्यांच्या मृत्युशय्येची उदासिनता थोडी तरी हलकी झाली असेल काय?

श्रद्धानंद: २६ एप्रिल, १९३०

* * *

## पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा, पण अत्याचारी नव्हे !

(याच लेखामुळे इंग्रज सरकारने श्रद्धानंद पत्र शेवटी बंद पाडले.)

निंदाव्यंजक विशेषणाने एखाद्या पदार्थाला नसते निंद्य स्वरुपही प्राप्त होते. आला आहे एक थेरडा असे जर कोणी आपल्या वृद्ध वडिलांना पाहून म्हणाला तर तो अक्षरशः खोटेच बोलतो असे जरी म्हणता आले नाही, तरी इतके खचितच म्हणता येईल की, त्या वृद्ध गृहस्थाचे पोटी हा असे म्हणणारा मुलगा म्हणजे एक जंतच निपजला आहे! हे आले आहेत माझे वृद्ध वडील आणि हा आला आहे माझा थेरडा बाप; दोन्ही वाक्यांचा अर्थ जरी जवळजवळ एकच असला आणि क्वचित बोलण्याचा हेतूही सारखाच असला, तरी त्या दुसऱ्या वाक्यातील हलकट शब्दांसरशीच त्या व्यक्तिविषयीही सकृद्दर्शनी तरी नसता हलकट भाव उत्पन्न होतो.

आज क्रांतिकारकांना सरसकट अत्याचारी म्हणण्याचा जो प्रघातच पडल्यासारखा झाला आहे, तो अशाच हलकटपणाचा द्योतक आहे. क्रांतिकारक पक्षाला आजकालचे लेखक किंवा वक्ते जेव्हा सहजच अत्याचारी म्हणून जातात तेव्हा त्यांच्यातील अनेकांच्या मनात क्वचितत्या पक्षाविषयी नुसती निंदाच करण्याचा हेतू असतो असे नाही. पण शब्दांची योजना यथार्थपणे पारखून करण्याची सवयच नसल्याने ते स्वतःच्या बापाला वृद्ध म्हणून न म्हणता सहज थेरडा म्हणून जातात.

मागे अवघ्या हिंदी लोकांना नेटिव्ह (Native) म्हणून स्वतः हिंदी लोकच म्हणत असत. वास्तविक हा नेटिव्ह शब्द प्रथमतः इंग्रजांनी भारतीयांस असभ्य, न सुधारलेले, बर्बर या अर्थी उपयोगिला. पण हा त्यातील गर्भितार्थ न समजून किंवा उपेक्षून इंग्रजांचे देखोदेखी आमचे स्वतःचे लोकही स्वतःस नेटिव्हच म्हणवून घेत. प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेच्या जुन्या लिखाणात हा शब्द भारतीय या अर्थी सरसहा वापरलेला आढळेल! पण पुढे वंगभंगाच्या चळवळीत आत्मसन्मानाच्या पहिल्या जागृतीत, या शब्दातील निंद्य भाव झोंबू लागला आणि भारतीयांनी स्वतःस नेटिव्ह म्हणून घेण्याचे साफ नाकारले. अर्थ पाहून शब्द योजिण्याइतका शहाणपणा लोक शिकू लागले.

पुढे लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षाचा उदय होताच त्यांचे शत्रू त्यास Extremists अतिरेकी म्हणून संबोधू लागले. त्या शब्दातील निंदागर्भ खोच ज्यांच्या धानात

येईना ते स्वतःलाही I am an extremist म्हणून ऐटीने म्हणताना आढळत असत! नंतर तोही शब्द झोंबू लागला आणि लोकमान्यादिकांचा पक्ष स्वतःला तरी अतिरेकी न म्हणता राष्ट्रीय पक्ष म्हणवू लागला!

अजूनपर्यंत पूर्वास्पृश्यांच्या शाळेत Low Caste School म्हणजे हीन जातीची शाळा म्हणतात! इतकेच नव्हे तर तो शब्द स्वतः अस्पृश्य पुढारीही निःसंकोचपणे वापरून स्वतःलाच Low Caste हीन जाती म्हणवू लागतात. या शब्दाचा निषेध आम्ही करू लागतो तेव्हा त्यातील निंद्य अर्थ आता कुठे त्यांच्या ध्यानी येत आहे. अर्थ पारखून शब्द न योजण्याच्या अनाडी सवयीमुळे मनुष्य आपल्या शत्रूंनी दिलेल्या शिवीस देखील अशा पदवीसारखा मानू लागतो!

तीच स्थिती क्रांतिकारक पक्षाविषयी झाली, राष्ट्रीय पक्षास अतिरेकी हे नाव भारतीय शत्रूंनी दिले तर क्रांतिकारकांस अराजकवादी असे संबोधन ते वापरू लागले. आणि आश्चर्याची गोष्ट ही की, ते अतिरेकी नाव स्वतःला दिले म्हणून जो चिडे तो राष्ट्रीय पक्ष देखील त्या क्रांतिकारकांस मात्र अनार्किस्ट- अराजकवादी-म्हणूनच संबोधू लागला! जे स्वराज्यासाठीच क्रांतिकारक होते- ज्यांना केवळ पर-राज्य काय ते नको होते, पण स्वराज्य हवे होते, इतकेच नव्हे तर, दास्य -लांच्छनाने लेशमात्रही अकलंकित असे संपूर्ण आणि स्वतंत्र राज्य हवे होते- त्यांना अराजकवादी म्हणण्यात येई!

पण त्याहूनही आश्चर्याची गोष्ट ही की, भारतीय राजकारणात ज्या एकाच पक्षाने काय ते आपले डोके ठिकाणावर ठेविले होते, जो शत्रूच्या मानभावीपणाने कधीही लेशमात्रही चळला नाही, फसला नाही, भुलला नाही, भ्रमला नाही, त्या क्रांतिकारक पक्षाला, भिक्षा, अर्ज, विनंत्यापासून तो जर्मनास मारण्यासाठी त्या इंग्रजांच्या वतीने लढू निघण्यापर्यंतच्या सर्व वेडांनी भारलेले आणि कालपर्यंत स्वातंत्र्य शब्दाचा अर्थही मला कळत नाही म्हणून स्वतःच सांगणाऱ्या गांधीच्या गोतावळीतील बिनधोरणी आणि बिनमाथी लोकच माथेफिरू म्हणत असत! अगदी कालपर्यंत म्हणत असत!
पण आता क्रांतिकारकांस अराजकवादी `अनार्किस्ट ` म्हणणारे स्वतःच त्या क्रांतिकारकांचे शिष्य होऊन संपूर्ण स्वातंत्र्यवादी झालेले आहेत! आता अराजक असतील तर सारेच अराजकवादी आहेत; कारण, परराज्य नको असे सारेच म्हणत असून तसा प्रयत्नही करण्यात येत आहे. तीच स्थिती माथेफिरू पणाची. पूर्वी क्रांतिकारकांना माथेफिरू म्हणत जे उदार इंग्रजांचे पाय चाटीत बसत. त्या सगळ्या

किंकर्तव्यता विमूढ झालेल्यांची माथीही, इंग्रजांच्या पुढे लाळ घोटीत थकून जाऊन आणि इंग्रजांच्या लाथा ओ येईतो खाऊन, शेवटी फिरावयाची ती फिरून गेली आहेत. क्रांतिकारकांत आणि त्यांच्यात आता माथेफिरूपणाचा फरक उरला नाही. केवळ सहनशीलतेच्या, म्हणजेच स्पष्ट प्राकृतात कोडगेपणाच्या परिमाणात काय फरक पडला असेल तेवढाच उरला. तेजस्वी सिंह अपमानाच्या नुसत्या खुणेसरशी चवताळून उठला. इतर श्वापदे-ससे, सरडे-शतक शतक ब्रिटिशांच्या टेबलाभोवती तुकड्यातुकड्यासाठी गोंडा घोळून तोंडे वेंगाडून थकल्यानंतर मग बिथरली. मग किंचाळू लागली, भुंकू लागली. क्रांतिकारकांच्या ज्या ज्या वाक्यांसाठी ते त्यास माथेफिरू म्हणत, त्या त्या सर्व वाक्यांची क्रांतिकारकांच्या पायापुढे संथा घेऊन आता ते सर्वच तीच भाषा बोलत आहेत. जवळ जवळ तसेच आचरण करीत आहेत.

अशा प्रकारे आता तो प्रसंग स्वतःवरच बेतल्यामुळे क्रांतिकारक पक्षाला अतिरेकी, अराजकवादी किंवा माथेफिरू असे म्हणण्याचा हीनपणा- भ्याडपणा- भारतीय पक्षांत तरी कोणी फारसा करीत नाही. त्या शब्दांचा उपयोग अर्थ पारखून करण्याइतका शहाणपणा वा प्रामाणिकपणा बहुतेकजण दाखवू लागले आहेत. पण तरीही काहीजण अंध सवयीमुळे क्रांतिकारकांना अत्याचारी म्हणण्याचा हीनपणा किंवा भ्याडपणा अद्यापही करीत आहेत.

आज क्रांतिकारक पक्षात आणि इतर प्रमुख राजकीय पक्षांत राजकीय मागणीत, भाषेत किंवा तीव्र उद्वेगात काही फरक उरला नाही. त्या दोघांचे ध्येयही पूर्ण स्वातंत्र्य हेच झालेले आहे. क्रांतिकारकांनी जे ध्येय तीस वर्षापूर्वी घोषित केले त्याच ध्येयाच्या ध्वजाखाली, जे पूर्वी ब्रिटिशांनी त्यांच्या गळयात घातलेल्या पाळीव पट्ट्यांनाच भूषण म्हणून मिरवीत, ते भूतदयेच्या भ्रमाचे भोपळ्याचे भोपे होऊन भटकत फिरणारे सारे पक्ष, आज एकत्र झालेले आहेत आणि क्रांतिकारकांसह क्रांतिकारकांनीच अविर्भूत केलेल्या त्या दिव्य मंत्राच्या, त्या स्वातंत्र्यलक्ष्मी की जय -च्या गर्जना करीत आहेत. आपल्या राष्ट्रमातेच्या हितार्थ आपली मागे झालेली गलती भूल, भ्रम तत्काळ सुधारण्याची जी तत्परता आणि सरळता त्या आमच्या देशबंधूंनी दाखविली, त्याविषयी कोणाही देशभक्तास आनंदच होईल; पण ज्या अर्थी क्रांतिकारकांचे आणि त्यांचे ध्येय एकच असताही केवळ क्रांतिकारक त्या न्याय्य नि दिव्य स्वातंत्र्यध्येयाच्या प्राप्तीस्तव अपरिहार्य असा सशस्त्र प्रतिकार करू इच्छितात आणि इतर पक्ष निशःस्त्र प्रतिकाराने ते स्वतंत्र्य मिळवू पाहतात एवढ्या फरकासाठी त्या क्रांतिकारकांस अत्याचारी म्हणण्याचा शिवराळपणा अजूनही ते लोक करीत

आहेत, त्या अर्थी त्यांच्या ह्या हलकट मनोवृत्तीचा शक्य तितका तीव्र आणि वारंवार निषेध करीत राहिल्यावाचून गत्यंतरच नाही. त्यांच्या मागच्या अनेक चुका जशा त्यांना क्रांतिकारकांच्या प्रतिकारामुळे सुधाराव्या लागल्या, तशी हीही चुकी सुधारणे त्यांना भाग पाडलेच पाहिजे.

सशस्त्र प्रतिकार करणाऱ्या क्रांतिकारकांचे या अत्याचाराच्या आक्षेपास काय उत्तर असते त्याचा आम्ही निःपक्षपाती दृष्टीने प्रथमतः विचार केला पाहिजे. त्यांची साधने जशी आम्हांस आवडत नाहीत तशी आमची साधने त्यास सर्वस्वी आवडत नाहीत. विशेषतः आमच्या साधनांच्या समर्थनार्थ जो नितिनियमांचा पोकळ पाल्हाळ आम्ही लावतो त्याचीच त्यांना घृणा वाटते. आम्ही म्हणतो, आत्मशुद्धी -आत्मशुद्धीकरता उपास करू या! पण ते क्रांतिकारक म्हणतात, आत्मशुद्धी कोणाची? ज्याने हा भारतवर्ष तरवारीच्या टोकाने पद्दलित करून ठेविला आहे त्यांची! हे महापाप त्याने केले -त्याला उपास घडले पाहिजेत. स्वतःचा देश स्वतंत्र करू पाहणाऱ्या आम्हांस पापच शिवत नाही तर शुद्धी कसली! आम्ही म्हणतो आम्ही अनत्याचाराची शपथ घेतली आहे. आम्ही अनत्याचाराने स्वातंत्र्य मिळविणार! पण ते क्रांतिकारक म्हणतात, तुम्हांला अत्याचाराची व्याख्याच कळली नाही. आम्ही देखील अनत्याचारीच आहोत; आम्ही सशस्त्र प्रतिकार करीत असलो तरी तो न्यायाचे रक्षणी, आततायांचे दण्डनार्थ असल्यामुळे तो सदाचार आहे! अत्याचार नव्हे. आम्ही कोणाच्या देशावर शस्त्र बळाने दरवडा घातला नाही. जे आमच्या देशावर बळजोरी करीत आहेत ते अत्याचारी- आम्ही नव्हे! आम्हांस पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा; पण अत्याचारी नव्हे! कारण, अत्याचारी तो की जो दुसऱ्या निरपराध मनुष्याची हिंसा करतो. दुसऱ्याचे घर दुष्टपणाने फोडतो; न की तो जो त्या घरफोडू दरवडेखोरास किंवा हत्यारीस सशस्त्र बळाने शासन देतो. दुसऱ्याच्या देशावर बळाने राज्य करतो तो अत्याचारी, न की जो स्वदेशास, वेळ पडली तर, सशस्त्र प्रतिकारानेही मुक्त करण्यासाठी झुंजतो!

क्रांतिकारक मार्ग कोणास मान्य नसले, सशस्त्र प्रतिकाराचा अवलंब आम्ही करावा असे कोणास मान्य नसले, तरीही हिंदुस्थान देशास जे शस्त्रबळानेच पारतंत्र्यात ठेवीत आहेत त्यांच्याशी शस्त्रबलानेच जे झुंजू पाहातात त्या हिंदी क्रांतिकारकांस अत्याचारी म्हणण्याचा मूर्ख शिवराळपणा त्यांनी का करावा? कारण त्यास केवळ शस्त्रधारणार्थ अत्याचारी म्हणताच देशस्वातंत्र्यार्थ झुंजणाऱ्या वॉशिंग्टन, मॅझिनी,लेनिन, इतकेच काय पण श्रीराम, श्रीकृष्ण, शिवाजी -फार काय इतिहासातील

पूजनीय झालेल्या जवळ जवळ साऱ्या व्यक्तींना अत्याचारी म्हणणे न्यायतः भाग पडेल. कारण ते सर्व आततताई शस्त्रबळाचा संरक्षक शस्त्रबळानेच प्रतिकार करीत आले आहेत! तात्विक दृष्ट्या पाहिले तर क्रांतिकारकांना हिंसक म्हणून निंदिणाऱ्या लेखणीने वा जिभेने क्रांतिकारकांना हिंसक म्हणणाऱ्या तथाकथित अहिंसावाद्यांनाही हिंसकच म्हटले पाहिजे; कारण पिसाळलेल्या कुत्र्यास गोळी घालून ठार मारण्यास प्रोत्साहन देणे, गाईलाही गोळी घालूनच ठार मारणे योग्य ठरवणे, माकडांनाही मारण्याचे कार्याला संमती देणे हे त्या गांधीश्रुती अहिंसाचार्यांना न्याय्य वाटते. जर्मनांना तर लढाईतील क्रूरांतील क्रूर शस्त्रानीही ठार मारण्यासाठी ते बिनपगारी रिक्रूटिंग ऑफिसर बनण्यापर्यंत पाळी आली होती. तेव्हा ज्यांना क्रांतिकारक शस्त्रधारक किंवा बलवादी आहेत म्हणून त्यांना अत्याचारी आणि हिंसक म्हणावयाचे असेल, त्यांनी तो मान अहिंसावाद्यांनाही दिला पाहिजे. अत्याचारी भगतसिंह, हिंसक जनींद्रनाथ असे ते म्हणताच क्रांतिकारकही हिंसक अत्याचारी गांधी असे म्हणण्यास सोडीत नाहीत हे लाहोर काँग्रेसच्या मंडपात प्रत्ययास आलेच आहे. अनेक वेळा क्रांतिकारकांस हिंसक, अत्याचारी म्हणून संबोधण्याचा परिणाम हा झाला होता की, लाहोरच्या मार्गातून आणि स्टेशनवरून क्रांतिकारक तरुणांनी गांधीजींचे महात्म्य उपेक्षून संतापजनक आरोळ्यांनी धिक्कार केला होता हे सर्वांना ठाऊक असेलच.

देशात एक खादीचा अत्यंत अभिमानी पक्ष अस्तित्वात आहे.त्यास इतरांनी खादाळ म्हणून म्हणणे त्यांना शिवराळपणा वाटेल. केवळ सुताने स्वराज्य घेऊ असे म्हणणारा एक पक्ष काही दिवसांपूर्वी या देशात होता आणि आजही त्या पक्षाचा निर्वंश झाला आहे असे नाही. पण केवळ सुताने किंवा मिठाने स्वराज्य मिळविण्यावर ज्यांचा विश्वास नाही त्यांनी जर त्यांस सुताळ किंवा मिठाळ म्हणून म्हटले तर तो त्यांना शिवराळपणा वाटेल, पण जेव्हा हेच लोक त्या क्रांतिकारकांस स्वदेश स्वातंत्र्याच्या न्याय्य कार्यी ते सशस्त्र प्रतिकारही करण्यास कचरत नाहीत एवढ्यासाठी अत्याचारी, हिंसक म्हणतात, तेव्हा त्यांना तो मात्र शिवराळपणा वाटत नाही!! वास्तविक पाहाता क्रांतिकारकांना सरसकट अत्याचारी हे नाव देणे हा शिवराळपणाच नव्हे तर सत्याचे स्तोम माजविणाऱ्यांना लाज वाटावी असा मत्सरी ढोंगीपणा आहे. कारण, ते लोक रामास हिंसक म्हणत नाहीत तर रावणासच म्हणतात; कृष्णास हिंसक म्हणत नाहीत तर कंसासच म्हणतात. अर्थात् त्यांस हे कळण्याइतकी बुद्धी असते की, आततताई बळ हा अत्याचार होय, परंतु आततायांचा प्रतिकार करणारे बळ सदाचारीच समजले जाते. भारतीय दंड-विधानातही, म्हणजे प्रत्यक्ष इंग्रजांच्या पिनल कोडामध्येही, स्वसंरक्षणार्थ अत्याचारीला मारण्याचे तत्व

आणि भेद हा राजकीय विभाग सोडून इतरत्र मान्य केलेला आहे. तेव्हा केवळ सशस्त्र प्रतिकारास ते सिद्ध होतात आणि शस्त्रबळाचा अंगीकार करतात म्हणून भारतीय क्रातिकारकांस अत्याचारी म्हणणे हा निर्भेळ मिथ्याचार होय.

क्रांतिकारकांचे मार्गास त्याज्य म्हणा, त्यास पाहिजे तर क्रूर म्हणा, चुकलेले म्हणा, त्यांचे मार्ग कोणी अवलंबू नयेत असे म्हणा; परंतु स्वदेशस्वातंत्र्यार्थ अत्यंत पवित्र हेतूने स्वार्थत्यागाची, प्राणत्यागाची, शौर्याची आणि पराक्रमाची पराकाष्ठा करणाऱ्या त्या क्रांतिकारक वीरांस अत्याचारी हिंसक म्हणून हेटाळणाऱ्या अहिंसा(?) वाद्यांनी येता जाता आपली जिव्हा विटाळून घ्यावी हे सत्याग्रही अत्याचाराचे एक मसालेवाईक उदाहरण आहे.

क्रांतिकारकांचा देह आणि वाचा इंग्लिश बेयॉनेटांच्या टोकांनी अवरुद्ध केलेली असताना त्यांच्या त्या इंग्लिश अत्याचाराने भाग पडलेल्या मौनाचा लाभ घेऊन, पिंजऱ्यातल्या सिंहावर मूर्ख मुले थुंकतात तसे, वाटेल त्याने थुंकत सुटावे यात शौर्य तर नाहीच नाही; पण साधा प्रामाणिकपणा देखील उरत नाही. क्रांतिकारकांस जो अधिक शिव्या देईल, त्यास तितके दिवस बहुधा इंग्रज सरकार बेड्या हातकड्या ठोकीत नाही; त्याची वाचा त्याच प्रमाणात मोकाट सुटते; हा लाभ पदरात पाडून घेण्यासाठीच जर कोणी सशस्त्र क्रांतिकारकांस हिंसक म्हणून म्हणण्याचा क्रम चालू ठेवील तर त्याच्या ह्या व्यवसायाचे आड आम्ही येऊ इच्छित नाही. परंतु केवळ अज्ञानाने किंवा सवयीने किंवा अविचाराने जे क्रांतिकारकांस अत्याचारी म्हणत असतील त्यांनी यापुढे तरी असा शिवराळपणा करू नये, क्रांतिकारकांचे मार्ग तुम्हांस मान्य नसतील तर नसोत. तुम्ही तुमच्या मार्गाने जा. पण तुमच्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी अधिकात अधिक पराक्रम आणि भव्यातील भव्य स्वार्थत्याग करणाऱ्या त्या देशवीरांना पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा, बळवादी म्हणा, शस्त्रवादी म्हणा पण अत्याचारी म्हणू नका! आणि जर केवळ ते शस्त्रधारण करून त्यांस अपरिहार्य वाटणाऱ्या रक्तपातास प्रवृत्त होतात म्हणून त्यांस अत्याचारी म्हणावयाचे असेल तर मग अत्याचारी शिवाजी, अत्याचारी गांधी, अत्याचारी वॉशिंग्टन आणि हिंसक तुकाराम असे म्हणण्यास तरी सिद्ध व्हा! कारण तुकाराम देखील म्हणतात की,

**विंचु देव्हाऱ्यास आला। देवपूजा नावडे त्याला।**
**तेथे पैजाराचे काम। अधमासी तो अधम।।**

श्रद्धानंद: १० मे १९३०

## लाला हरदयाळ

आपल्या बंगल्यात थोड्याफार स्वार्थत्यागी माणसांच्या तजविरी सापडतील, पण तुमच्या बंगल्यात कान्हेऱ्यांची तसबीर सापडणार नाही की, वैद्याची तसबीर सापडणार नाही! आणि याचे कारण हेच ना की, त्यांनी अमोल असा स्वार्थत्याग केला? आमची चित्रे दिसतात याचे तरी कारण? आज सरकारला आम्ही मोकळे असावे असे वाटते हेच की नाही?

हिंदुस्थानच्या हिताकरता जगभर पसरलेल्या कित्येक देशभक्तांची तीन पानीही चरित्रे नाहीत. हीच उपेक्षा हरदयाळ यांच्या वाट्यास आली. म्हणून काही आठवणी नि इतर भाषात जी काही प्रसिद्धी मिळाली त्या आधारे मी हरदयाळ यांचे वृत्त निवेदन करणार आहे.

तीव्र बुद्धिमत्ता

त्यांच्या बाल्याचे बाबतीत नक्की माहिती उपलब्ध नाही. पंजाबमध्ये त्यांचा कुठेसा जन्म झाला. त्यांच्या शालेय शिक्षणाबद्दलही माहिती उपलब्ध नाही. पण कॉलेजच्या उर्फ विश्वविद्यालयीन शिक्षणात मात्र त्यांचे तेज फाकू लागले. त्यांच्या साध्यासुध्या बावळटपणाखाली असलेली बुद्धिमत्तेची तेजस्वी तरवार चमकू लागली. एम्. ए. मध्ये इंग्रजी भाषेत संबंध युनिव्हर्सिटीत पहिला क्रमांक मिळवून त्यांनी आपले असामान्यत्व इतरांस पटवून दिले; म्हणूनच त्यांस सरकारी शिष्यवृत्ती मिळवून विलायतेस जावयास मिळाले.

ख्रिस्ती धर्माचा पगडा

आधीच तैलबुद्धी, तशात अंगी विभूतिमत्व-दर्शक विक्षिप्तपणा नि भोवताली ख्रिस्ती कॉलेजातील मिशनरी वातावरण, यामुळे त्यांच्या मनावर ख्रिस्ती धर्माचा पगडा बसू लागला. त्या भावनामय मनाची अशी खात्री होत चालली की, हिंदुस्थान ख्रिस्ती झाल्याशिवाय सुधारावयाचा नाही. लजपतरायांवर ही इस्लामी धर्माचा पूर्ण पगडा बसला होता. त्यांच्या वडिलांचीही इच्छा होती की, लजपतराय यांनी मुसलमानी धर्म स्वीकारावा. पण आमच्या सुदैवाने तो प्रसंग टळला. तसेच हरदयाळांच्या बाबतीत झाले. ते हिंदू म्हणून जगले आणि हिंदू म्हणून मेले.

## इंग्लंडात

पुढे इंग्लंडात जाऊन त्यांनी ऑक्सफर्डमध्ये नाव दाखल केले. लगेच आपल्या विद्वत्तेची त्यांनी तेथील अध्यापकांवर पूर्ण छाप पाडली. त्यांचे आणि अध्यापकांचे विचारविनिमय होऊ लागले. धार्मिक नि तात्विक विचारांची चर्चा चालू असताच बंगाल्यातील वंगमंगाच्या चळवळीचे वृत्तांत इंग्लंडात उमटू लागले. बिपिनचंद्र पाल, लालाजी, टिळक, यांच्या नेतृत्वाखाली धुमधडाक्याने चालणाऱ्या चळवळीत भाग न घेणे म्हणजे जिवंत नसण्यासारखे ठरले असते. ह्याच चळवळी चालू असण्याचे सुमारास मी इंग्लंडात जाऊन दाखल झालो. तेथे पं. श्यामजींबरोबर इंडिया हाउसमध्ये गेलो. हिंदू विद्यार्थ्यांची चौकशी करीत असता हरदयाळ यांचे नाव प्रामुख्याने माझ्यापुढे आले.

त्यांच्या नि माझ्या गाठीभेटी झाल्या. त्यांच्या अंगाच्या असामान्य गुणांचा मला परिचय झाला. त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या विक्षिप्तपणाचा अनुभव येऊ लागला नि हळू हळू असे आढळून आले की, त्यांची ख्रिश्चन धर्मावरील श्रद्धा ओसरत जाऊन हिंदी राजकारणाचे प्रश्न त्यांच्या डोक्यात घोळू लागले आहेत.

याच सुमारास गोखलेही पण तेथे होते. गोखले हे सरकारला अधिक जवळचे, म्हणजे सरकारला गोखले आवडत होते, असे नव्हे. टिळकांपेक्षा हे बरे, असे सरकारचे म्हणणे. पण आमचे तसे नव्हते! आम्ही क्रांतिकारक इंग्रजांस भीतिदायक वाटत होतो. म्हणजे असे म्हणता येईल की, आम्ही मुळीच नकोत म्हणून टिळक चालतील, पण टिळकांपेक्षा बोलणे-चालणे करण्याच्या दृष्टीने गोखले बरे, म्हणून गोखले जवळचे असे सरकारास वाटे. सरकारास यापैकी कोणीच आवडणारे नव्हते. आजही अशाच गोष्टी दिसून येण्यासारख्या आहेत. ज्यावर विश्वास ठेवला असता आपल्या पायास धक्का बसण्याचा संभव कमी असे सरकारला वाटते, त्यास सरकार जवळ करते नि त्यासच भेटी-मुलाखती देते.

## क्रांतीची शपथ

क्रांतिकारक विचारसरणीचा हरदयाळांच्या मनावर पगडा बसला. इंग्लंडला जबरदस्त दहशत बसविणारी चळवळ झाल्याविना हिंदुस्थानवरील त्यांची पकड ढिली होणार नाही असे वाटून तशी परिस्थिती निर्माण करण्याच्या दृष्टीन हरदयाळने

माझ्यासमोर, माझ्या घरी सशस्त्र क्रांतीची शपथ घेतली. एखादा बेत ठरला म्हणजे मग तो पार पाडावयाचाच ही त्यांची वृत्ती! लगेच ते ऑक्सफर्डला गेले नि शिष्यवृत्ती आणि विद्यार्थीदशा यांचे राजिनामे देऊन मोकळे झाले. अध्यापकवर्गाने त्यांचे मन वळविण्याचे नाना प्रकारचे प्रयत्न केले. त्यांच्या विद्वत्तेपासून होणारे फायदे त्यांनी त्यांच्या निदर्शनास आणले. पण त्याचा त्यांच्या मनावर काहीच परिणाम झाला नाही.

एकांतिक भावना

येथेच ते थांबले नाहीत. ज्यांचे पारतंत्र्य आपण झुगारून देण्यास निघालो आहोत त्यांचे कपडे आपण घालणे म्हणजे गुन्हा असल्याची त्यांची खात्री झाली. तसल्या थंड प्रदेशात नुसती कफनी, धोतर वगैरेसारखा पोषाख वापरणे प्रकृतीच्या दृष्टीने हितावह नसल्याचे आम्ही त्यांना खूप सांगून पाहिले, पण त्यांच्या उदात्त विक्षिप्तपणापुढे आमचे चालेना नि एका कपड्यानिशी ते राहू लागले. त्यानंतर जेवणाचे बाबतीत. जो हिंदू नाही त्याच्या हातचे अन्न खावयाचे नाही असा त्यांनी संकल्प केला नि हिंदू पद्धतीचे अन्न ते खाऊ लागले.
आमचा त्यांचा येथे मतभेद होता. जन्मभर आम्ही इंग्रजांचे बबर्जी होऊन हिंदुस्थानात बसलोच आहोत, आता तरी त्यांच्याकडून आपली सेवा करून घेऊ या! त्यांच्या बायकांना आपली भांडी घासू द्या! त्यांना आमच्याकरिता स्वयंपाक करू द्या! असे आम्ही म्हणत असू. पण ते त्यांना रुचत नसे. असो! याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. त्यांना ब्राँकाईटीसचा आजार झाला. पहिल्या पहिल्यांदा त्यांनी तो लपवून ठेवला; तरी पुढे तो त्यांना असह्य झाला; तेव्हा त्यांना औषधपाणी देणे जरूर होते. थोडे बरे वाटल्यावर त्यांना पॅरिसमध्ये बॅ. राणा यांजकडे पाठविण्यात आले. हे राणा अद्याप जिवंत आहेत. त्यांनी नि त्यांच्या जर्मन कुटुंबांनी त्यांची उत्तम व्यवस्था ठेवली आणि ते बरे झाले. पण त्या जर्मन बाईच्या हातचे ते खाईनात की तिच्याशी बोलेनात.

क्रांतीचा जोर

बरे झाल्यावर अभिनव भारत संस्थेच्या सल्ल्याने ते क्रांतीच्या तत्वांचा प्रचार करण्यासाठी हिंदुस्थानात दाखल झाले. लगेच त्यांनी पंजाबात एक आश्रमवजा केंद्र उघडले. धुमधडाक्याने प्रचारकार्यास सुरवात झाली. पण नवभारताचे केंद्र हिंदुस्थान

असून तेथे हरदयाळ काम करीत असल्याचा सुगावा लागल्यामुळे त्यांच्यावर सरकारी वारंट सुटले. ही बातमी कळताच ते स्थलांतर करू लागले; पण आता निभाव लागत नाही असे पाहून हरदयाळ पुनः इंग्लंडात आले. इकडे इंग्लंडातील क्रांतिकारक चळवळ अधिकाधिक जोरावू लागली होती. बॉम्ब तयार होत होते. फ्रान्समधून बुटांच्या पार्सलमधून पिस्तुले येत, ती हिंदुस्थानात पाठविली जात होती.

गुप्त शिपायांच्या हातावर तुरी

आमच्यामागे गुप्तपोलिसांचा ससेमिरा लागून राहिला. आमचे ते सहचरच झाले. आम्ही कित्येक वेळेस त्यांच्या हातावर छत्री अडकवून मोकळ्या हाताने चालावे नि त्या बिचाऱ्यांनी आमच्या छत्र्या घेऊन मुकाट्याने आमच्या मागून चालावे! आमच्यातला चारी नावाचा एक मद्रासी गुप्त पोलिसांत असे, हे कित्येक दिवस सरकारला माहीत नव्हते. त्यामुळे आम्हांस माहिती कळे. असाच एके दिवशी एक गृहस्थ मजकडे आला. आम्ही त्यास ओळखले. त्याचे स्वागत केले. तो म्हणाला, मला आपली खोली पाहावयाची आहे. मी म्हणालो, ठीक आहे. त्यास मी खोलीत नेले. खोलीत चारदोन वर्तमानपत्रे होती. एक आराम खुर्ची होती. आम्ही त्यास खुर्चीवर बसविले. त्याच खुर्चीत बॉम्ब होते! उद्देश हाच की, बॉम्ब उडालाच तर तो आणि आम्ही सर्वच खलास.

आमच्या बातमीने ब्रिटिशांस दहशत बसली. धिंग्राने कर्नल वायलीचा वध केला. ब्रिटिशांना चांगलीच दहशत बसली. हजारो सहयांनी जे काम झाले. नसते ते एका घटनेने घडवून आणले.

जर्मनीशी संधान

याच वेळेस हरदयाळ पॅरिस येथे परत गेले. तेथून मध्ययुरोपात संधान बांधण्याच्या कारवाया सुरू झाल्या. जर्मनीशी सख्य जोडणे हेही शक्यतो साधावे, हा हेतू, पण... पण... हा इतिहास पट्टाभिसितारामय्यांना अवगत नाही. त्यांच्या मते राष्ट्राचा इतिहास १९२० नंतर सुरू झाला! मुलास आपल्या जन्मापासून जग सुरू झाले असे वाटत असेल तर वाटो; पण बापही माझ्यासमोर जन्मला असेच तो म्हणेल काय? पट्टाभिसितारामय्यांना हा इतिहास माहीत नाही, म्हणून तो घडलाच नाही असे का म्हणावयाचे आहे? हेच का सत्य? असो.

इतिहास, सत्य सांगितलाच पाहिजे. त्यातले काय घ्यावयाचे, काय सोडावयाचे ते आपण ठरवावे. सबंधच्या संबंध ऐतिहासिक घटना अमलात आणा असे मी म्हणत नाही; मुळीच आणू नका असेही मी सांगत नाही, मी फक्त इतिहास सांगत आहे.
इंग्लंडमध्ये तलवार पत्र सुरू झाले. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचे पुस्तक प्रसिद्ध झाले. हरदयाळने पॅरिसमध्ये वंदेमातरम् पत्र चालू केले. जिकडे तिकडे हिंदुस्थानचा बोलबाला सुरू झाला.

म. गांधींचे धोरण

म. गांधी त्या वेळी युरोपातच होते. त्यांचा नि हरदयाळांचा परिचय झाला. विस्तार सोडून बोलावयाचे म्हटले तर असे म्हणता येईल की, त्यांचे आमचे खटके उडू लागले. त्यांच्या आमच्या विचारांत फार अंतर होते. कुठे God save the king म्हटले गेले की ते ताडकन उभे रहात नि आम्ही बसून राहात असू. ते यावर टीका करीत. ते म्हणत राजा श्रेष्ठ आहे. अश्वरी अंश आहे. त्याला मान देणे साम्राज्यातील प्रत्येक व्यक्तीचे काम आह. अर्थात ही विचारसरणी आम्हांस पसंत नसे. गांधींचा ओढा साम्राज्यरक्षणाकडे असे. आफ्रिकेत बोअरांचे स्वातंत्र्य हरण करण्यास ब्रिटिश साम्राज्यसत्तेस गांधींनी जी मदत केली ती काय अहिंसातत्वांस धरून झाली! पण त्यांची ती वृत्तीच बनून गेली होती. त्या वेळेस वादविवाद चालू असता आम्ही क्रांतिकारक टेबलाच्या एका बाजूस बसत असू आणि त्यांचे आफ्रिकेतील अनुयायी टेबलाच्या दुसऱ्या बाजूस बसत. वादविवाद होई! दररोज अशी मौज होई की, गांधींच्या बाजूचा एक एक शिष्य क्रांतिकारकांच्या बाजूस येऊन बसू लागला. अखेर गांधी एकटेच एका बाजूस राहिले! आमच्या पंथाबद्दल मारो काटो पंथ अशा उल्लेख करून त्यांनी त्या नावाचे एक पुस्तकही प्रसिद्ध केले.

मनाची द्विधा स्थिती

आमच्यावर अशी ही स्वकीयांची प्रखर टीका नि परकीयांचा जुलूम चालू होता; तरी आमचे कार्य सुरूच होते. हिंदुस्थानात पाठविलेल्या शस्त्रास्त्रांचा उपयोग होऊ लागला. धरपकड होऊ लागली. सहोदर, आप्त यांना पकडण्यात येऊ लागले. आमची नावे समजावीत म्हणून त्यांचे छळ होऊ लागले. मी बेचैन झालो. दररोज बातम्या येत. रोज मनाची बेचैनी वाढे! हरदयाळ माझी समजूत घाली. पण माझे मन द्विधा

झाले. माझे सहोदर, माझे मित्र तुरुंगात हालअपेष्टा सोशीत असता मी मात्र फ्रान्समधील बागांतून फिरावे. असे, हे कसले जीवन! हरदयाळ म्हणत, तू गेलास म्हणजे शक्ती गेली. तू पुढारी -तू चळवळीचा आत्मा -छे! मला ते पटेना. मी म्हणलो, मी पुढारी आहे किंवा नाही ते ठरावयाचे आहे. जे हाल माझे आप्तेष्ट सोशीत आहेत ते मी सोसल्याशिवाय कार्याची पूर्तता होणार नाही. मी जाणार... जेथे माझे सगेसोयरे तडफडत आहेत तेथे मी जाणार. त्यांच्यात मी जाणार.

तत्वज्ञानाकडे कल

मी निघालो! स्टेशनवर बरीच मंडळी जमली होती, पण दोन बाजूस दोन म्लान नि वरून बावळट दिसणारे चेहरे मी पाहात होतो. एक मॅडम कामा यांचा नि दुसरा हरदयाळांचा. हरदयाळांचे ते शेवटचे पुण्यदर्शन. तेथून मी निघालो. इंग्लंडात आलो नि पकडलो गेलो. आमच्या कारागृहामुळे चळवळीचा विचका झाला. हरदयाळांच्या कानावर गोष्टी गेल्या. नवभारताच्या मंडळींनी शपथा मोडून साक्षी दिल्याच्या बातम्या एकून ते पूर्ण उदास झाले. त्यांनी राजकारणाचा अभ्यास सोडून दिला नि ते तत्वज्ञानाचा अभ्यास करू लागले!

इंग्रजी, फ्रेंच, पर्शियन, उर्दू, संस्कृत इत्यादी भाषा त्यांना चांगल्या अवगत असून युरोपातील इतर भाषांचेही चालचलावू ज्ञान त्यांना होते. निरनिराळ्या भाषांतून धर्म नि तत्वज्ञान यावरील विचार त्यांनी समजावून घेतले नि शेवटी बौद्ध धर्म आचरणात आणण्याचे त्यांनी ठरविले.

नवा धर्म

पुढे त्यांनी होनोलुलू येथे जिवंत राहावयास लागणारे तेवढेच खाऊन अत्यंत हालात दिवस काढण्यास सुरुवात केली. पण अभ्यास सोडला नाही. हळूहळू नवा धर्म, की जो नवे नि जुने यांची सांगड घालील असा, स्थापन करण्याचा निश्चय केला. विचारांची चौकट बनत चालली. त्यांच्या विचारास मूर्त स्वरूप येऊ लागले. त्या वेळेस भाई परमानंद सरकारच्या रोषास पात्र होऊन देशत्याग करून तेथे गेले. त्यांची नि हरदयाळांची गाठ पडली. भाई परमानंदांनी त्यांस अध्यात्मवादापासून परावृत्त केले. आधीच आपल्या देशात पुष्कळ आचार्य झाले आहेत. त्यांत आपली भर कशाला? हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न हातात घेण्यास हा काळ अनुकूल आहे.

भाई परमानंदांच्या कोटिक्रमाने हरदयाळांचे मन पुनः बदलले. हिंदी स्वातंत्र्याची कल्पना त्यांना पटली नि लगेच आपल्या नेहमीच्या स्वभावास अनुसरून ते त्यात हिरिरीने पडले.

## महायुद्धाची संधी

त्या वेळेस महायुद्धाचे ढग जमू लागले. इंग्लंडचा जो शत्रू तो आपला मित्र ही भावना जागृत झाली नि जर्मनीत प्रयत्न करण्याच्या इराद्याने हरदयाळ युरोपात गेले. पण जगायचे कसे? ज्या देशात जावे त्या देशात, त्या भाषेचा एखादा लेख लिहावा नि काय मिळेल त्यावर निर्वाह करावा? त्या वेळचे त्यांचे हाल अवर्णनीय आहेत. आजच्या शेकडो काँग्रेसभक्तांचे हाल एकवटले तरी अभिनव भारताच्या एकेका सभासदांच्या हालाची अन् त्यागाची बरोबरी होणार नाही. या गोष्टी पट्टभिसितारामय्यांना खऱ्या वाटणार नाहीत. पण इतिहास कोणाच्या वाटण्याबिटण्याचा विचार करीत नाही.

## वीस सालापूर्वीचे राजकारण

आम्हास जर्मनांशी संधान बांधण्याचे कामात हळूहळू यश येऊ लागले. युरोपातील युद्धाचे प्रसंगी हिंदुस्थानात बंडाचा वणवा पेटला पाहिजे ही कल्पना जर्मनीला पटली. पैसाही येऊ लागला. जगभर पसरलेली हिंदी माणसे वाटेल ती मदत देण्यास तयार झाली. काय सांगावे अहो, जगभर ठिकठिकाणी हिंदी माणसे आहेत. ती जेथे थोडीफार सुखी आहेत. काटकसर, हिंदू संस्कृतीस पोषक अशी राहणी इत्यादी गुणांमुळे त्यांनी गाठीशी बांधलेला पैसा हिंदवी स्वराज्याकरता पुढे केला. हिंदूंनी मिळविलेले स्वराज्य उद्या सामाज्र ठरणार आहे! पण परराष्ट्रात या अशा तऱ्हेच्या चळवळी -वणवण फिरत केलेल्या चळवळी -विमानातून परराष्ट्रात फिरून आलेल्या चळवळ्यांच्या चळवळीपेक्षा आपणास अत्यंत कमी वाटतात म्हणून का आपण १९२० नंतर खरे राजकारण सुरू झाले असे म्हणता? अरे, आम्ही जिवंत असताना तुम्हांला हे म्हणवले तरी कसे? इकडे हरदयाळ जमवाजमव करीत अमेरिकेत गेले. तेथील शीख वगैरे मंडळींच्या मदतीने हिंदुस्थानातील पलटणीत भेद पाडण्याची खटपट सुरू झाली.

## अमेरिकेच्या कैदेतून पलायन

याच वेळी गदर नावाचे वर्तमानपत्र हरदयाळ सात भाषांत चालवू लागले. प्रत्येक अंकात १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध नावाच्या माझ्या पुस्तकाचे भाषांतर प्रसिद्ध होऊ लागले. गदरचे अंक पाठ करण्यात येऊ लागले नि सर्वत्र ब्रिटिशांविरुद्ध क्रांतीचा प्रचार करण्यात येऊ लागला. या नि अशा तऱ्हेच्या बातम्या इंग्रजांच्या कानावर जाऊ लागल्या असल्या पाहिजेत. म्हणूनच त्यांनी अमेरिकेवर दडपण पाडून हरदयाळांना पकडण्याची खटपट केली. पण अमेरिकेस त्यापासून काडीचा फायदा नसल्यामुळे नि त्या वेळेस तिचे धोरण दारूगोळा नि शस्त्रास्त्रे विकून पैसा मिळविणे हे असल्यामुळे तिने हरदयाळांस वरकांती कैद केले असले तरी आतून त्यांनी पळून जावे अशी व्यवस्था केली. त्याचा फायदा घेऊन हरदयाळ पळाले नि मेक्सिकोत आले. तेथून पुन्हा हालचाली सुरू झाल्या.

## बंडाची तयारी

पॅसिफिक महासागरातून ब्रह्मदेशात यावयाचे, तेथील बंदर ताब्यात घेऊन बंगाल्यात उतरावयाचे आणि बंडाचा वणवा पेटवून द्यावयाचा. अंदमानावर हल्ला करून तेथील क्रांतिकारकांची मुक्तता करावयाची असे झाल्यास फायदा घ्यावा म्हणून मद्रासच्या बाजूस एम्डेन जहाज उतरले. पण तसे व्हावयाचे नव्हते. एक नवीनच बातमी वातावरणात उमटू लागली. हिंदुस्थानात इस्लामी राज्य होणार! खलिफास हिंदुस्थानात राजा करण्याचे अभिवचन कैसरने दिले! हो त्यांना काय? हिंदुस्थानात बंड झाले म्हणजे झाले! मग तिकडे खलिफा राजा होवो नाही तर आणखी काही होवो. हरदयाळांचे तसे नव्हते. त्यांना हिंदुस्थानात हिंदूंचे राज्य पाहिजे होते. हे त्यांचे ध्येय. त्या ध्येयास धक्का बसल्याबरोबर त्यांनी आपले अंग काढून घेतले. पण मुसलमानांना अतिशय आनंद झाला. ते हजारोनी येणाऱ्या खलिफाच्या स्वागतार्थ सामोरे निघाले. त्यात कित्येक उपाशी मेले ही गोष्ट वेगळी.

हिंदुस्थानात बंड उभारण्याची कल्पना विलयास गेली. त्याबरोबर हरदयाळाचे भावप्रधान मन पुनः उदास झाले. चळवळीतून अंग काढून घेतल्यावर त्यांची अनुकंपनीय स्थिती झाली. अन्नान्नदशा येऊन वणवण फिरू लागणाऱ्या त्या थोर देशभक्ताची इकडे आठवणही होऊ नये ही केवढी शरमेची गोष्ट आहे!

उपकारकर्त्यांची उपेक्षा

ज्याच्या प्रयत्नाने वॉर्सीला यशस्वी जर्मनांच्या तहाच्या वाटाघाटीकरिता तयार केलेल्या खर्ड्यात हिंदुस्थानास स्वातंत्र्य अशी अट होती. त्या देशभक्तांच्या राजकारणास दडपून १९२० नंतरच राजकारणास सुरवात झाली. असे म्हणणे केवढे अन्यायाचे आहे! आनंदाची गोष्ट ही की, ते गेले खरे, पण निदान ही गोष्ट सांगण्यास मी जिवंत राहिलो.

पुढे थोडी निवळानिवळ झाल्यावर हरदयाळांना इंग्लंडात राहावयाची परवानगी मिळाली; पण ज्या मातृभूमीकरिता त्यांनी जिवाचे रान केले ती मातृभूमी डोळ्यांनी पाहावयाची त्यांना अनिवार इच्छा झाली. त्यांनी तसे बरेच प्रयत्न केले. शेवटी त्यांस परवानगी मिळाली; पण इकडे येण्यास तिकीटाचे पैसे नव्हते. कोणास कशी गोष्ट सांगावयाची ही? शेवटी भाई परमानंदाच्या कानावर ही गोष्ट गेली. त्यांनी हरदयाळांना मनीऑर्डरने पैसे पाठविले आणि परत पावती हातात पडते न पडते तोच हरदयाळांच्या मृत्यूची बातमी येथे आली!

त्या महान देशभक्तास आपल्या मातृभूमीचे पुनः दर्शन झाले नाही!!

या महान देशभक्ताच्या मृत्यूच्या बातमीला वर्तमानपत्रात कोपऱ्यात स्थान मिळाले. अरे, तुमच्यातला एखादा उंदीर मेला तर तुम्ही स्तंभच्या स्तंभ भरून टाकता. प्रसिद्ध देशभक्त उंदीर मरण पावले असे जाड्या अक्षरात छापता आणि हरदयाळसारख्या महान देशभक्तास कोपऱ्यात जागा देता? अगदी शरमेची गोष्ट आहे.

* * *

## कै. रामचंद्र त्रिंबक अथवा
## भाऊराव चिपळूणकर

श्रीयुत भाऊराव चिपळूणकर यांस गेल्या महिन्यात देवाज्ञा झाल्याचे दुःखद वृत्त वाचकांस कळलेलेच आहे. श्रीयुत चिपळूणकर यांचे घराणे जव्हार संस्थानांत पूर्वी स्थायिक झाल्यापासून, त्यांच्या तीन पिढ्या त्या संस्थानाच्या सेवेत मुख्य मुख्य अधिकाराचा उपभोग घेत आणि संस्थानची एकनिष्ठ सेवा करीत आल्या. स्वतः भाऊराव चिपळूणकर तर लहानपणापासून त्या संस्थानच्या सेवेत वाढत वाढत मुख्य कारभारीही झाले. राजे कै. बाळमहाराज यांचा श्रीयुत भाऊराव चिपळूणकरांवर फार लोभ होता. त्यांचे जावई श्री. विनायकराव सावरकर यांस जेव्हा शामजी कृष्णवर्मा यांची शिवाजी फेलोशिप मिळून सन १९०६त ते विलायतेस जावयास निघाले, त्यावेळेस त्यांना तिकडच्या शिक्षणासाठी लागणारे सहाय्य श्री चिपळूणकर यांनी केले. आपल्या जावयाच्या विलायतच्या शिक्षणास सहाय्य करणे हा अपराध कोणच्याही सासऱ्याने करु नये, असे केले तर तो राजद्रोह होईल असा एखादा आर्डिनन्स देखील त्यावेळी कुठे निघालेला नव्हता. पण त्या तरुण स्वातंत्र्य-वीर सावरकरांच्या लंडनमधील क्रांतिकारक चळवळीने चिडून गेलेल्या इंग्रज सरकारास सावरकरांचे नाव कोणी घेताच खाऊ का गिळू असे होई. बॅ. सावरकरांवर प्रत्यक्ष आघात करणे जोवर शक्य नव्हते, तोवर अप्रत्यक्षपणे त्यांचा छळ करून त्यांचा उत्साह आणि धैर्य खचविण्याकरता सरकार पराकाष्ठा करू लागले. त्यांच्या वडील बंधूस जन्मठेपेची शिक्षा दिली. त्यांच्या कनिष्ठ लहान बंधूस बंदीत अटकावून ठेवले. त्यांच्या आप्तेष्टामागे पोलिसांचा ससेमिरा लावला आणि त्यातच त्यांचे सासरे श्री. भाऊराव चिपळूणकर यांस जव्हार संस्थानचे कारभारी पदावरून काढून त्यांची तीन पिढ्यांची सहस्रावधी रुपयांची मत्ता जप्त करून, ज्या संस्थानांत त्यांच्या घराण्याने अधिकार गाजविला, त्यास तीन प्रहाराचे आंत तो सर्व सोडून देऊन सीमापार व्हावे, म्हणून शिक्षा दिली. जव्हारच्या राजांना देखील या शिक्षेमुळे त्यांचा विश्वासू कारभारी नित्याचा अंतरताना मनस्वी दुःख झाले. पण संस्थानच वाचविण्यासाठी त्या धैर्यशील कारभाऱ्याने सर्व दायित्व आपल्यावर घेऊन संस्थान रातोरात सोडले. त्यांची वैयक्तिक मत्ता जप्त करण्याची ही पिसाळ शिक्षा देण्यासारखा त्यांचा अपराध कोणता म्हणाल तर त्यांनी केवळ शिक्षणासाठी म्हणून त्यांच्या स्वतःचे जावयास सहाय्य केले! ज्या चळवळीशी चिपळूणकरांचा लवमात्र संबंध नव्हता, त्या क्रांतिकारक चळवळी त्यांच्या जावयाने केल्या. म्हणून नैसर्गिक ममतेने पूर्वी केव्हा

केवळ नैर्बंधिक शिक्षणाकरता दिलेल्या सहाय्यास्तव, त्यांच्या सासऱ्यास असली अमानुष शिक्षा! सरकारलादेखील पुढे केव्हाही श्रीयुत चिपळूणकरांकडून दुसरा कोणताही अपराध घडल्याचे दाखविता आले नाही. श्रीयुत भाऊराव चिपळूणकरांची आपल्या जावयास हे सहाय्य देण्यात परमावधीची महत्वाकांक्षा म्हणजे इतकीच होती की, आपल्या जावयाने बॅरिस्टर होऊन परत यावे नि जव्हार संस्थानात मोठ्यातील मोठा अधिकारी व्हावे. पण त्यांचे जावयाची महत्वाकांक्षा काही अद्भुतच पडली! त्याचे दायित्व श्री. चिपळूणकरांवर कसे पडणार! इंग्लंडमध्ये एका मानभावी पारशी गृहस्थाने आणि एका इंग्लिश पोलिस अधिकाऱ्याने जेव्हा त्या तरुण क्रांतीवीरास ही जव्हारची बातमी कळविली आणि छद्मीपणाने म्हटले, अजून तरी हा स्वतःला संकटात पाडण्याचा मार्ग सोडा! अजून तुम्हांस आशा आहे. पहा! तुमच्या भावाची काय स्थिती झाली. बिचारा तुमचा सासरा! राजाच्या कारभाऱ्याचा एका रात्रीत भिकारी झाला. ते संस्थानच मरता मरता वाचले नाहीतर...

त्या अधिकाऱ्याला मध्येच अडवून त्या क्रांतीवीराने उत्तर दिले, हे आमचे हिंदुस्थानचे मुख्य संस्थानच बुडाले आहे. तेच वाचविण्यासाठी तर आम्ही झुंजत आहोत. हिंदुस्थानचे ते संस्थान वाचले तर त्यातच ही संस्थाने वाचतील. तेच बुडाले तर ही बुडालेली आहेतच. त्यात आता नवीन असा धक्का आमच्या मनास कसचा बसणार! अशा रीतीने या शिक्षेमुळे सरकारच्या अपेक्षेप्रमाणे लवलेशही न डगमगता, सावरकर अभिनव भारताची आपली देशस्वातंत्र्याची चळवळ अदम्य उत्साहाने तिकडे तशीच चालवीत राहिले. इकडे श्रीयुत चिपळूणकर यांनीही त्या कठीण शिक्षेस आपल्या वाट्यास आलेले आपले आपल्या स्वदेशाविषयीचे कर्तव्य म्हणून धैर्याने आणि अभिमानाने तोंड दिले.

कै. चिपळूणकर हे शरीराने सुश्लिष्ट, उंच, दुहेरी बांध्याचे, गोरेपान, आणि फार देखणे पुरुष होते. त्यांची मुद्रा, त्यांची ती डौलदार राहणी, त्यांचे ते चाणाक्ष नयन, बोलण्याचालण्याची ती प्रभावशाली ढब, यांस पहाताच, पेशवाईतील कोणी अस्सल चित्पावन सरदारच आपण पहात आहोत की काय, असे वाटून मनुष्य क्षणभर त्यांचेकडे पहातच राही. त्यांनी शेकडो विद्यार्थ्यांस सहाय्य केले. ते स्वतः घोड्यावर बसण्यात, बंदूक मारण्यात, मृगया करण्यात, व्यायामात, मल्लयुद्धात निष्णात होते. त्यामुळे मल्लांस त्यांनी नेहमी उत्तेजके आणि पारितोषिके वाटली. गाण्याचाही मोठा हौशी! देवलसीही तसाच! त्यांच्या वाड्यात एका बाजूस कोणीतरी बैरागी वा कर्मठ आपली अर्चा करीत बसला आहे. भली मोठी पार्थिव लिंगे करून पाट्या पाट्या

फुलांचा शृंगार रचून पूजा बांधीत आहे. तिकडे बंगल्यात गवये उतरले आहेत. कोणी सतार लावतो तर कोणी तबला लावतो आहे, माडीवरील बौठकीवर विद्वान, वैदिक, नामांकित पुढारी वा अधिकारी वा स्नेही यांनी परिवेष्टित असे श्रीमंत भाऊराव चिपळूणकर विनोद अथवा विद्दवत्ताप्रचुर संवादांत गढलेले आहेत, दाराशी घोड्यांची, स्वारांची, आणि शिपायांची वर्दळ वारंवार चालू आहे, असा देखावा दिसे.

अशा ऐश्वर्यांचा त्याग करण्याची पाळी श्रीयुत चिपळूणकरांवर अकस्मात आली. त्यांचा हा त्याग आपल्या राष्ट्रीय त्यागाच्या गणनांत जमा आहे. आपल्या राष्ट्रासाठी तो त्यांनी केला आणि त्यापुढील पोलिस ससेमिऱ्याचे कष्टही त्यांनी सोसले. पण आपल्या कर्तव्यास न चळता, मनाची कोणतीही विश्वासघातकी दुर्बलता त्यांनी दाखविली नाही. या विषयी त्यांच्या निधनप्रसंगी जनतेने त्यांच्या स्मृतीस कृतज्ञ अश्रूंचा एक एक बिंदु वाहिलाच पाहिजे. हुतात्मा श्रद्धानंदही तेच कर्तव्य आज करीत आहेत. स्वातंत्र्यवीर बॅ. सावरकरांचे श्वशुर, श्रीयुत भाऊराव चिपळूणकर, यांच्या मृत्युमुळे हळहळ वाटून डोळ्यात उभे राहिलेले हे अश्रू त्यांच्या स्मृतीचे चरणी इथे प्रकटपणे वहात आहे!!!

* * *

## महाराष्ट्रीय बाणेदारपणाची
## ओतीव मूर्ती

भारतीय किर्तीचे महाराष्ट्रीय नेते श्रीयुत लक्ष्मण बळवंत भोपटकर यांच्या सत्तराव्या वाढदिवसानिमित्त त्यांचा जो सत्कार समारंभ व्हावयाचा होता तो त्या वेळी त्यांना राज्यशासनाने (सरकारने) अकस्मात स्थानबद्ध केल्यामुळे होऊ शकला नाही, तथापि त्या वेळी स्थगित कराव्या लागलेल्या त्याच योजनेचे थोडेसे रुपांतर करून येत्या ७ जूनला तो समारंभ पुण्यास साजरा होणार आहे, हे कळताच मी श्री. अण्णाराव भोपटकरांचे मनःपूर्वक अभिनंदन करणारे माझे पत्र टपालात आताच, म्हणजे २।६।५२ ला दुपारी टाकले होते; पण संध्याकाळचे टपाल फोडून पाहातो, तो त्यात केसरीच्या संपादक महाशयांचे पत्र की या समारंभास्तव श्रीयुत अण्णाराव भोपटकरांसंबंधीचे काही लेख येत्या केसरीत आम्ही छापणार आहोत. त्यांत आपणही एक लेख धाडावा अशी इच्छा आहे.

जीवनाच्या विविध क्षेत्रात इतके प्रमुखत्व पावलेल्या धर्मवीर अण्णाराव भोपटकरांच्या थोरवीस साजेल असा आणि माझ्या मनाप्रमाणे उठलेला लेख अवघ्या एक-दोन दिवसात इतर व्यापांच्या ओढाताणीत लिहीणे हे माझ्यासारख्यांच्या लेखणीस झेपणे अशक्य होते. तथापि येत्या सार्वजनिक सत्काराचा जो हार श्री. अण्णाराव भोपटकरांना अर्पिला जाईल. त्यात फूल नाही तर फुलाची पाकळी तरी माझी म्हणून गुंफलेली असावी या उत्कट इच्छेने या चार कृतज्ञ ओळी लिहून धाडीत आहे.

धर्मवीर भोपटकर

सुदैवाने अण्णाराव भोपटकरांना गौरविण्यासाठी, विस्तारपूर्वक लिहिण्याची तितकीशी आवश्यकताही नाही. राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, शैक्षणिक प्रभृती राष्ट्रीय जीवनाच्या विविध क्षेत्रात गेली तीस चाळीस वर्षे अण्णाराव भोपटकरांनी इतकी ठळक लोकसेवा केली आहे की, त्यांच्या त्या अनेक प्रमुख कार्यातील पाचसहा कार्यांचा नुसता उल्लेख केला तरीही त्यांच्या सार्वजनिक नि वैयक्तिक थोरवीची यथार्थ जाणीव तरुण पिढीलासुद्धा झाल्यावाचून रहाणार नाही. लोकमान्यांच्या पिढीपासूनच अण्णाराव राजकीय आघाडीवर झुंजू लागले. लोकमान्यांनी काढलेल्या स्वराज्य पक्षाचा भोपटकरांनी धडाडीचा प्रचार केला. लोकमान्य टिळकांनंतर दास, लजपतरायांप्रमाणेच निवडणूक जिंकून मुंबई विधिमंडळात त्यांनी स्वराज्यपक्षाचे अधिकृत नेतृत्व केले. निर्बंधभंगाच्या चळवळीत त्यांनी सश्रम बंदिवास सोसला.

महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेसचे ते काही काळ अध्यक्ष होते. निजामाच्या विरुद्ध हिंदुमहासभेने जेव्हा निःशस्त्र प्रतिकाराचा लढा पुकारला तेव्हा हिंदुत्व निष्ठांच्या पथकांचे पुढारीपण घेऊन त्यांनी झुंज दिली आणि निजामाच्या बंदिगृहांतील रानटी छळांना, तो लढा यशस्वी होईतो न डगमगता तोंड दिले. हिंदुमहासभेच्या अध्यक्षत्वाचा मानही त्यांना मिळालेला आहे.

भोपटकरांच्या ह्या राजकीय जीवनात त्यांनी महाराष्ट्राच्या ऐतिहासिक परंपरेचा सद्भिमान केव्हांही सोडलेला नाही. कोणत्याही दृढाचार्यापुढे तत्वच्युत लाळघोटेपणा केलेला नाही. भोपटकर म्हणजे महाराष्ट्रीय बाणेदारपणाची एक ओतिव मूर्ती आहे. यास्तवच हिंदुमहासभेने निजाम निःशस्त्र प्रतिकाराच्या लढ्याच्या वेळी त्यांना दिलेली धर्मवीर ही पदवी त्यांना यथार्थपणे शोभत आहे.

महाराष्ट्राचे मार्गदर्शक

आर्थिक, शैक्षणिक नि विधायक क्षेत्रांतही त्यांनी मोठे नाव कमाविले आहे. महाराष्ट्र मंडळ नि निर्बंध महाशाळा (लॉ कॉलेज), पुणे यासारख्या संस्थांच्या प्रस्थापनेस नि त्यांना आज जे चिरस्थायी स्वरुप आलेले आहे. त्याच्या यशास भोपटकरांचे विधायक नेतृत्व नि अव्याहत श्रम हे ही कारणीभूत झालेले आहेत. ते केसरी संस्थेचे विश्वस्त आहेत. कित्येक मोठमोठ्या बँकांचे नि विमामंडळांचे ते अध्यक्ष किंवा निर्देशक (सल्लागार) होते नि कित्येकांचे ते आजही आहेत. विधिज्ञतेच्या क्षेत्रात तर एक पट्टीचे निर्बंधपंडित म्हणून त्यांचा लौकिक हिंदुस्थानभर झालेला आहे. आता सत्तरी उलटली असतानांही त्यांची बुद्धी प्रज्ञेने विवेक मर्मज्ञ आहे. जुन्या किंवा नवीन निघणाऱ्या महाराष्ट्रीय अशा शेकडा पन्नास संस्थांना किंवा चळवळींना तरी अडीअडचणीच्या वेळी “भोपटकरांचा अभिप्राय प्रथम विचारूया” असे वाटल्यावाचून राहवत नाही. लोकांची त्यांच्या राजकीय नि व्यावसायिक मार्गदर्शनावर इतकी निष्ठा आहे. आज आमच्या महाराष्ट्रीय कुटुंबाचे अण्णाराव हे विद्यमान नि विश्वासास्पद आजोबा आहेत.

ईश्वर त्यांना आमच्या कल्याणासाठी उदंड आयुरारोग्य देवो!!

ह्या स्वागत समारंभाच्या अध्यक्षपदी डॉक्टर शामाप्रसाद मुखर्जींची जी निवड केली गेली तीही स्वागतार्ह आहे. भोपटकरांसारख्या निर्बंध-पंडिताच्या सत्कारनिधीचा

विनियोग पुणे विद्यापीठात त्यांच्या नावाची एक निर्बंध-शिष्यवृत्ती स्थापण्यात केला जावा ही योजना तर सर्वांशी समुचित आहे. कारण त्यात अप्रत्यक्षपणे पुणे विद्यापीठासही गौरविले जाते.

पण कायदा शब्द काढून टाका

तथापि ह्या शिष्यवृत्तीचे जे मूळ इंग्लिश नाव असेल त्याचे मराठी भाषांतर वृत्तपत्रांतून कायदा शिष्यवृत्ती असे जे केलेले आहे. ते मात्र अगदी टाकाऊ आहे. कायदा शिष्यवृत्ती! किती धेडगुजरी, कर्णकटु नि भाषादरिद्री शब्द आहे तो! समाजाचा पायाच ज्या भावावर आधारलेला असतो त्या भावाला कायदा ह्या परकीय शब्दांवाचून आपल्या मराठीत आज स्वकीय शब्दच नसावा, ही काय भूषणाची गोष्ट आहे? मुसलमानी राजवटीपूर्वी कायद्यावाचून आमची साम्राज्ये चालली नव्हती का? हा कायदा शब्द आमच्या भाषेला परकीय मुसलमानी राजवटीने बळाने फासलेला कलंक आहे. यास्तव तो वापरू नये-

तरी आमची सर्वांना अशी विनंती आहे की, त्या शिष्यवृत्तीला निर्बंध शिष्यवृत्ती किंवा विधीशास्त्र शिष्यवृत्ती असे नाव द्यावे. कंसात मूळचे इंग्लिश नाव लिहावे. डॉ. रघुवीर यांनी कायद्याला, विधी हाच प्रतिशब्द दिला आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांनी केलेल्या घटनेच्या संस्कृत अनुवादात विधी हाच शब्द योजला असून त्यांना निर्बंध शब्दही मान्य आहे. त्या दोन शब्दांपैकी कोणताही शब्द योजावा.

****